ग्रंथसंपादक व ग्रंथप्रसारक मंडळीची ग्रंथमाला.

ग्रंथ ३६ वा.

# हिंदुस्तानचा अर्वाचीन इतिहास,

## भाग तिसरा.

## ब्रिटिश रियासत,

पूर्वार्ध.



ग्रंथकार

गोविंद सखाराम सरदेसाई, बी. ए.

शिक्षक, राजपुत्र-विद्यालय, बडोदें.

प्रकाशक,

दामोदर सांवळाराम आणि मंडळी.



सन १९०...

किंमत २॥ रुपये.

श्री.

बडोद्याचे विद्यापरायण अधिपति

# श्रीमंत महाराज सयाजीराव गायकवाड

यांच्या चरणीं,

आपल्या दुर्लभ सेवेंत व निकट सांनिध्यांत मनःस्वास्थ्य प्राप्त होऊन, विद्यार्जनाविषयीं मला हरएक प्रकारें प्रोत्साहन मिळत गेलें, ह्या उपकाराबद्दल उतराई होऊन, हिंदुस्थानच्या इतिहासाचा हा तिसरा भाग, नुकतेच कैलासवासी झालेले आपले प्रिय पुत्र, श्रीमंत युवराज **फत्तेसिंहराव**, यांच्याशीं असलेल्या माझ्या दीर्घ सहवासाचें अल्प स्मारक म्हणून, मी आपणांस प्रणामपुरःसर अर्पण करितों, ही विज्ञप्ति.

सेवाभिलाषी,

**गोविंद सखाराम सरदेसाई.**

# शुद्धिपत्र.

चुका दुरुस्त करण्याविषयीं अतिशय खबरदारी घेतली होती. तथापि पुस्तक छापत असतां मी प्रवासांत वगैरे फिरत असल्यामुळें, पुष्कळ चुका राहून गेल्या आहेत, असें पुस्तक छापून झाल्यावर आढळून आलें. बऱ्याच चुका खिळ्यांच्या असून, मुद्याच्या अशा थोड्याच आहेत. म्हणून सर्व चुकांचें लांबलचक शुद्धिपत्र न देतां मुद्याच्या चुका मात्र खालीं दाखवितों.

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ३० | १० | ताडपूर | ताडमूर |
| ८७ | ११ | १५०२–३१ | १५०२–०३ |
| ९० | ३ | १४२१ | १५२१ |
| ११७ | १५ | १५८५ | १५०५ |
| १४४ | ८ | १५६४ | १५५४ |
| १४८ | ४ | १५६८ | १५८८ |
| २१२ | ४ | कुलारून | पुलारून |
| २७४ | १४ | वास | वांस |
| ४६१ | १२ | १७७६ | १६७६ |
| ४९८ | १० | ० | अवतरण नको. |
| ५१३ | ३ | बाराशें फ्रेंच लोक | बाराशें लोक |
| ५५७ | ४ | मद्रास | सद्रास |
| ६१७ | ६ | अतिव्यातीचीं | अतिव्याप्तीचीं |

‘ डरायस’बद्दल ‘ दारियस ’ उच्चार पाहिजे.

# पूर्वोद्गार.

प्रिय वाचक हो !

ईशकृपेनें हिंदुस्थानच्या इतिहासाचा हा तिसरा भाग मी आपणांस सादर करीत आहें. विलंबानें कां होईना, पण संकल्पित काम तडीस गेलें म्हणजे भार हलका झालासा वाटतो. मूळ हें काम हातीं घेतलें, तेव्हां त्यास इतका काळ लागेल असें वाटलें नव्हतें. मुसलमानी रियासत सन १८९८ त व मराठी रियासत सन १९०२ त बाहेर पडली, त्यानंतर ह्या ब्रिटिश रियासतीच्या पहिल्याच भागास सहा वर्षांचा काळ लागला हें माझें मलाच बरें वाटत नाहीं.

**ह्या पुस्तकाची जरूर.**—हिंदुस्थानचा अर्वाचीन इतिहास, मुसलमानी, मराठी व ब्रिटिश अशा तीन भागांत संपूर्ण करावा, आणि सामान्य वाचकांस व शिक्षकांस जरूर तेवढी माहिती त्यांत द्यावी, असा प्रथम उद्देश होता, पण काम प्रत्यक्ष करूं लागल्यावर तें वाढत गेलें. मराठी रियासत एका पुस्तकांत संपली नाहीं. नवीन माहिती उपलब्ध होत असल्यामुळें व अनेक वादग्रस्त मुद्दे चर्चा होऊन ठरलेले नसल्यामुळें, मराठी इतिहासाचा उत्तरार्ध लिहिण्याचें काम तूर्त तहकूब ठेवून, ब्रिटिश रियासत हातीं घेतली. शिवाय मराठी

रियासत थोडीबहुत सर्वांस अवगत आहे, पण ब्रिटिश रियासतीचा जो हा पूर्वार्ध आज प्रसिद्ध होत आहे, त्यांतील बहुतेक माहिती मराठी वाचकांस तरी अपरिचित आहे. युरोपियन लोक आरंभीं हिंदुस्थानांत कां व कसे आले, त्यांस हा देश हस्तगत करण्याचें सामर्थ्य कसें प्राप्त झालें, म्हणजे सामान्यतः राज्यांच्या घडामोडी कोणत्या तत्त्वांवर चालतात, ह्या महत्त्वाच्या प्रश्नाचा विचार ह्या पुस्तकांत असल्यामुळें, प्रस्तुत प्रसंगीं अशा पुस्तकाची अतिशय जरूर आहे.

**ह्या पुस्तकांतील विषय.**—हा ब्रिटिश रियासतीचा आरंभींचा इतिहास माझ्यामतें विशेष बोधप्रद आहे. व्यापाराच्या उद्देशानें युरोपियन लोक हिंदुस्थानांत येऊं लागले, तेव्हांपासून सुरुवात करून, सन १७७३ त ब्रिटिश पार्लमेंटानें रेग्युलेटिंग ॲक्ट पास करून, गव्हर्नर-जनरल नेमण्यास सुरुवात केली, तेथपर्यंतची सविस्तर माहिती ह्या पुस्तकांत आली आहे. म्हणजे, पुस्तकांत ज्या आधारभूत ग्रंथांची यादी जोडिली आहे, त्या ग्रंथांतील सारभूत मुद्दे व विवेचनें निवडून, त्यांचा संग्रह सरळ व सुसंबद्ध रूपानें मराठी वाचकांसाठीं येथें केला आहे. अर्थात्, विषयाची मांडणी जरी सर्वथैव माझी आहे, तरी त्यांतील हकीगत, चर्चा व टीका ह्यांत माझें स्वतःचें असें फारच थोडें आहे. इंग्रजींतील प्रत्येक ग्रंथ निरनिराळ्या धोरणानें लिहिलेला आहे; कांहींत नुसती घडलेली हकीगत आहे, तर कांहींत नुसती टीका आहे. म्हणून दोहोंतील उपयुक्त तेवढा भाग, जितराष्ट्राशीं सहृदयत्व ठेवून, मराठी वाचकांसाठीं स्वतंत्र रचनेनें ह्या पुस्तकांत उतरून घेतला आहे. दर विधानास मूळ इंग्रजी ग्रंथांचा आधार दिल्यानें वाचनाचा रसभंग होतो, एतदर्थ सर्व आधारभूत ग्रंथांची स्वतंत्र यादी निराळी जोडिली आहे.

तथापि अनेक ग्रंथांतून नानाप्रकारची माहिती वेंचून तिची गोष्टीच्या रूपानें सुसंबद्ध रचना करणें हें काम बरेंच श्रमाचें व जोखमीचें आहे. आपल्या ह्या श्रेष्ठ भरतभूमीचें स्वामित्व पाश्चिमात्यांच्या हातांत जाणें हा जगाच्या इतिहासांतील एक अत्यंत महत्त्वाचा प्रसंग आहे. तो समजून सांगण्यासाठीं पाश्चिमात्यांच्या एकंदर प्रगतीकडे लक्ष द्यावें लागतें, व आशियायुरोपांचा प्राचीन संबंध शोधावा लागतो. राज्यांच्या घडामोडींचें मूळ कारण मनुष्याची धनतृष्णा होय, व धनोत्पादनाचें राष्ट्रीय साधन व्यापार होय. ह्या व्यापारामुळेंच आपल्या देशास 'सुवर्णभूमि' हें नांव प्राप्त झालें होतें. हा व्यापार पाश्चिमात्यांच्या हातांत कसा गेला आणि त्यायोगें त्यांस येथें आपलें राज्य कसें स्थापन करतां आलें, ह्या मुद्यांचें परिपूर्ण विवेचन येथें केलें आहे. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे 'स्वदेशी' हिंदुस्थान 'विदेशी' कसें झालें, त्याचा हा इतिहास आहे. तेव्हां आजकालच्या स्वदेशी वातावरणांत त्याची किंमत विशेष आहे, हें निराळें सांगावयास नको.

एकदां विषयांत प्रवेश केल्यावर, जसजशी माहिती उपलब्ध होत गेली, तसतसें विषयाचें स्वरूप विस्तृत होत गेलें. त्यावरून ऐतिहासिक संगति जुळवीत जातां, जगाचा एकंदर इतिहास अविभाज्य आहे, तो तोडतां येत नाहीं, प्राच्य लोकांची व पाश्चिमात्यांची प्रगति अन्योन्यावलंबित आहे, हें तत्त्व मनावर ठसून, त्या दृष्टीनें मी कामास लागलों. तेव्हां हिंदुस्थानांत पाश्चिमात्य लोकांचें आगमन हा भाग जगाच्या एकंदर इतिहासापासून पृथक् करितां येत नाहीं, एकंदर ऐतिहासिक सांखळींतलाच हा एक दुवा आहे, असें आढळून आलें; आणि त्या सांखळींत ह्या दुव्याचा संबंध कोठें व कसा येतो हें दाखविणें जरूर पडलें. हिंदुस्थानच्या ब्रिटिश इतिहासास सुरुवात क्लाइव्हपासून करावी, कीं वास्को ड गामापासून करावी, ह्या प्रश्नाचें कोडें

उकलतां उकलतां, सिकंदर बादशहापर्यंत व त्याच्याही पूर्वी मजल गेली.
अशा व्यापक रीतीनें सर्व पृथ्वीचा भूगोल व मानवी प्रगतीचा एकंद
ओघ एकक्षणीं डोळ्यांपुढें आणावा, तेव्हांच इतिहासाचें हृद्गत कळ
लागतें, व तद्विषयक अध्ययनाचें साफल्य होतें. प्राक्कालीन व्यापा
राची घडामोड, तत्संबंधीं मध्यकालीन राष्ट्रांची धडपड, नौकानयनां
पाश्चिमात्यांची प्रगति, हिंदुस्थानांतील व्यापार बळकावण्यासाठीं निर
निराळ्या राष्ट्रांचा खटाटोप, आणि त्यांतून इतरांच्या चुकांचा फायद
घेऊन ब्रिटिश लोकांनीं सुधारलेला मार्ग, इत्यादि अनेक विषयां
विस्तृत व मार्मिक विवेचन ह्या पुस्तकांत आणावें लागलें आहे. त्यां
कदाचित् कोणास पाल्हाळ अगर क्वचित् पुनरुक्तिही दिसून येण्याचा
संभव आहे. परंतु निवळ मराठी वाचकांसाठीं हा प्रयत्न असल्यामुळें
इतिहासाचें खरें इंगित कळण्यास अशा विस्ताराची अत्यंत जरूर आ
असें मला वाटतें.

यूरोपच्या प्रगतीचीं कारणें आम्ही प्राच्य लोकांनीं अव
समजून घेतलीं पाहिजेत. युरोपांत सोळाव्या शतकांत मार्टि
ल्यूथर, सर टॉमस मोर वगैरे पुरुषांनीं अनेक बाबतींत नवीन दि
दाखविण्यास सुरुवात केली, त्या वेळची यूरोपची स्थिति व प्रस्तुत
प्राच्य देशांची स्थिति ह्यांचें बरेंच साम्य आहे. ह्यासाठीं यूरोप
राष्ट्रांनीं ज्या कारणांनीं आपली सुधारणा संपादन केली, तीं कार
आपण समजून घ्यावीं तेव्हांच आम्हांसही आपल्या प्रगतीचे मार्ग दि
लागतील. मला असें वाटतें, कीं आपली भावी उन्नति आतां पा
मात्यांच्याच धर्तीवर होणार; पाश्चिमात्यांची सुधारणा बाजूस सा
आपण, राष्ट्रीय दृष्ट्या, निराळ्याच मार्गानें पुढें जाणें माझ्यामतें श
नाहीं. अनुभवानें मनुष्यास शहाणपण येत असेल, तर ज्या गो
संपादण्यास युरोपियन राष्ट्रांस तीनचारशें वर्षें लागलीं, त्याच गो

जपानप्रमाणें, पांचपन्नास वर्षांच्या अवधींत आपणास संपादन करतां आल्या पाहिजेत. इतिहासाची पुनरावृत्ति होते खरी; पण तिची कालमर्यादा मात्र नेहमीं एकच असूं शकत नाहीं. सारांश, ह्या पुस्तकांतील विस्तृत विवेचन सर्वांस मनोरंजक व ऐतिहासिक दृष्ट्या बोधप्रद व उपयुक्त होईल असा मला भरंवसा आहे.

ब्रिटिश लोकांनीं ह्या देशांत अनेक साहसें करून व संकटें सोसून, आपला उद्योग किती धैर्यानें व सावधगिरीनें चालविला; मनुष्यस्वभाव ओळखून येथील परिस्थितीचा फायदा त्यांनीं आपल्या कामीं कसा करून घेतला; आणि त्यांच्या सामाजिक व राजकीय स्थितीची त्यांस कशी मदत झाली; इत्यादि प्रकार आपल्यासारख्या उदयेच्छु राष्ट्रानें आज अवश्य समजून घेतले पाहिजेत. राष्ट्रांचे अस्तोदय कोणत्या कारणांनीं होतात, व पतित राष्ट्रास स्वोन्नतीचे मार्ग कोणते आहेत, ह्याचा शांतवृत्तीनें अभ्यास करून, सतत उद्योगानें भावी उत्कर्षाची सिद्धता करणें, हेंच आपलें आज मुख्य कर्तव्य आहे. ह्या उद्देशसिध्यर्थ माझा हा अल्प प्रयत्न अंशतः तरी उपयुक्त होईल, अशी आशा आहे.

विचारस्वातंत्र्यामुळें युरोपांत नवीन जागृति कशी उत्पन्न झाली, याचें वर्णन प्रकरण १, २, ४, ८ इत्यादिकांत आलें आहे. पोर्तुगीझ, फ्रेंच, व इंग्रज इत्यादिकांची गुणदोषचर्चा पदोपदीं आली आहे, ( उ० प्रकरण ६, १८, १९. वगैरे ), त्यावरून मनुष्यस्वभावाची पारख करण्यास मदत होईल; कारण, अशी पारख करणें हें इतिहासाचें एक प्रधान अंग आहे. धार्मिक, सामाजिक, व नैतिक बाबतींत राष्ट्रावर निरर्थक बंधनें ठेवल्यानें केवढें नुकसान होतें हें अनेक ठिकाणीं व्यक्त झालें आहे. ( उ० प्रकरण १९, कलम ६ पहा ). सांपत्तिक प्रश्नास तर सर्वच पुस्तक वाहिलेलें आहे. व्यापाराचें महत्त्व, पाश्चिमात्यांची धडपड,

इंग्रजांचे उद्योग, त्यांची किफायत, साहसें व अडचणी, तसेंच राज्य स्थापनेविषयीं त्यांचा उपक्रम व विलायतेंतील झगडे ( प्रकरण १२,१३ ) तसेंच त्यांचा खासगी व्यापार व राज्यकारभारांतील घोटाळे ( प्रकरण २२, २३, २४ ) हे सर्व भाग सांपत्तिक स्थिति समजण्यास उपयोगी पडतील. एवंच राष्ट्रीय अभ्युदयाच्या प्रधान अंगांचा बराच विचार प्रसंगोपात ह्या पुस्तकांत येऊन गेला आहे. त्यावरून आपला भावी उदय होणें झाल्यास तो प्रथम सांपत्तिक व नैतिक कारणांनींच म्ह० व्यापारी युद्धानें झाला पाहिजे, असें दिसून येईल.

**विषयांची मांडणी.**—अनुक्रमणिकेंतील प्रकरणांचीं नांवें वाचलीं असतां, विषयाची मांडणी कशी केली आहे हें समजून येईल. प्रत्येक प्रकरण तितक्यापुरतें संपूर्ण असून प्रत्येकांत कांहीं तरी निराळा विषय प्रतिपादिलेला आहे. प्रकरणाच्या पोटांत अंकवार कलमें दिलीं आहेत, त्यांतील एकादें कलम सहज काढून वाचलें तरी तेवढ्यापुरतें त्यांतलें विवेचन पूर्ण आहे. कंटाळवाणीं वर्णनें वर्ज्य केलीं आहेत; आणि कोणत्याही प्रसंगाचें वर्णन व त्यावरील टीकात्मक चर्चा ह्या दोहोंचा योग्य मिलाफ करून पुस्तक होईल तितकें मनोरंजक करण्याचा प्रयत्न केला आहे. आल्बुकर्क, चाइल्ड, डुप्ले, क्लाइव्ह, सिराजुद्दौला इत्यादिकांचीं चमत्कारिक जीवनवृत्तें, व त्यांच्या स्वभावाच्या नानाविध लकेरी ह्या ठिकाणीं वाचकांस पाहवयास सांपडतील; तसेंच आंबोयनाची कत्तल, सर टॉमस रोची वकिलात, डुप्लेच्या हिकमती, कलकत्याची अंधारकोठडी व प्लासीची लढाई, क्लाइव्हचे उद्योग व पार्लमेंटांतील खटपटी इत्यादि अनेक प्रकरणें केवळ कादंबरीसारखीं मनोवेधक वाटतील. हल्लीं अनेक बाबतींसंबंधीं सामान्यतः चुकीचे ग्रह प्रचलित आहेत, ते दुरुस्त करण्याच्या उद्देशानें प्रत्येक बाबतीची संकलित व अगदीं आतांपर्यंत प्रसिद्ध झालेली माहिती

# यादी.

## १ मुख्य आधारभूत पुस्तकें.

1. William Robertson's Historical Disquisition of ancient Indian Trade.
2. Danvers' History of the Portuguese in India.
3. Birdwood's Report on the Records of India office.
4. Birdwood's First Letter book of the East India Co.
5. Birdwood and Forster's East India Co.'s letters, Vols. I–VI.
6. Sir. W. W. Hunter's History of British India Vols. I & II.
7. Beckles Willson's Ledger and Sword.
8. Forster's Embessy of Sir Thomas Roe.
9. Vincent Smith's Early History of India.
10. Logan's Malabar Vol. I., 1887.
11. Gerson Da Conha's Origin of Bombay.
12. Rulers of India Series,–Albuquerque.
13. Sir Alfred Lyall's British Dominion in India.
14. Malleson's History of the French in India.
15. Malleson's Lord Clive ( Founders of the Indian Empire ).
16. Hill's Records of Bengal, 1757, Vols. I to III.
17. Wilson's Early Annals of Bengal.
18. Stewart's History of Bengal.
19. W. Bolt's Considerations on Indian affairs.
20. Verelst's English Government in Bengal.
21. Plassy by A. K, Mitra. ( Modern Review July 190[illegible])
22. Orme's War of the Coromandel,
23. Anderson's History of the English in Western India.

---

## २ कारणपरत्वें उपयोग केलेल्या पुस्तकांची.

1. Grant Duff's History of the Marathas.
2. Cunningham's Growth of English Industry and Commerce.
3. Thornton's History of the East India Company.
4. Thornton's History of India,
5. Macpherson's History and Management of the East I. Co.
6. Kaye's Administration of the East India Company.
7. Wheeler's Early Records of British India.
8. Wheeler's Short History of India.
9. Meadows Taylor's Students' History of India.
10. Early Annals of the British in Bengal,
10. Gibbin's History of Commerce in Europe.
11. Sir Alfred Lyall's Colonies & Chartered Companies ( Times of India, June, 9-1898. )
12. Caraccioli's Life of Clive Vols. I to IV.
13. Private Diary of Ananda Ranga Pillai, Dupliex' Dubhash Duplix,
14. Vincent's Ancients in the Indian Ocean.
15. Peter Auber's Rise & Progress of Brit. Power in India.
16. Synge's Story of the World, Vols. I to V,
17. Bruce's Annals of British Commerce in Bengal,
18. Mahon's Influence of sea-power in History.
19. Memoirs of the Revolution in Bengal, (Annonymous).
20. Brigg's Nizam.
21. Mr. Rajwade's historical publications in Marathi.
22. Mr. Vasudeo shastri Khare's do do

# अनुक्रमणिका.

## प्रकरण पहिलें—प्राक्कालीन व्यापाराची घडामोड.



## प्रकरण दुसरें—युरोपियनांची पहिली धडपड.



## प्रकरण तिसरें—मलबारची प्राचीन हकीगत.



## प्रकरण चवथें—पोर्तुगीझ राज्याची स्थापना.

(सन १५१५ पावेतों.)

---

## प्रकरण पांचवें–पोर्तुगीझ राज्याची अमदानी.

(स. १५१०–१६१२).



---

## प्रकरण सहावें–पोर्तुगीझ राज्याची गुणदोषचर्चा.



---

## प्रकरण सातवें–डच लोकांची हकीगत.



---

## प्रकरण आठवें–ईस्ट–इंडिया–कंपनीची स्थापना.

(सन १६००.)

१. अमेरिका व पॅसिफिकमहासागर ह्यांचे शोध. २. पहिली पृथ्वीप्रदक्षिणा.
३. एलिझाबेथ राणीचे धाडशी खलाशी. ४. फादर स्टीफन व राल्फ् फिच्च.
५. कंपनी स्थापण्याचा उपक्रम. ६. पहिली बैठक.
७. सनद मिळविण्याची खटपट. ८. ह्या उद्योगाविषयीं स्फुट विचार.

---

## प्रकरण नववें–पृथक् सफरी व सर टॉमस रो.

(स० १६००–१६२०.)

१. युरोपियन कंपन्या. २. पहिल्या पृथक सफरी.
३. पोर्तुगीझांशीं पहिला झगडा. ४. चीनजपानकडील प्रयत्न.
५. सर टॉमस रोची नेमणूक व प्रयाण. ६. मोगल दरबारची स्थिति.
७. तहाचा मसुदा व वाटाघाट. ८. ह्या उद्योगाची कमाई.
९. इराणांतील खटपट.

---

## प्रकरण दहावें–समाइक भांडवलाची पद्धत व संकट.

(स. १६१४–१६५८.)

१. राजा पहिला चार्लस व कंपनी. २. सुरतेची वखार.
३. मद्रासची उत्पत्ति. ४. बंगाल्यांतील वसाहतींची सुरुवात.
५. क्रॉम्वेलनें केलेली व्यवस्था. ६. नोकरांचे पगार व अंतर्व्यवस्था.
७. खासगी व्यापाराचें खूळ.

---

## प्रकरण अकरावें–मुंबईची स्थापना व भरभराट.

(स० १६५८–१६८८).

१. मुंबईची स्थापना. २. पहिले तीन गव्हर्नर.
३. कंपनीच्या नोकरांची राहणी. ४. व्यापाराची भरभराट.

---

---

श्री.

# हिंदुस्थानचा अर्वाचीन इतिहास.



## भाग तिसरा.

# ब्रिटिश रियासत.

## प्रकरण पहिलें.

### प्राक्कालीन व्यापाराची घडामोड.



**१. प्राचीन धनसंपन्नतेचें बीज.**—ईशेच्छेनें यूरोप व आशिया ह्या दोन खंडांचा संबंध अलीकडे कित्येक शतकें उत्तरोत्तर निकट होत चालला आहे; आणि ह्या संबंधाचें पर्यवसान पुढें कसें होणार ह्या प्रश्नाकडे अनेक राजनीतिशास्त्रज्ञांचें आज लक्ष लागून राहिलें आहे. अशा प्रसंगीं त्या प्रश्नाचें पूर्वस्वरूप म्हणजे आशिया व यूरोप ह्यांचा पूर्वसंबंध कसा होता, हें समजणें अगत्याचें आहे. ह्यांतच हिंदुस्थानांतील ब्रिटिश राज्यस्थापनेचा इतिहास येतो.

यूरोप व आशिया ह्या दोन खंडांमध्यें फार प्राचीन काळापासून दळणवळण चालू होतें. आशियाखंड हें प्राचीन काळीं सर्व सुधारणेचें आदिस्थान होतें. विद्या, कला, व्यापार, तत्त्वज्ञान वगैरे हरएक विषयाचें ज्ञान युरोपास आशियाखंडापासून मिळत असे. त्यांतही व्यापारासंबंधानें पाहावयाचें तर आशियाखंडावांचून यूरोपचें पावलोपावलीं नडत असे. कारण जीवनाच्या निर्वाहाचे बरेच जिन्नस युरोपांत आशियाखंडांतूनच जात. हिंदुस्थान, चीन वगैरे आशियाखंडांतील पुरातन राष्ट्रें सुसमृद्ध असून त्यांजकडूनच इतर राष्ट्रांस निर्वाहाचे जिन्नस प्राप्त होत.

पाश्चिमात्य राष्ट्रांच्या अर्वाचीन इतिहासाचें सूक्ष्म अवलोकन केलें असतां असें दिसून येतें, कीं स्पेनिश, पोर्तुगीझ, डच, फ्रेंच, ब्रिटिश, जर्मन वगैरे अर्वाचीन राष्ट्रें व्यापारावर सधन झालीं; आणि सधन झाल्यामुळें त्यांची राज्यसत्ता वाढली. म्हणजे ज्या राष्ट्राच्या हातांत जगाच्या व्यापाराची घडामोड ज्यास्त, तें राष्ट्र ज्यास्त सधन, आणि जें राष्ट्र सधन त्याची राज्यसत्ताही ज्यास्त. हा प्रकार अर्वाचीन इतिहासांत जसा स्पष्ट दिसून येतो, तसाच, किंबहुना त्याहून ज्यास्त, प्राचीन इतिहासांतही दिसून येतो. मात्र प्राचीन इतिहासाची माहिती आपणांस विशेष नसल्यामुळें हा नियम आपल्या दृष्टीसमोर तितका स्पष्ट येत नाहीं. लोकांस उपयोगी पडणारा माल देशांत उत्पन्न झाला पाहिजे, आणि त्या मालापासून खपाचे जिन्नस तयार करण्याचें कौशल्य लोकांस ठाऊक पाहिजे. ह्या दोन गोष्टी असल्या, म्हणजे देशास निर्वाहासंबंधानें दुसऱ्यावर अवलंबून राहावें लागत नाहीं. प्राचीन काळच्या राष्ट्रांचाही हाच प्रकार होता. हिंदुस्थान, चीन वगैरे देश प्राचीन काळीं धनसंपन्न होते ह्याचें कारण हेंच. ह्या हिंदुस्थान देशांत सर्व प्रकारची हवा असून जमीन सुपीक असल्यामुळें पृथ्वीवर दुसरे कोठेंही उत्पन्न होणारे बहुतेक पदार्थ येथें पिकूं शकतात. ह्यामुळें येथील लोकांस निर्वाहासाठीं दुसऱ्याच्या तोंडाकडे

पाहण्याची पाळी कधींच येत नसे. तसेंच उत्तम कारागिरी व कौशल्य ह्यांचा उदयही अगदीं प्राचीन काळीं ह्या देशांत झाला होता, हें आमच्या पुरातन ग्रंथांवरून अनेक विद्वानांनीं सिद्ध केलें आहे. अर्थात् पृथ्वीवरील इतर राष्ट्रें हीन स्थितींत असतां हा देश अत्यंत भरभराटींत होता. आमचा स्वतःचा निर्वाह येथील उत्पन्नावर होऊन, पृथ्वीवरील दुसऱ्या अनेक राष्ट्रांचा निर्वाहही येथच्या मालावर अवलंबून असे. प्राचीन काळीं पूर्व, दक्षिण, पश्चिम व उत्तर ह्या चारही दिशांकडे दूरपर्यंत ह्या देशाचें दळणवळण बाह्य देशांशीं चालू होतें. आग्नेयी-कडील बेटें, तसेंच पूर्वेकडील चीन, जपान वगैरे देश इत्यादि ठिकाणीं हिंदुस्थानचा व्यापार प्राचीन काळीं चालू होता. बुद्धधर्माचा प्रसारही ह्याच अनुरोधानें झालेला आहे. तथापि आज आपण पश्चिमेकडील अतिदूरच्या एका बलवान राष्ट्राच्या ताब्यांत गेलों असून, ही प्रचंड राज्यक्रान्ति कशी घडून आली हें सांगण्याचें ह्या पुस्तकाचें मुख्य प्रयोजन असल्यामुळें, व्यापाराच्या कामांत हिंदुस्थानच्या पश्चिमेकडील राष्ट्रांची, व विशेषतः युरोपीय राष्ट्रांची स्थिति पूर्वी कोणत्या प्रकारची होती आणि त्यांचा ह्या देशाशीं संबंध कसकसा जडत गेला, हें प्रथम समजलें पाहिजे.

हिंदुस्थान व युरोपियन राष्ट्रें यांजमधील व्यापार अगदीं प्राचीन काळीं बहुतेक जमिनीवरून व कांहीं अंशीं किनाऱ्याकिनाऱ्यानें चालू असे. त्या वेळीं नौकाप्रवास जरी बऱ्याच लोकांस माहीत होता, तरी हल्लींच्याप्रमाणें किनारा सोडून भरसमुद्रांत जाण्यास त्या वेळचीं गलबतें धजत नसत. ह्या व्यापाराचे हिंदुस्थानांतून बाहेर पडून थेट युरोपांत उतरण्याचे हमरस्ते ठरलेले होते. ह्या रस्त्यांचें महत्त्व त्या वेळीं अतोनात होतें. त्या रस्त्यांनीं उंटांचे व इतर जनावरांचे मोठमोठे तांडे व्यापाराचा माल येथून दूर देशीं नेत. ह्या व्यापाराची नेआण ताब्यांत ठेवण्या-साठीं तत्कालीन राष्ट्रांत मोठी झटापट चालू असे; कारण हल्लींप्रमाणेंच

त्यांचीही विशेष किफायत व्यापारावर अवलंबून असे. यूरोपसारख्या अफाट प्रदेशांतील लोकांस नेहमींच्या जरुरीचा व ऐषआरामाचा माल पुरविणें म्हणजे कांहीं लहानसहान फायद्याची गोष्ट नव्हती. ग्रीक, रोमन, मिसर, फिनिशियन, आसीरियन, हिब्रू वगैरे अनेक पराक्रमी राष्ट्रें ह्याच फायद्याकरितां झगडत होतीं. ह्या झगड्यांचा उल्लेख बायबल वगैरे पुस्तकांतून आढळतो. व्यापाराच्या हमरस्त्यांवर ज्या राष्ट्राचा ताबा, तें राष्ट्र भरभराटींत असे. अर्वाचीन काळीं सुद्धां चंगीझखान, तयमूरलंग वगैरे पराक्रमी पुरुषांचें लक्ष ह्या फायद्याकडेच विशेषतः होतें. सारांश, हल्लींप्रमाणेंच प्राचीन काळींही देशाची धनसंपन्नता व्यापाराच्या किफायतीवर अवलंबून असे.

**२. प्राचीन व्यापाराचे हमरस्ते.**—इंग्लंडदेश पृथ्वीवरील भूप्रदेशाच्या मध्यावर व समशीतोष्ण कटिबंधांत आहे, ह्या दोन भूगोलिक कारणांचा फायदा त्या देशास मोठा होतो. तेथून दक्षिणेकडे व पूर्वेकडे किनाऱ्या किनाऱ्यानें येऊं लागलें, म्हणजे थेट चिनी समुद्रापर्यंत आठ दहा हजार मैलांचा समुद्रकिनारा एकसारखा लागतो. ह्या किनाऱ्यावर व्यापाराचीं मोठमोठीं अनेक बंदरें असून, निरनिराळ्या हवेंत उत्पन्न होणाऱ्या अनेक उपयुक्त जिनसांची नेआण ह्या सर्व बंदरांतून चाललेली असते. हिंदुस्थान व पूर्वेकडील बेटें येथील अपार संपत्तीची वार्ता अगदीं प्राचीन काळापासून पाश्चिमात्य राष्ट्रांस होती. मात्र पौर्वात्य राष्ट्रांस पाश्चिमात्य राष्ट्रें प्रत्यक्ष माहीत नव्हतीं. व्यापाराची नेआण निरनिराळ्या राष्ट्रांच्या हातांत असल्यामुळें, अमुक ठिकाणच्या अमुक एका जिनसावरूनच एक राष्ट्र दुसऱ्यास ओळखीत असे. सुवेझच्या संयोगिभूमीचा मध्येंच अडथळा आल्यामुळें पूर्वसमुद्रावरील माल भूमध्यसमुद्रावर उतरण्यास दोन मार्ग होते. एक, इराणच्या आखातांतून वर जाऊन पुढें जमिनीवरून यूफ्रेटिस नदीच्या कांठानें आशिया-

मायनरमधून जाई; आणि दुसरा, तांबड्या समुद्राच्या उत्तर किनाऱ्यावर उतरून जमिनीवरून मिसरदेशांतून भूमध्यसमुद्रावर उतरे. पण ह्यांशिवाय अगदीं उत्तरेकडचा एक तिसरा मार्ग होता. हा हिंदुस्थानच्या उत्तरेकडून निघून मध्यआशियांतील ऑक्सस ऊर्फ अमूदर्या नदीच्या कांठानें कास्पियन समुद्रावरून काळया समुद्रावर उतरे. ह्याचे कास्पियन समुद्राच्या उत्तरेकडून व दक्षिणेकडून असे दोन फांटे होते. ते दोनही काळ्या समुद्रावर एकत्र होत.

ह्यांपैकीं आशियामायनरमधून जाणारा मधला रस्ता अगदीं प्राचीन होय. हिंदुस्थानचीं जहाजें किनाऱ्याकिनाऱ्यानें इराणच्या आखाताच्या उत्तरटोंकाशीं जाऊन तेथील बंदरांत हिंदुस्थानांतला माल विकीत. यूफ्रेटिस नदीच्या मुखाजवळच्या प्रदेशास प्राचीन काळीं खाल्डिया हें नांव होतें. खाल्डियाच्या बंदरांत तो माल भरून उंटांचे तांडे उत्तरेस जाऊन मग वाळवंटांतून पश्चिमेस वळून पालमीरा ऊर्फ ताडमूर येथें येत. तेथून ते पुढें नैर्ऋत्येस डमास्कस येथें उतरत. डमास्कस येथें त्यास दोन फांटे फुटत: एक समोर पश्चिमेस समुद्र किनाऱ्यावर जाई; त्यावर टायर, सीडोन, एकर, आस्कलन वगैरे प्राचीन शहरें होतीं. दुसरा दक्षिणेकडे वळून पालेस्टाईनच्या किनाऱ्यानें इडॉम प्रांतांतून मिसर देशांत शिरे; आणि तेथें तांबड्या समुदावरील रस्त्याची व ह्याची भेट होई. प्राचीन काळच्या व्यापाराचा मुख्य रस्ता हा मधला होय.

उत्तरेकडचा रस्ता हिमालयाच्या पश्चिम रांगांतून बाहेर पडून मध्यआशियांत ऑक्सस नदीवर जाई. तेथें हिंदुस्थानच्या जिनसांची व चीनदेशांतून आलेल्या रेशमी मालाची गांठ पडे. हें रेशमी कापड चीनच्या पश्चिम भागांतून पायरस्त्यानें ऑक्सस नदीपावेतों येण्यास ऐशींपासून शंभर दिवस लागत. नंतर तो सर्व माल काळ्या समुद्रावर जाण्याच्या दोन वाटा होत्या. एक कास्पियन समुद्राच्या दक्षिणे-

कडून व दुसरी उत्तरेकडून. शिवाय कास्पियन समुद्रांतून व कित्येक नद्यांतून हा माल जहाजांच्या साह्यानेंही पुढें नेण्यांत येत असे. हल्लीं कास्पियन समुद्राच्या पश्चिम किनाऱ्यावर बाकू म्हणून शहर आहे, तेथून काळ्या समुद्राच्या पूर्वकिनाऱ्यावरील बाटूम शहरापर्यंत रशियन आगगाडीचा रस्ता आहे, तोच बहुंशीं पूर्वींच्या व्यापाराचा मार्ग होता, असें म्हणण्यास हरकत नाहीं. ह्या रस्त्यावर टिफ्लिस शहर आहे.

ह्यांशिवाय अफगाणिस्तानांतून थेट पश्चिमेस इराणांत जाऊन बगदाद येथें मधल्या रस्त्यास मिळणाराही एक मार्ग होता. पण ह्या सर्व मार्गांचें महत्त्व निरनिराळ्या वेळीं भिन्न होतें. सर्वांत उत्तरेकडचा मध्यआशियांतला मार्ग फार दूरचा, खर्चाचा व जोखमीचा होता. तो मोठमोठ्या वाळूच्या मैदानांतून व बर्फाळ अरण्यें व डोंगर ओलांडून जात असे. म्हणून थोड्या वजनाच्या व भारी किंमतीच्या चिनी रेशमासारख्या मालाशिवाय दुसरा हलका माल ह्या रस्त्यानें फारसा जातच नसे. मात्र यूरोप व चीन ह्यांचें दळणवळण नेहमीं ह्याच मार्गानें होत असून, मधला सिरियांतला रस्ता बंद झाल्यावर, ह्या उत्तरेकडच्या रस्त्यास विशेष महत्त्व आलें.

काळ्या समुद्रावर आलेला बहुतेक माल कान्स्टांटिनोपल येथें जाई व तेथून युरोपांत पसरे. क्वचित् डान्यूब वगैरे नदींतून तो परभारें पुढें जाई. क्रिमिया व डान्यूब नदीच्या कांठचे प्रदेश सुधारणेच्या मार्गास लागण्याचें कारण हा व्यापारच होय. क्रिमियांत थिओडोसिया नांवाचें एक ग्रीक लोकांचें व्यापाराचें मुख्य ठाणें होतें. तसेंच ह्या क्रिमियन द्वीपकल्पांत पुढें अनेक राष्ट्रांनीं आपापलीं व्यापाराचीं ठाणीं बसविलीं होतीं.

**३. प्राच्य जिनसांचा युरोपांत प्रवेश.**—ऐतिहासिक कालांतील मनुष्यजातीचा उदय प्रथमतः आशिया खंडांत झाला असें म्हणतात. आरंभीं

निरनिराळ्या राष्ट्रांमध्यें सर्वप्रकारचें दळणवळण जमिनीवरूनच चालत असे. परमेश्वरानें उंट हें अत्युपयुक्त जनावर मानवी प्राण्यांस दिल्यानें, त्यांना हा दूरचा प्रवास सुखानें करतां येऊं लागला. पश्चिम आशिया-खंडांत वाळूचीं मोठमोठीं मैदानें असून त्यांतून मालाची नेआण केवळ उंटाच्याच योगानें साध्य आहे. हजारों व्यापारी एक समूह करून अनेक जनावरांवर व्यापाराचा माल लादून हजारों मैलांचा प्रवास नियमित वेळांत व अत्यंत व्यवस्थेनें करीत असत. ही व्यापारी तांड्यांची पद्धत युगानुयुग चालली होती. ह्या पद्धतीमुळेंच आशियाच्या पूर्वकिनाऱ्यावरील राष्ट्रांस पश्चिम किनाऱ्यावरील व त्याच्याही पलीकडील राष्ट्रांची ओळख होती.

ही पद्धत त्या वेळीं कितीही उपयोगाची असली, तरी तिला अनेक अडचणी येत असत. रस्त्यानें धोका फार असे. खर्च व श्रम अतोनात लागत. अर्थात् ह्याहून सुलभ मार्ग मनुष्याच्या बुद्धीनें लवकरच शोधून काढिला. नदींतून, खाड्यांतून, व किनाऱ्याजवळील लहान लहान समुद्रशाखांतून लहान मोठ्या होड्यांचा प्रवास जरी प्राचीन काळीं सुरू झाला, तरी नौकानयनशास्त्रास आजचें पूर्णस्वरूप येण्यास बराच दिनावधि लागला. आज उपलब्ध असलेल्या ऐतिहासिक माहितीवरून असें कळतें कीं, भूमध्यसमुद्र, आरबीसमुद्र, इराणचें आखात, इत्यादि ठिकाणीं प्राचीन काळीं गलबतांचा व्यापार सुरू होता. फिनिशियन नांवाचें राष्ट्र सिरियाच्या पश्चिम किनाऱ्यावर असून त्याची राजधानी टायर नांवाचें शहर होतें. ह्या राष्ट्रांतील लोक व्यापाराच्या कामांत धाडशी होते. तसेंच प्राचीन मिसरलोकही व्यापारांत अग्रगण्य होते. पश्चिम आशिया खंडांत प्राचीनकाळीं जीं राष्ट्रें उदयास आलीं, त्यांचा उदय व अस्त ह्या व्यापाराच्या योगानेंच झालेला आहे. दोन राष्ट्रांत युद्ध होऊन एकानें दुसऱ्यास जिंकलें असतां, जिंकलेलें राष्ट्र जसें नामशेष

होऊन जातें, त्याच प्रकारचे राष्ट्रांच्या घडामोडीचे परिणाम शांत काळच्या एकाद्या क्षुल्लक वाटणाऱ्या गोष्टीपासून उत्पन्न होतात ते असे. वास्को ड गामा ह्यानें स. १४९८ त आफ्रिकेस वळसा घालून पूर्व समुद्रांत जलमार्गानें उतरण्याचा मार्ग शोधून काढिल्याबरोबर, अनेक मध्यकालीन राष्ट्रांचा झपाट्यानें अस्त झाला.

ह्या व्यापाराची देवघेव अगदीं प्राचीनकाळीं केव्हां सुरू झाली तें निश्चयात्मक सांगतां येत नाहीं. हिंदुस्थान, चीन वगैरे पूर्वदेशांतच होणाऱ्या अनेक जिनसांचीं नांवें युरोपांतील कित्येक अत्यंत जुन्या ग्रंथांतून आढळतात; आणि कित्येक नांवें तर भाषादृष्टीनें केवळ एकच आहेत, असेंही दिसून येतें. त्यावरून अगदीं प्राचीन काळीं सुद्धां, म्हणजे ग्रीक लोकांच्याही पूर्वीं, पूर्वेकडील जिन्नस युरोपांत जात असत. मात्र ते कोठून व कसे येतात हें त्या लोकांस ठाऊक नसे. केशर, मलमल, साग, शिसू, नीळ, कापूस, चिंच, रत्नें, इत्यादि पदार्थ; तसेंच हत्ती, अस्वलें वगैरे जनावरें हीं इ. स. पू. १७०० च्या अगोदर युरोपांत गेलीं होतीं. हस्तिदंत, कथील, व कापड हीं होमरच्या पूर्वीं (ख्रि० पू० ८००) तिकडे गेलीं होतीं. इल्यड व ऑडिसे ह्या होमरच्या काव्यांत आलेलीं मोत्यांचीं कर्णफुलें हिंदुस्थानांतलींच असावींत. मरकत हा संस्कृत शब्द ग्रीक भाषेंत मोत्याचा वाचक आहे. बायबलांतील जुन्या भागांत कस्तुरी, अगरू, चंदन, दालचिनी, कापूर, उंस, अबनूस ( एबनी ) कापसाचीं वस्त्रें, सोनें, मोर, माकड वगैरे जनावरें, ह्यांचा उल्लेख आहे. ग्रीक इतिहासकार हिराडोटस ( इ. स. पू. ५०० ) ह्याचे ग्रंथांत नीळ, तीळ, एरंडी, अंबाडी ह्यांचा उल्लेख आहे. तांदूळ आणि हिरा ह्यांचा उल्लेख स्ट्रेबोच्या ग्रंथांत आहे ( इ. स. पू. ३०० ). काळें मिरीं, लांब मिर्ची, सुंठ, लवंग, साखर, तूप, वैडूर्य, नारळ, इत्यादि जिन्नस ह्याच सुमारास ग्रीस देशांत माहीत होते. वास्तविक

ह्याच्याही पूर्वी पुष्कळ दिवस हे जिन्नस आशियांतील पश्चिम राष्ट्रांस माहीत असले पाहिजेत. मात्र प्राचीन काळीं हे जिन्नस एका देशाहून दुसऱ्या देशास जाण्यास दिनावधि पुष्कळ लागे. सिकंदरच्या पूर्वी हिरा, व जूलियस सीझरच्या पूर्वी तलम रेशमी कापड हीं युरोपांत माहीत नव्हतीं. इ. स. ५४९ पूर्वी कापूर युरोपांत गेला नव्हता. अंबर, वेलची, जायपत्री हे जिन्नस बरेच पुढें युरोपांत ठाऊक झाले. नारिंग, लिंबू वगैरे फळें इ. स. १००० चे पुढें धर्मयुद्धां ( क्रूसेड्स् ) च्या वेळेस युरोपांत गेलीं. डच लोकांनीं अरिठ्याचें फळ तिकडे नेलें. कात सतराव्या शतकांत गेला.

पूर्व व पश्चिम देशांमधील ह्या व्यापारास उत्तेजनहीं निरनिराळ्या वेळीं मिळत गेलें आहे. मिसर राजा फारो सामेटिकस ( इ. स. पू. ६७१–६१७ ) व बाबिलोनियाचा राजा नबूचंद नझर ( इ. स. पू. ६०५–५६२ ) ह्यांनीं आपल्या कारकिर्दींत पूर्वेकडील व्यापारास विशेष सवलती दिल्या, तेणेंकरून पुढें दोन हजार वर्षेंपावेतों हा व्यापार वृद्धि पावला. ह्या अवकाशांत सर्व सेमेटिक[1] राष्ट्रांशीं हिंदुस्थानचा फारच निकट संबंध होता. ह्या संबंधामुळें तत्कालीन धर्मसमजुतींत अनेक फेरफार घडून आले आहेत. हिंदुस्थानांतील देवनागरी लिपीचीं अक्षरें व कित्येक युरोपियन अक्षरें मूळचीं एकाच मिसर अक्षरांचीं रूपांतरें होत, असें कित्येक शोधक मानितात.[2]

---

१ सेमेटिक राष्ट्रें म्हणजे इ. स. पू. १००० पासून इ. स. नंतर १००० पावेतों पश्चिम आशियाखंडांत जीं अनेक राष्ट्रें होतीं तीं. मिसर, सिरिया, पालेस्टाईन, आशियामायनर, आरबस्तान, इराण इत्यादि ठिकाणीं जीं राष्ट्रें प्राचीनकाळीं प्रसिद्धीस आलीं, त्यांस सेमेटिक राष्ट्रें अशी सामान्य संज्ञा देण्यांत येते.

२ ग्रंथमालेंत ह्या विषयावर रा. रा. वा. गो. आपटे ह्यांनीं एक निबंध लिहिला आहे त्यांत ह्या मताचें समर्थन केलेलें नाहीं.

मिसर देशांतलीं अक्षरें फिनिशियन व्यापाऱ्यांनीं युरोपांत व आरब लोकांनीं हिंदुस्थानांत नेलीं असें सांगतात. सारांश, धर्माचार, अक्षरलिपि व नाणीं ह्या बाबतींत प्राचीन आशिया व अर्वाचीन यूरोप यांचें केवळ साम्यच नव्हे, तर पूर्ण ऐक्य आहे ( बर्डवूड ). स्वयंपाका-सारख्या इतर बाबतींतही केशराचा उपयोग कॉर्नवालच्या किनाऱ्या-पासून ब्रह्मदेशच्या किनाऱ्यापर्यंत पूर्वीपासून सर्वसामान्य आहे. वर दिलेल्या पदार्थांचीं नांवें ग्रीक इतिहासकार एरियन ह्या-च्याही ग्रंथांत आढळतात. एकंदरींत हा व्यापार फार प्राचीन काळापासून चालत आला असून, त्यावरच, हल्लींप्रमाणें प्राचीन राष्ट्रें फार सधन झालीं होतीं; आणि त्यांचे झगडेही ह्या व्यापाराकरितांच होते. सिकंदर बादशहानें अलेक्झांड्रिया शहर ह्याच व्यापाकरितां वसविलें. आरब लोकांनीं स. ६७५ त बसोरा, व स. ७६२ त बगदाद हीं शहरें त्याच कारणासाठीं वसविलीं. ग्रीक, कार्थेजिनियन, रोमन, बायझंटाईन म्हणजे पूर्व रोमन, व आरब हीं राष्ट्रें भूमध्यसमुद्रांत एका-मागून एक वरचढ झालीं, तीं ह्या हिंदुस्थानच्या व्यापारावर होत.

**४. मिसर व फिनिशयन राष्ट्रांचा व्यापार.**— यूरोप आणि आशिया यांजमधील व्यापार अगदीं प्राचीन काळीं म्हणजे इ. स. पू. दोन हजार वर्षांपूर्वीं खाल्डियन[१] लोकांच्या ताब्यांत होता. पण त्यांचा इतिहास उपलब्ध नाहीं. पुढें आरब व फिनिशियन लोक व्यापारांत पुढें आले. पैकीं आरब लोक तांबडा समुद्र व त्यापूर्वेकडील भागांत फिरत, आणि फिनिशियन लोक भूमध्यसमुद्रांत व्यापार करीत. पुढें फिनिशियन लोकांचीच एक शाखा आफ्रिकेच्या उत्तर किनाऱ्यावर कार्थेज येथें उदयास आली, तिनें कार्थेजचें राज्य स्थापिलें. कार्थेजचा उदय आरंभीं

१ खाल्डियन इतिहासावर एक सुंदर व्याख्यान नुकतेंच रा. रा. बा. गं. टिळक ह्यांनीं दिलें आहे.

व्यापारामुळें झाला. तथापि प्राचीन व्यापाराची भरंवसेलायक माहिती मिसर व फिनिशियन ह्या राष्ट्रांच्या इतिहासांत मिळते. ह्या दोनही राष्ट्रांचे व्यापारी दर्यावर्दी असून भूमध्यसमुद्रांत व आरबीसमुद्रांत सफरी करीत. मिसरलोकांस आरंभीं हा व्यापार आवडत नसे. कारण त्यांचा देश सुपीक व संपन्न असल्यामुळें त्यांस निर्वाहाकरितां दुसऱ्याच्या तोंडाकडे पाहावें लागत नसे, आणि ते परकी लोकांस आपल्या देशांत येऊं देत नसत. पुढें त्यांचा सिसोस्ट्रीस नांवाचा एक राजा झाला, तो मोठा साहसी व धूर्त होता. परदेशाशीं व्यवहार केल्याशिवाय आपणांस महत्त्व यावयाचें नाहीं, हें जाणून त्यानें चारशें गलबतांचें एक आरमार तयार करून हिंदुस्थानच्या किनाऱ्यापर्यंतचे सर्व देश काबीज केले. परंतु हा राजा मरण पावल्यावर मिसरलोकांनीं जलपर्यटनाचें काम बंद केलें तें पुढें बरेच दिवस चालू झालें नाहीं.

फिनिशियन लोकांची माहिती ह्यापेक्षां ज्यास्त उपलब्ध आहे. ह्या लोकांचें राज्य सिरियाच्या किनाऱ्यास भूमध्य समुद्रावर होतें. इ. स. पू. १००० पासून इ. स. पू. ५०० पावेतों सुमारें पांचशें वर्षें ह्या लोकांची भरभराट होती; आणि ही भरभराट सर्वस्वी व्यापारावर अवलंबून होती. कारण त्यांचा देश अत्यंत रुक्ष असल्यामुळें निर्वाहाचे जिन्नसही त्यांस परदेशांतून आणावे लागत. अर्वाचीन काळीं इंग्लंड किंवा हालंड हे देश जसे व्यापारावर सधन झाले, त्याचप्रमाणें प्राचीन काळीं फिनिशियन राष्ट्र सधन झालें होतें. फिनिशियन खलाशी दर्यावर्दी म्हणून नांवाजलेले होते आणि त्यांचा विशेष फायद्याचा व्यापार हिंदुस्थानाशींच होता. हिंदुस्थानांतील माल जलमार्गानें इराणच्या आखातांतून वर जाऊन पुढें जमिनीवरून पश्चिमेकडे भूमध्यसमुद्रावर जाई. त्यांची राजधानी टायर ही भूमध्यसमुद्रावर होती; पण नौकानयनविद्या बरीच मागसलेली असल्यामुळें ते स्वतः आपलीं

जहाजें घेऊन हिंदुस्थानास येत नसत. तांबड्या समुद्राच्या उत्तरभागीं दोन लहान आखातें आहेत. एक सुवेझचें व दुसरें आकाबाचें. ह्या आखातांच्या दरम्यान इडयूमियन नांवाच्या लोकांचें एक राज्य होतें. त्यांजपासून तांबड्यासमुद्राच्या किनाऱ्यावरील चार उत्तम बंदरें व्यापारासाठीं फिनिशियन लोकांनीं जिंकून घेतलीं. ह्या बंदरांतून ते इकडे हिंदुस्थानाशीं व तिकडे आफ्रिकेच्या पूर्व व दक्षिण किनाऱ्याशीं दळणवळण ठेवीत. तथापि तांबडया समुद्रापासून टायर शहरापर्यंत बरेंच अंतर असल्यामुळें, हिनोकोल्युरा नांवाचें, तांबडया समुद्रास जवळ पडेल असें, भूमध्यसमुद्रावर एक बंदर आहे, तें त्यांनीं मिळविलें. त्या ठिकाणीं हिंदुस्थानांतला सर्व माल ते नेत. तेथून तो टायर येथें नेऊन मग तेथून तो युरोपांत निरनिराळ्या ठिकाणीं ते पाठवीत. हिंदुस्थानाशीं व्यापार करण्याचा हाच मार्ग विशेष सोयीचा होता. इतर मार्गापेक्षां ह्यास त्रास व खर्च कमी पडे. ह्या मार्गानें चालविलेल्या व्यापारावर फिनिशियन लोक इतके सधन झाले, कीं ' टायरचे व्यापारी म्हणजे प्रतिराजे व पृथ्वीवरील सर्व लोकांत अतिशय सन्माननीय आहेत,' असे उद्गार ( बायबलांत? ) आहेत. अलेक्झांडर बादशहानें फिनिशियन लोकांचें टायर शहर जमीनदोस्त केलें आणि सिडोन काबीज केलें, तेव्हां फिनिशियन लोक रसातळास गेले.

**९. यहुदी लोकांचा व्यापार.**—ह्या लोकांस ज्यू अगर यहुदी असें म्हणतात. त्यांचें राज्यही फिनिशियन लोकांच्या मुलखास लागून होतें. टायरची संपत्ति पाहून त्यांनींही व्यापाराचा मार्ग पत्करिला. डेव्हिड आणि सालोमन हे यहुदी लोकांचे दोन पराक्रमी राजे झाले. पैकीं डेव्हिडनें इ. स. पू. १०४९–१०१६ पावेतों व त्याचा मुलगा सालोमन ह्यानें इ. स. पू. १०१६ पासून ९७६ पावेतों राज्य केलें. ह्यांच्या कारकिर्दीचें वर्णन बायबलाच्या जुन्या करारांत आहे. डेव्हिड ह्यानें

जरुसलेम शहर आपली राजधानी केली. ह्या ठिकाणाहून व्यापाराचा मधला म्हणजे सिरियन रस्ता त्यानें आपल्या कबजांत घेतला. उत्तरेचें डमास्कस शहरही त्याच्या ताब्यांत होतें. राबा नांवाची जरुसलेमच्या पूर्वेस व्यापाराची उतारपेठ होती, तीही त्यानें आपल्या ताब्यांत घेतली. दक्षिणच्या बाजूस मिसरच्या सरहद्दीवर इडयूमियन आणि मोआबाईट हीं लहानशीं राज्यें होतीं, तीं डेव्हिडनें जिंकिलीं. सारांश, वर डमास्कस पासून खालीं मिसरपर्यंत सर्व प्रदेश डेव्हिडनें आपल्या कबजांत आणिला. ह्यांत त्याचा मुख्य हेतु व्यापाराचा होता. परंतु हा त्याचा उद्देश त्याचा मुलगा सालोमन ह्यानें तडीस नेला. डमास्कच्याही पुढें पालमीरा नांवाची तांडे उतरण्याची एक जागा होती, ती सालोमननें काबीज करून तेथें ताडमूर नांवाचें ठाणें वसविलें. त्यायोगें युफ्रेटिस नदी व भूमध्यसमुद्र ह्यांजमधील व्यापाराचा मुख्य भाग त्याच्या हातांत आला. टायरचा फिनिशियन राजा हिराम म्हणून होता, त्याजबरोबर सालोमन ह्यानें व्यापाराचा तह केला. एवंच ह्या राजघराण्याचा मूळ पुरुष एब्रहाम ह्यास देवाकडून मिळालेला वर सालोमनच्या वेळेस खरा झाला. उत्तरेकडच्या व्यापाराची व्यवस्था लाविल्यावर सालोमननें दक्षिणेकडची व्यवस्था केली. आकाबाच्या आखातावर ईलाथ आणि एझन्जीबर हीं दोन शहरें त्यानें ईडयूमियन लोकांपासून मिळविलीं; आणि ह्या बंदरांतून त्यानें आपलीं जहाजें बाहेर पाठविलीं. त्यानें हीं जहाजें व तीं चालविणारे खलाशी फिनिशियन राजा हिराम ह्याजपासून मागून घेतले. अशा रीतीनें ह्या दोघां राजांनीं टार्शिश आणि ओफीर ह्या दूरच्या बंदरांशीं व्यापार चालविला. हीं दोन बदरें कोठें तरी आफ्रिकेच्या किनाऱ्यावर असावीं असा तर्क आहे. सालोमनचीं जहाजें बाबेलमांडेब सामुद्रधुनींतून खालीं आफ्रिकेच्या किनाऱ्यानें सोफाला नामक भागापर्यंत जात; आणि सोफालांतील सोनें, रुपें

व दुसरे जिन्नस घेऊन परत येत. तरी ह्या यहुदी लोकांचें हिंदुस्थानाशीं प्रत्यक्ष दळणवळण होतें असें दिसत नाहीं. सालोमन राजानें व्यापाराच्या योगानें जरुसलेम शहर अनेक उत्कृष्ट चिजांनीं सुशोभित केलें. बायबलांत सालोमनचें स्तोत्र आहे, त्यांत केवळ व्यापाराच्या जिनसांची यादी आहे. त्यांपैकीं कांहीं जिन्नस हिंदुस्थानांतलेच होते, हें खास. त्याच्या सिंहासनास लाविलेला हस्तिदंत, त्याचें सुंदर जवाहीर, व सोन्याच्या तीनशें ढाला, मसाले, त्याच्या बागांतील माकडें व मोर, व देवळाचे चंदनी दरवाजे हे सर्व हिंदुस्थानांतले होते. मिसरचा राजा फारो ह्याची मुलगी सालोमनास दिली, तेव्हांचें 'विवाह-मंगल-स्तोत्र' उपलब्ध आहे, त्यांतही व्यापाराचा गूढार्थ भरलेला आहे. मिसरमधून सालोमन ह्यास घोडे व वस्त्रें आलीं होतीं.

यहुदी लोकांचें राज्य पुढें लवकरच लयास गेलें. इ. स. पू. ९७६त सालोमन मरण पावल्यावर त्याच्या राज्याचे विभाग झाले; आणि पुढील एक हजार वर्षांत मिसर, आसीरिया, बाबिलोनिया, पर्शिया, ग्रीस व रोम हीं राष्ट्रें सिरियांत प्रबळ झालीं. जें राष्ट्र प्रबळ असे, तें दुसऱ्यास जिंकून आपली सत्ता वाढवी. पुढें त्याचा ऱ्हास होऊन दुसरेंच राष्ट्र उदयास येई. हा उदय व ऱ्हास ह्यांचें बीज व्यापार होय.

**६. सिकंदर बादशहाचें व्यापारी धोरण.**—ग्रीस देशचा बादशहा सिकंदर ह्यानें इ. स. पू. ३२७ त हिंदुस्थानावर स्वारी केली. ह्या बादशहाला पूर्वेकडील व्यापाराचें महत्त्व फार चांगलें कळलें होतें; म्हणूनच सर्व भूतलावर, म्हणजे भूमीवर व समुद्रावरही, आपलें राज्य असावें अशी त्याची महत्त्वाकांक्षा होती. फिनिशियन लोक थोडयाशा जहाजांच्या मदतीनें सर्व शत्रूंशीं टक्कर देऊन आपला बचाव करितात, आणि हिंदुस्थानचा सर्व व्यापार जलमार्गानें त्यांनीं आपल्या ताब्यांत ठेविल्यामुळें ते फार सधन झाले आहेत, असें पाहून सिकंदरानें त्यांची

सत्ता बळकावण्याचे अतिशय प्रयत्न केले. मिसरदेशांत नील नदीच्या कांठीं एक नवीन शहर स्थापून त्यास त्यानें आपलें नांव दिलें आणि तेणें-करून फिनिशियन लोकांच्या टायर शहरास चांगलाच शह दिला. हें अलेक्झांड्रिया शहर वसविण्यांत सिकंदरची दूरदृष्टि व धूर्तता उत्तम प्रकारें व्यक्त होते. शेंकडों राज्यक्रान्ती घडून आल्या, तरी सुमारें अठराशें वर्षेंपावेतों हें शहर हिंदुस्थानच्या व्यापाराचें मुख्य नाकें होतें. इराणदेश जिंकल्यावर सिकंदर समर्कंद येथें गेला, आणि तेथून हिंदुस्थानाकडे वळला. रस्त्यांत त्यानें अनेक प्रदेशांची व लोकांची पाहणी केली. त्यावरून सर्व उत्तम चिजांचें मूळ ठिकाण हिंदुस्थान आहे असें त्यास कळून आलें; आणि हिंदुस्थान जिंकण्याची त्याची हांव अधिकच वाढली. पुढें वायव्येकडील रस्त्यानें तो हिंदुस्थानांत आला. खैबर घाटांतून हिंदुस्थानांत येणारा ऐतिहासिक काळांतील पहिला शूर पुरुष हाच होय. तक्षशिला ऊर्फ अटक येथें होडयांच्या पुलानें सिंधुनदी उतरून तो अलीकडे आला. झेलम नदीच्या कांठीं पौरस राजाची व त्याची लढाई झाल्यावर तो दक्षिणेकडे वळला. पंजावची सुपीकता पाहून तो थक्क झाला. नील नदी, युफ्राटिस नदी, तैग्रिस नदी इत्यादि अनेक नद्या व त्यांच्या कांठचे अनेक सुपीक प्रदेश त्यानें पूर्वी पाहिले असतांही, पंजाबप्रांत पाहिल्यावर परमेश्वराच्या कृपेची, सृष्टीच्या वैभवाची व मनुष्याच्या अकलेची येथें केवळ कमाल झाली आहे असें त्यास वाटलें. लोकांनीं त्यास सांगितलें, कीं सिंधुनदी व पंजाव कांहींच नाहीं, पुढें गंगानदी व तिच्या कांठचा प्रदेश ह्यांहीपेक्षां विशेष सुपीक व शोभिवंत आहे. तें ऐकून त्यानें लगेच आपले सर्व सैनिक जमा केले आणि ह्या पुढील प्रदेशांत चलण्याबद्दल त्यानें त्यांस अत्यंत आग्रह केला. परंतु त्यांनीं ह्यापूर्वी पुष्कळ हाल व संकटें सोशिलीं असल्यामुळें, पुढें जाण्यास त्यांचा पाय धजेना. तेव्हां अतिशय हिरमोड होऊन केवळ

त्यांच्या मर्जीखातर सिकंदरास परत फिरणें भाग पडलें. सिकंदर ब्यास नदीपर्यंत आला होता. त्या नदीच्या कांठीं त्यानें बारा अवाढव्य स्तंभ उभे केले. अपोलोनियस टाएनियस नांवाचा एक ग्रीक गृहस्थ इ. स. ४६ त पंजाबांत आला होता, त्या वेळीं हे खांब त्यानें पाहिले, तेव्हां त्यांजवरील लेख वाचतां येत होते, असें सिकंदरचें चरित्र त्यानें लिहिलें आहे, त्यांत तो लिहितो. सिकंदरनें पुष्कळ विद्वान लोक आपल्याबरोबर आणिले होते, त्यांजकडून त्यानें हिंदुस्थानची इत्थंभूत माहिती मिळविली. प्रथम तो झेलम नदी उतरला, तेव्हां त्यानें पुष्कळ होड्या बांधण्यास हुकूम दिला होता. त्याप्रमाणें परत येतांच हुकुमाप्रमाणें सर्व होड्या उत्तम प्रकारें तयार होत्या. त्याच्या स्वारीची सर्व व्यवस्था निआर्कस ( Nearchus ) नांवाच्या एका हुशार अधिकाऱ्याकडे सोपली होती. स्वतः सिकंदर ह्याच होड्यांत बसून सिंधु नदींतून खालीं आला. बरोबर फौज एक लक्ष वीस हजार होती; दोनशें हत्ती होते; आणि लहान मोठीं गलबतें दोन हजार होतीं. फौजेचे तीन भाग सारखे करून एक भाग त्यानें गलबतांवर घेतला; आणि दुसरे दोन भाग दोनही कांठांनीं बरोबर चालविले. दोनही कांठावरील राजांनीं सिकंदरास करभार दिला. कांहींना त्यानें लढून जिंकिलें, आणि कांहीं आपण होऊन शरण आले. ह्या नदींतील प्रवासास नऊ महिने लागले व तो एक हजार मैलांचा होता.

सिंधु नदींतून समुद्रांत उतरल्यावर सिकंदरास फार समाधान वाटलें; आणि पुढें गलबतांची व्यवस्था निआर्कस ह्याजकडे सोपून आपण समुद्राच्या कांठाकांठानें इराणास गेला. बाकीची फौज तशीच जमिनीवरून समुद्र किनाऱ्यानें गेली. त्या सर्वांची गांठ इराणी आखाताच्या टोंकाशीं युफ्रेटिस नदीवर पडली. ह्या प्रवासास सात महिने लागले. हिंदुस्थानची खरी व उपयुक्त माहिती युरोपांत गेली, ती ह्याच वेळेस

होय. सिकंदराच्या वरील सफरींतील कित्येक बारीकसारीक गोष्टींचा तपशील व्हिन्सेंट् स्मिथ यांच्या पुस्तकांत दिलेला आढळला, तो मनोरंजक व उपयुक्त वाटल्यावरून येथें देतों.

इराण देश जिंकल्यावर ईशान्येकडे वळून सिकंदर मध्यआशियांत गेला. तेथील सपाट प्रदेशांतून अमूदर्या नदी वाहते, त्या भागास पूर्वी बॅक्ट्रिया असें नांव होतें. त्याची राजधानी बल्क् शहर. तो देश जिंकल्यावर, इ० स० पू० ३२७ च्या वसंतऋतूस सुरुवात होऊन बर्फ वितळूं लागतांच, सिकंदरानें हिंदुस्थानाकडे कूच केलें. त्याजबरोबर युरोपांतील ५०।६० हजार फौज होती. दहा दिवसांत हिंदुकूश पर्वत ओलांडून तो कोहिदामनच्या दरींत उतरला. तेथें आपलें लष्करी ठाणें बसवून निकेनोर (Nikanor) यास बंदोबस्तास ठेविलें. ह्या ठिकाणीं पश्चिम, उत्तर व दक्षिण या तीनही दिशांकडील मार्गांचा संगम होत असे. तेथून पुढें सिकंदर निकेया (Nikaia) येथें आला. निकेया शहर जलालाबादेजवळ पश्चिम बाजूस होतें. या ठिकाणीं सिकंदरानें आपल्या फौजेचे दोन भाग केले: एक भाग काबूल नदीच्या कांठानें मुलूख जिंकीत हेफिस्टिअन् व पर्डिकास या दोघां सेनापतींच्या हाताखालीं पुढें पाठविला. तक्षशिला येथील हिंदुराजा अगोदरच शरण आला होता, तो या फौजेबरोबर तजविजीसाठीं कूच करीत होता. तक्षशिला शहर सिंधुनदीच्या पूर्व तीरापासून तीन टप्प्यांवर होतें. रावळपिंडीच्या वायव्येस व हसन्अबदालच्या आग्नेयीस कित्येक मैलपावेतों जुने पडके भाग दिसतात ते ह्याच शहराचे होत. तक्षशिलाच्या राजाचें व पोरसचें वांकडें होतें. हिंदुस्थानांतील सर्व माहिती सिकंदरास देऊन त्याच्या सर्व व्यवस्थेची जबाबदारी घेणारा पुरुष हा तक्षशिलेचा राजा होय. सिंधुनदीच्या पश्चिमेकडील राजे सिकंदरच्या फौजेस शरण गेले, व त्या सर्वांच्या मदतीनें सिंधुनदीवरून अलीकडे येण्यासाठीं होड्यांचा पूल बां-

एकदम नदी उतरून पोरसवर पाठीमागून हल्ला केला. त्यामुळें पोरसची धांदल उडून त्याचा पराजय झाला व तो क्रेटिरासच्या हातांत सांपडला. पोरस हा मोठा भव्य पुरुष साडेसहा फूट उंचीचा होता. तो स्वतः शिकस्त करून लढला व नऊ जखमा लागल्यावर नाइलाज होऊन पकडला गेला. सिकंदरानें त्यास मोठ्या सन्मानानें वागविलें, व त्याचें राज्य त्यास परत देऊन आणखीहि ज्यास्त मुलूख त्यास दिले. येणेंप्रमाणें जें औदार्य सिकंदरानें त्यास दाखविलें त्यायोगें पोरस त्याचा उत्तम दोस्त बनला. ह्यावरून सिकंदराची धूर्तता दिसून येते. पोरसशीं ही लढाई इ. स. पू० ३२६च्या जुलै महिन्याच्या आरंभीं झाली. या लढाईच्या स्मरणार्थ संग्रामभूमीनजीक सिकंदरानें दोन नवीन शहरें स्थापिलीं, त्यांपैकीं बूकिफल ( Buokephala ) हें हल्लींच्या झेलम शहराजवळ असून बरेंच प्रसिद्धीस आलेलें होतें.

पुढें क्रेटिरास यास तळावर ठेवून सिकंदरानें आजूबाजूचे बरेच प्रदेश जिंकिले. चिनाब नदी ओलांडून रावीच्याहि तो सहज अलीकडे आला. रावीच्या अलीकडे कथई लोकांचें मुख्य ठिकाण संगल ह्मणून होतें तें त्यानें जिंकिलें. ३२६च्या सेप्टेंबरांत तो ब्यास नदीच्या काठीं आला. तेथून पुढें जाण्यास त्याचे सैनिक कबूल होईनात. सिकंदरानें परोपरीनें त्यांची विनवणी केली ती सर्व फुकट जाऊन, कोइनास म्हणून त्याचा एक विश्वासू सरदार होता त्यानें धीर करून सर्व लोकांचें म्हणणें सिकंदराचे कानावर घातलें. तेव्हां त्याचा फार हिरमोड झाला. तीन दिवसपर्यंत तो आपल्या तंबूतून बाहेर पडला नाहीं. शेवटीं त्यानें परत फिरण्यास हुकूम दिला. निघण्यापूर्वी त्यानें ब्यास नदीच्या पलीकडे बारा देवतांच्या नांवानें बारा चौकोनी दगडी स्तंभ उभारले व मोठा उत्सव केला. प्रत्येक स्तंभाची उंची ९० हात होती.

परत फिरून सिकंदर चिनाब नदीवर आला. तेथें त्यास ५००० स्वार आणि ७००० पायदळ अशी नवीन फौज ग्रीस देशाहून आलेली मिळाली. लवकरच तो झेलम नदीच्या कांठीं आला. येथें आपल्या फौजेचे तीन भाग करून, एक भाग नदींतून होड्यांनीं, व दोनही कांठांवरून दोन भाग, अशा रीतीनें झेलम नदींतून खालीं समुद्रापर्यंत सफर करून, सर्व प्रदेशाची पाहणी करण्याचा त्यानें निश्चय केला. नदीवर फिरणाऱ्या लोकांच्या होड्या त्यानें आपल्या कामास घेतल्या व आणखी नवीनही पुष्कळ बांधिल्या. निरनिराळ्या राष्ट्रांतले पुष्कळ खलाशी त्याच्या फौजेंत होते, ते त्यानें ह्या होड्यांवर कामास घेतले. तीस वल्हीं असलेली एक होडी, अशा ८० मोठ्या होड्या त्याच्या स्वारींत असून, एकंदर लहान मोठ्या सर्व होड्या मिळून २००० होड्या त्याजपाशीं होत्या. कांठांवरून चालणाऱ्या दोन भागांवर क्रेटिरास व हिफेइस्टन हे मुख्य होते. स्वतः सिकंदर पाण्यांतील भागाबरोबर चालाला. निघण्यापूर्वी मोठा दरबार भरवून तेथें त्यानें पोरसची त्याच्या राज्यावर कायम नेमणूक केली. तसेंच अभिसारच्या राजास सिंधुनदीच्या पूर्वेकडील प्रदेशाचा छत्रप नेमून पश्चिमेकडील प्रदेशावर फिलिपस ह्यास छत्रप नेमिलें. ऑक्टोबरच्या अखेरीस एके दिवशीं सुमुहूर्तावर सकाळीं देवपूजा करून व जलदेवतांस नैवेद्य वगैरे अर्पण करून, रणवाद्यें वाजवून कूच करण्याचा फौजेस हुकूम दिला. पुष्कळ घोडे गलबतांवर घातलेले होते, तो अजब प्रकार पाहून लोकांस मोठें आश्चर्य वाटलें. एवढा मोठा तांडा अत्यंत शिस्तीनें चालला होता, त्यामुळें आसपासचे लोक आश्चर्यचकित झाले. हजारों वल्ह्यांचे आवाज, हुकूम सोडणाऱ्या जासुदांचे पुकारे, खलाशांच्या गाण्यांचे सूर, इत्यादिकांनीं दोनही कांठांच्या दरम्यान निघणाऱ्या प्रतिध्वनींनीं एकच कल्लोळ उडून

गेला. आठव्या दिवशीं हें लष्कर झेलम आणि चिनाब ह्यांच्या संगमावर आलें. तेथें कांहीं होड्या बुडाल्या व सिकंदरची होडीही बुडण्याच्या बेतांत आली होती. प्रवास करितांना बाजूच्या लोकांशीं सिकंदराचे अनेक युद्धप्रसंग झाले, व त्यानें अनेक शहरें व प्रदेश काबीज केलें. एका प्रसंगीं सिकंदर यास जबर जखम लागून तो बेशुद्ध पडला. नंतर जखम कापून आंतील शल्य काढून टाकल्यावर तो बरा झाला. पुढें प्रवास करून सर्व मंडळी सिंधु व पंचनद ह्यांच्या संगमावर आली. ह्या ठिकाणीं सिकंदरानें एक शहर वसविलें, व क्रेटिरास यास खुष्कीच्या मार्गानें इराणांत रवाना केलें. पुढें कूच करून सिकंदर सिंधु नदाच्या फांट्यांनीं झालेल्या तिकोनाच्या माथ्याशीं आला. येथें पटल (पत्तल—ठट्टा) म्हणून मोठें शहर होतें. तें नाक्यावर असल्यामुळें सिकंदरास फार उपयोगाचें वाटलें. तथून सिंधुनदीच्या पूर्वपश्चिम भागांतून समुद्रापर्यंत स्वतः प्रवास करून सिकंदरानें युद्धोपयोगी व व्यापारोपयोगी साधनांचा पूर्ण तपास केला, व नवीन गलबतें, गोद्या व बंदरें बांधून परत पटल येथें आला. ही सर्व पाहणी झाल्यावर पुढें युरोपास जाण्याचे मार्ग नक्की करण्याच्या विचारानें त्यानें आपल्या फौजेचे दोन भाग केले. एका भागानें समुद्रांतून प्रवास करावा व दुसऱ्यानें ह्या समुद्रांतील भागावर नजर ठेवून किनाऱ्यावरून जावें, असा हुकूम केला. झेलम नदींतून पटल येथें येण्यास दहा महिने लागले. ह्या स्वारीची व होड्यांची सर्व सिद्धता त्याचा सरदार निआर्कस ह्यानें उत्कृष्ट ठेविली होती. म्हणून त्यासच समुद्रांतून चालणाऱ्या ह्या सफरीवर मुख्य नेमून आपण स्वतः जमिनीवरून चालला. जमिनीवरचा हा प्रवास मोठ्या कष्टानें पार पडला. मोठमोठे पर्वत व वाळूचीं मैदानें मध्यें येऊन आपणास अडचण होईल, हें सिकंदरास ठाऊक नव्हतें, त्यामुळें

त्याचे पुष्कळ लोक मरून गेले; व शत्रूशीं लढतांना अत्यंत प्रयास पडले. समुद्रांतून जाणाऱ्या फौजेची व सिकंदराच्या फौजेची एकमेकांस मदत न होतां पुढें मोठ्या प्रयासानें दोनही शाखांतील मंडळी ऑर्मझच्या नजीक एकमेकांस भेटली. दोनही शाखांचा प्रवास इ. स. पू. ३२९ च्या आक्टोबर महिन्यांत सुरू झाला. निआर्कस ह्यासही पुष्कळ अडचणी आल्या. ऑर्मझ येथून पांच मुक्कामांच्या अंतरावर सिकंदर उतरला होता, त्यास जाऊन निआर्कस भेटला. पुनः पूर्ववत् प्रवास सुरू करून सर्व मंडळी इराणच्या आखाताच्या टोंकावर सूझा येथें इ. स. पू. ३२४ च्या एप्रिलच्या अखेरीस येऊन पोंहोचली. पुढें एक वर्षानें म्हणजे ३२३ च्या जून महिन्यांत हा पराक्रमी पुरुष बाबिलोन येथें मरण पावला.

हा हकीगतीवरून ह्या पराक्रमी पुरुषाचें धोरण व शहाणपण चांगलें दिसून येतें ग्रीस देशापासून हिंदुस्थानच्या पूर्वसीमेपर्यंतच्या सर्व प्रदेशावर आपलें राज्य असावें, अशी त्याची महत्त्वाकांक्षा होती, व त्याची शोधकबुद्धि व व्यवस्था ह्यांवरून, तो जगला असता तर ही इच्छा तडीस जाण्यास हरकत नव्हती, असें दिसतें. त्यानें पश्चिम आशिया खंडांतील सर्व राष्ट्रांमध्यें नवीन चळवळ उत्पन्न केली. दूरदूरच्या लोकांस एकमेकांची ओळख झाली; निरनिराळ्या ठिकाणचे उपयोगाचे व खपाचे जिन्नस त्यांस ठाऊक झाले; व्यापाराचे नवीन मार्ग व नवीन पेठा उत्पन्न झाल्या त्या योगानें व्यापार व उद्योग ह्यांस नवीन चलन मिळालें. हिंदुस्थानांतील कापूस व तांदूळ, तिबेटांतील लोकर वगैरे अत्यंत उपयोगाचे पदार्थ पश्चिमेकडे खपूं लागले. सर्व संपत्तीचें माहेरघर हिंदुस्थान होय अशी त्याची पक्की खात्री झालेली दिसते. सिकंदरच्या मृत्यूनंतर त्याचे बेत तडीस नेण्याचा कोणींच प्रयत्न केला नाहीं, हें उघड आहे.

कारण पुढें त्याच्या राज्याची वांटणी झाली, त्यांत हिंदुस्थानांतील मुलुखाचा उल्लेख नाहीं. सिकंदरानें नेमिलेले कामदार त्याच्या मृत्यूनंतर पांच सहा वर्षें कामावर होते. सिंधुनदीवर आल्यापासून इराणच्या आखातावर परत पोंहोंचेपर्यंत सिकंदराचीं एकंदर तीन वर्षें ह्या स्वारींत गेलीं. त्यांपैकीं सुमारें एकोणीस महिने सिंधुनदीच्या पूर्वेकडील प्रदेशांत गेले. योद्धा या नात्यानें पाहिलें तरी या तीन वर्षांतले प्रकार निःसंशय सिकंदरास मोठेपणा आणणारे आहेत. फौजेची शिस्त, टापटिपीची व्यवस्था व युद्धकला या गोष्टी सिकंदराचे ठायीं अप्रतिम होत्या. स्वतः सिकंदर अनेक प्रसंगीं जिवाची परवा न करितां संकटांत उडी घाली, हें सेनानायकास उचित नाहीं, असें कित्येक टीकाकार म्हणतील, तथापि हा प्रकारहि तारीफ करण्याजागाच आहे. झेलमनदींतील आरमाराचा प्रवास, निआर्कसची समुद्रांतील सफर व सिकंदरचा खुष्कीचा प्रवास हे तीनही प्रकार मोठे वाखाणण्याजोगे आहेत. दुसरा एक प्रकार असा दिसून येतो कीं, त्या वेळींसुद्धां युद्धकलेंत हिंदुस्थानच्या फौजा युरोपियनांपेक्षां कमी दर्ज्याच्या होत्या. ग्रीक स्वारांच्यापुढें पंजाबचे हत्ती निकामे ठरले. तथापि ह्या स्वारीचा हिंदुस्थानावर सांगण्यासारखा कांहींच परिणाम झाला नाहीं. सिकंदरासारखे पुरुष एवढा खटाटोप करून आपल्या देशांत कां येतात आणि ह्या परकीय युरोपियन लोकांपासून आपणांस काय शिकावयाचें आहे, त्यांची राज्यपद्धति, व्यवस्था व सुधारणा कोणत्या प्रकारच्या आहेत, ह्या प्रश्नांकडे, अलीकडच्या मनूंप्रमाणेंच त्या कालींहि आपल्यांतील शहाण्या लोकांचें लक्ष गेलें नाहीं. म्हणून थोडयाच वेळांत ग्रीक लोकांची स्वारी आली होती कीं नाहीं याचा मागमूसहि राहिला नाहीं. युरोपावर मात्र ह्या स्वारीचा परिणाम अगदीं उलट झाला. इकडील व्यापार व संपत्ति, विद्या, शास्त्रें व कलाकौ-

शल्य इत्यादि गोष्टींची झाडून सारी माहिती ग्रीक लोकांनीं युरोपांत नेली. युरोपच्या इतिहासांत निराळेच प्रकार घडून आल्यामुळें सिकंदरानें केलेलें हें काम सुमारें दीड हजार वर्षेंपर्यंत तसेंच पडून राहिलें.

त्या वेळीं हिंदुस्थानांत एकछत्री राज्य नव्हतें. अनेक लहान मोठीं राज्यें असून त्यांची स्थिति चांगली होती आणि लोक सुखांत होते. लोकांच्या चालीरीति, पेहेराव व कलाकौशल्य वगैरेचें सिकंदरच्या वेळचें वर्णन अलीकडच्या शेंपन्नास वर्षांपूर्वीच्या स्थितीला इतकें जुळतें, कीं ह्या दोन हजार वर्षांत त्यांत फारसा फरक पडला नाहीं, असेंच वाटण्याचा संभव आहे. हिंदुस्थानचे ऋतु, येथला ठरीव वर्षाकाल, नद्यांची भरती ओहोटी, त्यांस येणारे पूर व त्यांपासून होणारी वाताहत व त्या वेळचा देखावा, ह्या सर्व गोष्टी आजच्या स्थितीशीं उत्तम जुळतात. ग्रीस देशापासून हिंदुस्थानापर्यंतचा सर्व अफाट प्रदेश एकाच्या ताब्यांत राहणें शक्य नव्हतें. तथापि सगळ्या जातींच्या लोकांस आपपल्या कारभाराची पूर्ण स्वतंत्रता द्यावी, आणि सर्वांस सुख होईल तोच राज्य करण्याचा उत्तम मार्ग होय, हें सिकंदर जाणून होता. ह्यासंबंधानें जवळच्या सल्लागारांचा व त्याचा मोठा विरोध पडला. त्याचा गुरु ॲरिस्टॉट्ल् ह्यानें त्यास सांगितलें कीं, ' ग्रीक लोकांस मात्र तुम्हीं प्रजा म्हणून बरोबरीच्या नात्यानें वागवावें; पण इतर लोक नीच सृष्टींतील समजावे." हें मत सिकंदरास आवडलें नाहीं. लोकांचें मन ओळखण्याची अक्कल गुरूपेक्षां शिष्यासच चांगली होती. म्हणून घरांत बसून तत्त्वशास्त्रावर ग्रंथ लिहिणाऱ्या गुरूचा उपदेश त्यानें मानिला नाहीं. आरबेला येथील विजयानंतर त्यानें स्वतः इराणी पोषाख स्वीकारिला आणि जवळच्या सरदारांसही त्यानें तो पोषाख स्वीकारण्यास लाविलें. त्याचप्रमाणें, 'आमच्या ग्रीक लोकांतील चांगल्या गोष्टी तुम्ही शिका,' असा त्यानें इराणी लोकांस आग्रह केला. स्वतः त्यानें डरायसच्या

मुलीशीं लग्न केलें; आणि आपल्या शंभर सरदारांचीं शंभर इराणी मुलींशीं लग्नें लाविलीं. हे सगळे विवाह मोठ्या थाटानें झाले. एवढ्यानेंच तो थांबला नाहीं. त्यानें राज्याच्या बंदोबस्ताकरितां किल्ले वगैरे बांधून, हिंदुस्थानांतील व्यापाराचा ताबा आपल्या ताब्यांत राहावा अशी तजवीज केली. ह्याच कारणास्तव त्यानें सिंधु नदीचा प्रवास केला, आणि इराणच्या आखातांतून व्यापाराचा मार्ग ठरविला. सिंधुनदीप्रमाणें युफ्रे-टिस व तैग्रिस ह्या नद्यांची त्यानें पाहणी केली. ह्या वेळेस तो अवघा तीस वर्षांचा होता.

सिकंदर मरण पावल्यानंतर त्याच्या राज्याचे तुकडे झाले; आणि हिंदुस्थानच्या लगत्याचा मध्यआशियाखंडांतील सर्व प्रदेश सेनापति सेल्युकस ह्याच्या ताब्यांत आला. सेल्युकस सिकंदरच्या तालमेंत तयार झालेला असून, सिकंदरचीं धोरणें त्यास अवगत होतीं. त्यानें हिंदु-स्थानावर स्वारी करून चंद्रगुप्ताशीं युद्ध केलें. पुढें त्या दोघांचा तह ठरून सख्य झालें. सिकंदरानंतर ४२ वर्षें सेल्युकसनें राज्य केलें. त्यानें आपल्या कारकिर्दींत मेगास्थेनीस नांवाचा एक हुशार वकील चंद्रगुप्ताकडे पाटलीपुत्र येथें पाठविला होता. हा मेगास्थेनीस सिकंदरच्या स्वारीबरोबर पूर्वीं हिंदुस्थानांत आलेला होता. भागीरथी व तिच्या कांठचा सुपीक प्रदेश पाहणारा पहिला युरोपियन गृहस्थ हाच असावा; व बहुतेक उत्तरहिंदुस्थानची अस्सल हकीगत युरोपामध्यें ह्यानेंच प्रथ-मतः नेली. हिंदुस्थानचें ऐश्वर्य पाहून तो अगदीं थक्क झाला. स्ट्रेबो, एरियन (इ. स. ९०—१८०) वगैरे ग्रीक ग्रंथकारांनीं दिलेली हिंदुस्थानची माहिती मेगास्थेनीसपासूनच घेतलेली असावी परंतु मेगास्थेनीसच्या वर्णनांत काल्पनिक व असंभाव्य भाग असल्यामुळें तें सर्वस्वी भरंवशा-लायक नाहीं. तो म्हणतो कीं, 'पाटलीपुत्र शहराची लांबी दहा मैल व रुंदी दोन मैल होती. सभोंवारच्या कोटास ५७० बुरूज होते; व

लोकांचा व्यापार तावडतोब वाढला. पण स्पेनच्या लोकांस सांपडलेली अमेरिका निराळ्या प्रकारची होती. तेथील मुलूख बहुतेक ओसाड होता. राज्यें वगैरे व्यवस्थित नव्हतीं. तेथची संपत्ति उद्भिज्ज व खनिज पदार्थांत गुप्त राहिली होती. ती बाहेर काढण्यास महाप्रयास पडणारे होते. बाकी खाण्यापिण्यास सुद्धां हवें तें मिळत नव्हतें. म्हणून शेती करण्यास व खाणी खोदण्यास आफ्रिकेंतून नीग्रो लोकांस गुलाम करून स्पेनच्या लोकांनीं अमेरिकेस नेलें. हे नीग्रो काम करण्यास मोठे काटक असत. एक नीग्रो चार अमेरिकन लोकांइतकें काम करी. ह्या प्रयासामुळें पोर्तुगीझ लोकांप्रमाणें स्पेनच्या लोकांस अमेरिकेंत आरंभीं कांहींच किफायत झाली नाहीं. त्यांस पहिलीं पन्नास वर्षें केवळ हालांत काढावीं लागलीं. पुढें पुढें त्यांस फायदा होऊं लागला. म्हणूनच पूर्वेकडील वखारी वाढल्या व पश्चिमेकडे वसाहती वाढल्या. वसाहतींच्या योगानें अमेरिका व वखारींच्या योगानें हिंदुस्थान इंग्रजांनीं गडप केलें. हा विरोध विशेष ध्यानांत ठेवण्याजोगा आहे.

पोर्तुगीझ लोकांस हिंदुस्थानचा निराळाच रस्ता सांपडला, ह्या गोष्टीचें सर्व मुसलमानांस अतिशय वैषम्य वाटलें. इजिप्टच्या मुसलमानांनींही पोर्तुगीझ लोकांस शह देण्याचा थोडा प्रयत्न केला नाहीं. रागावलेल्या व्हेनिशन लोकांनींही ह्या कामीं इजिप्टच्या मुसलमानांस मदत केली. व्हेनिशन लोकांचा डालमेशिया म्हणून जो प्रांत होता, त्यांतील लांकडें तोडून त्यांचीं गलबतें बांधण्यास व्हेनिशन लोकांनीं इजिप्टच्या मुसलमानांस परवानगी दिली. अशा रीतीनें मुसलमानांचें मोठें आरमार तयार झालें, पण पोर्तुगीझ गलबतांनीं त्यांचा संपूर्ण नाश करून टाकिला. मुसलमानी मुलखांत जे ख्रिस्ती रहिवासी असतील त्या सर्वांस ठार मारण्याची इजिप्टच्या राजानें दहशतही घातली. पुढें इजिप्ट, सिरिया, पॅलेस्टाईन हे प्रांत कांस्टांटिनोपलचा

तुर्क बादशहा पहिला सलीम ह्यानें जिंकिले व सर्व मुसलमानांचें मिळून एक राष्ट्र बनविलें. त्यानें व्हेनिशन लोकांशीं तह केला, व त्यांस आपल्या राज्यांत व्यापाराच्या विशेष सवलती दिल्या, व लिस्बनहून आलेल्या मालावर जबरदस्त जकात बसविली. तथापि पोर्तुगालची सरशी कायम राहिली. व्हेनिसच्या सरकारानें पोर्तुगालला शरण जाऊन आश्रय मागितला, तो पोर्तुगालनें दिला नाहीं. एवंच व्हेनिसचा नाश होऊन पोर्तुगालचा उदय झाला.

**७. प्राच्य प्रश्नाची किल्ली.**—ह्या एवढ्या हकीगतीवरून हिंदुस्थानचा माल सर्व जगास आज हजारों वर्षें कसा पुरत होता व त्यामुळें सर्व राष्ट्रांस कशी किफायत होत होती हें ध्यानांत येईल. ज्याच्या ताब्यांत हा व्यापार असे, तें राष्ट्र शक्तीनें व वैभवानें सर्वांत मोठें असे. ह्या व्यापाराबद्दल जगांतील सर्व राष्ट्रांची एकसारखी धडपड चालली होती. पोर्तुगीझ, डच, इंग्रज वगैरे लोकांची अलीकडील तीनशें वर्षांतली धडपड आपणास विशेष महत्त्वाची वाटते. पण एकंदर तीन हजार वर्षांच्या काळांत जर ही धडपड चालू होती व तींत शेंकडों राष्ट्रांचा उदय व नाश झाला, तर त्यापुढें ह्या तीनशें वर्षांचे महत्त्व विशेष राहतें असें नाहीं. आपण ज्या कालांत राहतों व ज्यांतील प्रत्येक क्षण अनुभवितों, तो कितीही अल्प असला, तरी आपणांस तो मोठा व महत्त्वाचा वाटतो; पण पाठीमागचा काल हजारों वर्षांचा असतांही त्याची आपणांस बरोबर कल्पना होत नाहीं. ह्या व्यापाराच्या संपत्तीवर शेंपन्नास वर्षांत जर इंग्लंडसारखीं अनेक राष्ट्रें वैभवास चढलीं आहेत, तर मागील हजारों वर्षांत किती राष्ट्रें उदयास आलीं असलीं पाहिजेत ह्याची केवळ कल्पनाच करावी. अशा रीतीनें विचार करितां हिंदुस्थान परदेशाच्या ताब्यांत जाण्याचें एक कारण असें दिसतें कीं, मुसलमानांनीं इजिप्ट,

सिरिया, ग्रीस व कान्स्टांटिनोपल हीं राष्ट्रें जिंकून पश्चिमेकडील युरोपियन राष्ट्रांचा कोंडमारा केला, व त्यांस पूर्वेकडील माल नेण्यास वाटच ठेविली नाहीं. अर्थात् उपासमार झालेला वाघ चवताळून वाट फुटेल तिकडे निघून जातो, त्याप्रमाणें युरोपियन राष्ट्रांची स्थिति झाली. मुसलमानांनीं तांबड्या व काळ्या समुद्रांवरचा व्यापाराचा रस्ता युरोपियनांस खुला ठेविला असता तर, कदाचित् पूर्वीचा व्यापाराचा क्रम तसाच चालू राहिला असता. तसेंच हजारों वर्षें ह्या हिंदुस्थान देशांतला माल बाहेर खपल्यानें ह्या देशांत किती संपत्ति जमली असेल ह्याची कल्पना होणें अशक्य आहे. व्हेनिस, फ्लॉरेन्स, लिस्बन त्यांची वर वर्णिलेली धनसंपन्नता हिंदुस्थानच्या पुढें कांहींच नव्हती.

युरोपच्या अर्वाचीन प्रगतीचा आरंभ ह्या वर सांगितलेल्या झटापटींत झाला आहे. पोर्तुगीझ लोकांस हिंदुस्थानचा जलमार्ग सांपडला ह्याबद्दल इतर राष्ट्रांस वाईट वाटून, त्यांचा सोळाव्या व सतराव्या शतकांत समुद्रावर निकराचा झगडा सुरू झाला. हा 'पूर्वेकडील प्रश्न', म्हणजे पूर्वेकडील राष्ट्रांवर आपलें वर्चस्व बसवून तेथच्या व्यापारावर आपण सधन होण्याचा मार्ग, ही चढाओढ व झटापट आज अनादिकालापासून अव्याहत चालली आहे. हिंदुस्थानास जाण्याचा जलमार्ग सांपडल्यावरही ती चढाओढ ज्यास्तच निकरानें चालली. तींत कित्येक पूर्वराष्ट्रें पाश्चिमात्यांच्या ताब्यांत गेलीं, तरी ही झटापट संपली नाहीं. ती चालू ठेवण्याविषयीं चेंबर्लेन इंग्लंडांतून, कर्झन वगैरे मुत्सद्दी हिंदुस्थानांतून, जपान पूर्वेकडून, रशिया उत्तरेकडून, आपापल्यापरी नवीन नवीन युक्त्या काढून झगडत आहेत. जगाच्या राजकीय इतिहासाची मुख्य किल्ली ही आहे. झगडा व झटापट एकच. मात्र त्यांत पडणारीं पात्रें निरनिराळ्या वेळीं निरनिराळीं होत आलीं आहेत. ही सगळी झटापट इराण, हिंदुस्थान, चीन वगैरे सुपीक देशांतील जिन-

सांबद्दल व कारागिरीबद्दल आहे हें आपण विसरतां नये. आपल्याबद्दल लोकांची काय धडपड चालली आहे, किती लोक तलवार उपसून जिवावर उदार झाले आहेत, कितीकांनीं मगरमिठी मारिली आहे, इत्यादि प्रकार डोळ्यांत तेल घालून पाहणें हें आज आपलें काम आहे. कान्स्टांटिनोपल, कायरो, कंदाहार, काबूल, पेकिन, वाटेल तें ठिकाण घ्या; ह्या ठिकाणीं चाललेलीं कारस्थानें व परराष्ट्रांच्या घडामोडी केवळ व्यापाराच्या किफायतीकरितां होत. हा व्यापार हिंदीमहासागरांतला व जलमार्गानें चालणारा होय. मसाले, सुगंधी द्रव्यें, रंग, तेलें, तैलबीजें, पटतंतु, औषधी, धान्यें, द्विदळें, लांकूड, व दुसरा अनेक प्रकारचा होणारा कच्चा माल, हिंदुस्थान, पूर्वेकडील द्वीपकल्प, पूर्वेकडील द्वीपसमूह, चीन व पूर्वआफ्रिका, इत्यादि प्रदेशांतून युरोपांत अतिस्वस्त दरानें आणून, त्यांचे नानातऱ्हेचे उपयोगी पदार्थ बनवून, ते सर्व जगास होईल तितके महाग विकावे व ह्या घडामोडीवर आपल्या राष्ट्राचा निर्वाह उत्तम रीतीनें चालवावा, हा ह्या वेळच्या सर्व युरोपीय घडामोडींचा मूळ उद्देश आहे. प्रोफेसर रामसे म्हणतो, " जगाच्या इतिहासाचा एकंदर ओघ पाहिला असतां, असें दिसून येईल कीं, आशिया व यूरोप ह्या दोहोंच्या संघट्टनापासून नेहमींच एक प्रकारची जबरदस्त विद्युच्छक्ति उत्पन्न होत असते; ह्या विद्युच्छक्तीपासून सर्व जगाच्या व्यवहारांस चलन मिळत आहे. जगाच्या प्रगतीचें ह्यासारखें दुसरें कोणतेंही कारण इतिहासांत आढळून येत नाहीं. ( Contemporary Review, July 1906. ) सर वॉल्टर रॅले म्हणतो, " ज्याच्या ताब्यांत समुद्र, त्याच्या ताब्यांत व्यापार; ज्याच्या ताब्यांत जगाचा व्यापार, त्याच्या ताब्यांत जगाची संपत्ति, म्हणजे प्रत्यक्ष सर्व जग."*

* Whosoever commands the sea, commands the trade; whosoever commands the trade, commands the riches of the world, and consequently the world itself.—Raleigh.

# प्रकरण तिसरें.

## मलबारची प्राचीन हकीगत.



१. **मलबारचें महत्त्व.**—युरोपियन लोकांचा प्रवेश प्रथम मलबारांत झाला. सोळाव्या शतकांत पोर्तुगीझ लोकांनीं बहुतेक मलबार किनारा जिंकिला व तेथें आपलें राज्य स्थापिलें. मलबारप्रांत हिंदुस्थानांतील इतर भागांहून अगदीं अलग होता. नुसत्या सृष्टरचनेनेंच तो अलग होता असें नाहीं, तर तेथची राज्यव्यवस्था व लोकांच्या रीतिभाती ह्यांतही तो प्रांत अगदीं भिन्न व तुटक होता. त्यामुळें परकीय सत्ता तेथें स्थापन होण्यास उशीर लागला नाहीं. पोर्तुगीझांच्या अगोदरच आरब मुसलमानांनीं व ख्रिस्ती वगैरे इतर परकी लोकांनीं हा प्रांत घेरून टाकिलेला होता. हा सर्व प्रकार व तेथची तत्कालीन व प्राचीन अंतःस्थिति स्पष्टपणें समजल्याशिवाय हिंदुस्थानांतील युरोपियन राज्य-स्थापनेची मीमांसा स्पष्ट होणार नाहीं. शिवाय मूळच्या संस्था उत्कृष्ट असूनही, परकीय अंमलाखालीं त्यांची दुर्दशा कशी होते हें मलबारच्या हकीगतीवरून चांगलें दिसून येणार आहे. ऐतिहासिक दृष्टया मलबारची पूर्वपीठिका अतिशय मनोरंजक असून तेथच्या राज्यपद्धतींत प्रजासत्ताक तत्त्वें चालू होतीं, म्हणून विषयांतर करूनही मलबारचा प्राचीन इतिहास येथें सविस्तर देणें इष्ट वाटतें.

हिंदुस्थान देश उत्तरेकडून हिमालयाच्या प्रचंड तटानें व इतर बाजूं-कडून समुद्रानें वेष्टित असल्यामुळें तो सर्वथैव दुर्भेद्य आहे असा सामान्य

समज होता. फक्त वायव्येकडून एक द्वार आहे, त्यांतूनच सर्व शत्रु हिंदुस्थानांत आले. पण युरोपियन लोक इकडे येण्यापूर्वी समुद्रमार्गही दुर्भेद्य होता असें सामान्यतः पाश्चिमात्य ग्रंथकार लिहितात. त्यांच्या म्हणण्याचा भाव इतकाच कीं, समुद्रमार्गानें हिंदुस्थानांत प्रवेश करणें ही गोष्ट युरोपियन लोकांनींच साध्य केली. पण वस्तुस्थिति अशी नाहीं. मनुष्याच्या बुद्धिप्रभावास कोणतीच गोष्ट दुर्भेद्य नाहीं. वायव्येकडील कोंपऱ्याखेरीज हिमालयाच्या चंबीखोरींतून दुसरें एक द्वार आहे, त्यांतून नुकतीच इंग्रज फौज तिबेटांत गेली. ह्याच मध्यद्वारानें बुद्धधर्माचे यति धर्मप्रसाराकरितां तिबेटांत गेले होते. समुद्राविषयीं म्हटलें तर, हिंदुस्थान देश पोर्तुगीझ लोकांनीं विलक्षण साहस करून शोधून काढिला हा गर्व मिथ्या आहे. हिंदुस्थान देश कांहीं हरवला नव्हता; किंवा त्याची दुसऱ्या कोणास ओळख नव्हती असेंही नाहीं. पोर्तुगीझ लोकांचा पराक्रम इतकाच कीं, युरोपाचीं जहाजें युरोपाचा किनारा सोडून मध्यें कोठेंही अटकाव न होतां, थेट हिंदुस्थानच्या किनाऱ्यावर आलीं. नाविकविद्येंत त्या वेळीं युरोपियनांच्या बरोबरीचे, किंबहुना, त्यांहून सरस खलाशी इकडेही होते. प्राचीन ग्रीक किंवा फिनिशन खलाशांची गोष्ट सोडिली, तरी पोर्तुगीझांचा उदय होण्यापूर्वी तीन-चारशें वर्षें आरब लोकांनीं दर्यावर्दी कामांत विलक्षण प्रावीण्य संपादिलें होतें, जपानच्या किनाऱ्यापासून तों भूमध्यसमुद्रापर्यंत त्यांचा संचार होता. जपानपासून ऑस्ट्रेलियापर्यंत याम्योत्तर प्रवासाची ज्यांना धास्ती वाटली नाहीं, ते आफ्रिकेला वळसा घालण्याला भ्याले असते असें नाहीं. मात्र आफ्रिकेच्या दक्षिणेस व्यापाराचें संधान नसल्यामुळें व इजिप्टमधून भूमध्यसमुद्रांत त्यांचा संचार सहज होत असल्यामुळें, ते आफ्रिकेच्या दक्षिणेस वळसा घालण्याच्या भरीस पडले नाहींत. तथापि आरबांसारख्या दर्या-

बर्दी लोकांचेंच टप्याटप्यांनीं साह्य घेऊन पोर्तुगीझ खलाशी पूर्वेकडे येऊं शकले. सारांश, आरब किंवा दुसरे प्राच्य लोक खलाशाच्या कामांत प्रवीण होते, तरी हिंदुस्थान देशाची संपत्ति धुऊन स्वदेशास न्यावी, अशी स्वार्थमूल कल्पना पोर्तुगीझांच्या पूर्वी हिंदुस्थानांत येणाऱ्या कोणत्याही परकीय लोकांच्या मनांत नव्हती. युरोपियनांनीं हिंदुस्थानांत येऊन निराळाच प्रकार आरंभिल्यामुळें, त्यांच्या कृतीस महत्त्व आलें; व इकडील लोकांच्या कृति त्यांपुढें लोपून गेल्या. पंधराव्या शतकांत युरोपियन व प्राच्य लोक नौकागमनांत सारखेच कुशल असतां, पुढें युरोपियनांची प्रगति व प्राच्यांची पिछेहाट कां झाली ह्याचा विचार तत्कालीन स्थितीच्या साह्यानें करूं लागलें तर असें दिसतें, कीं प्राच्य लोक संपन्न व सुव्यवस्थित असल्यामुळें, त्यांस लोकांच्या तोंडाकडे पाहण्याची जरूर कधीं भासली नाहीं. अर्थात् परधन व परदेश ह्यांजविषयीं अभिलाषबुद्धि त्यांच्या ठिकाणीं उत्पन्न न झाल्यामुळें साहस करून त्यांस कांहीं ज्यास्त प्राप्त करून घ्यावयाचें नव्हतें. उलट पक्षीं आरब लोक मध्यें पडल्यानें युरोपियनांच्या पोटास जो चिमटा बसला, त्यानें त्यांस बाह्य संचार करण्यास अतीव प्रोत्साहन दिलें, व जिवावर उदार होऊन ते धडपड करूं लागले; त्यामुळें त्यांची प्रगति होत गेली. ही धडपड कशाची आहे व हिचा पुढें परिणाम काय होईल ह्याची पर्वाच प्राच्यांना करावीशी वाटली नाहीं. म्हणजे प्रगति होण्याची पात्रताच आमच्यांत नव्हती, किंवा युरोपियन लोकांची बुद्धिमत्ताच अलौकिक होय, अशांतला प्रकार हिंदुस्थानचा नव्हता.

हिंदुस्थानच्या पश्चिम किनाऱ्यास मलबार किनारा असें नांव आहे. ह्या किनाऱ्यास समांतर, समुद्रापासून तीसएक मैल अंतरावर सह्याद्रि पर्वताची लांबच लांब ओळ असून, तिच्या योगानें ही समुद्रपट्टी मुख्य

भूप्रदेशापासून अलग झाली आहे. सुरतेपासून सुरुवात केली तर ह्या पट्टींत उत्तरकोंकण म्हणजे ठाणें व कुलाबा जिल्हे. दक्षिणकोंकण म्ह० रत्नागिरि जिल्हा, सांवतवाडी संस्थान, गोमंतक, उत्तरकानडा, दक्षिण-कानडा, मलबार, कोचीन व त्रावणकोर हे प्रांत अनुक्रमें येतात. मलबारच्या पूर्वभागीं म्हैसूर व कुर्गप्रांत आहेत. ह्या किनाऱ्यावरील मुख्य बंदरें अनुक्रमानें—सुरत, दमण, डाहाणू तारापूर, माहीम, वसई, ठाणें, मुंबई, अलीबाग, जंजिरा, रत्नागिरी, विजयदुर्ग, मालवण, वेंगुर्लें, पणजी, मार्मागोवा, कारवार, कुमठा, होनावर, भटकळ, ( शेव-टचीं तीन उत्तरकानड्यांत ); मंगळूर ( दक्षिणकानडा ), काननूर, तेलिचरी, माही, कालिकोट, पुनानी ( मलबार ), कोचीन, को-लम, ( म्ह० किलोन ); अंजनगो, त्रिवेंद्रम, आणि कामोरीन. पुढील हकीगतींत ह्यांपैकीं कित्येकांचा उल्लेख येणार आहे, म्हणून हीं नांवें येथें दिलीं आहेत.

**२. मलबारची पूर्वपीठिका.**—मलबारचें जुनें नांव केरल असें होतें. प्राचीन काळीं चेर, चोल व पांड्य अशीं तीन राज्यें दक्षिणेंत होतीं. त्यांपैकीं चेर म्हणजेच केरल असें शोधकांनीं ठरविलें आहे. चेरनाड नांवाचा हल्लीं मलबारांत एक तालुका आहे, त्याचें नांव 'केरल' वरूनच आलें असावें. अशी एक आख्यायिका आहे कीं, पूर्वीं परशुरामानें समुद्र मागें हटवून मलबारची जमीन उत्पन्न केली; आणि तेथें चातुर्वर्ण्याची स्थापना केली. त्यानें चौसष्ट गांव वसवून चारचार गावांचा एक भाग असे सोळा भाग केले दरएक भागांतील लोकांनीं आपणांपैकीं एक अंमलदार त्या भागाचा कारभार करण्या-साठीं नेमावा; त्यानें तीन वर्षेपावेतों कारभार करावा; आणि त्याच्या खर्चास एकंदर जमिनीचा सहावा भाग लावून द्यावा, अशी आरंभीं वहिवाट होती. पण हे अंमलदार तीन वर्षांनीं बदलत असल्यामुळें

तेवढ्या अवधींत ते वाटेल तसा जुलूम करीत. हा जुलूम बंद करण्याकरितां सर्व लोक तिरुनावायी ह्या स्थळीं जमले तेथें सर्वांनीं एक राजा पसंत केला. त्यास ते पेरुमाळ असें म्हणत. पेरुमाळ म्हणजे मोठा किंवा परमेश्वर. पेरुमाळानें बारा वर्षें राज्य करून आपलें राज्य सोडावें व पुनः मोठा समारंभ होऊन लोकांनीं नवीन राजा पसंत करावा, असा प्रघात होता. ही गोष्ट इ० स० २१६त घडली असें समजतात. हा राजा कोडुंगलूर ऊर्फ क्रांगानूर येथें राज्य करी. ह्याप्रमाणें चेरच्या राजाचें नांव पेरुमाळ असें पडलें. हें नांव अशोकाच्या शिलालेखांत सांपडतें. तथापि ह्या गोष्टींस दंतकथेपलीकडे दुसरा आधार नाहीं.

ऐतिहासिक माहिती इतकीच मिळते कीं, मलबार किनाऱ्यावर रोमन लोकांचा व्यापार चालत असे. मलबारांत व त्रावणकोरांत रोमन लोकांचीं पुष्कळ नाणीं सांपडलीं आहेत. विद्वानांच्या शोधांवरून असें कळतें कीं, इ० स०च्या चवथ्या शतकांत मलबारावर कांची येथील पल्लव राजांचा ताबा होता. तो थोड्याबहुत अंशानें चौदाव्या शतकापर्यंत चालला. पल्लवांच्या वेळेस चिनी प्रवासी फाहियान मलबारांत आला होता, त्यानें त्या राज्याची हकीगत लिहिलेली आहे. इ० स०च्या सातव्या शतकांत वातापी ऊर्फ बादामी येथील चालुक्य राजांनीं मलबारावर स्वारी करून पल्लवांचा पराभव केला. पण त्यांची सत्ता मलबारांत चालू होण्यापूर्वींच त्यांस राष्ट्रकूटांनीं जिंकिलें. हे राष्ट्रकूट मलबारांत कांहीं दिवस प्रबळ होते. परंतु सर्व प्रांतांत नायर लोकांचीं मजबूत ठाणीं व लहान लहान राज्यें बनलेलीं असल्यामुळें, राष्ट्रकूटांचा अंमल चांगला बसला नाहीं. हे नायर लोक मूळचे तामील असून पूर्वकिनाऱ्यावरून मलबारांत येऊन राहिले होते. ते कधीं आले हें निश्चित नाहीं. मि० एलि-

सचें म्हणणें असें आहे कीं, इ० स० ३८९च्या सुमारास हे लोक मलबारांत आले व त्यांनीं तो प्रांत आपसांत वांटून घेतला.

**३. मलबारांतील लोक, ब्राह्मण व नायर**—नंबुतिरी ब्राह्मण, नायर, मापला मुसलमान, व ख्रिस्ती अशी चार प्रकारची मलबारची मुख्य लोकसंख्या आहे; व ह्या प्रत्येकींत अनेक पोटभेद. आहेत. हिंदुस्थानच्या इतर भागांत आर्यांचें व त्यांच्या सुधारणेचें वजन जसें हरएक बाबतींत दिसून येतें, तसें तें मलबारांत दिसून येत नाहीं. ह्याचे परिणाम काय झाले हें सूक्ष्म विचारानें ठरविलें पाहिजे. आर्यांची चातुर्वर्ण्यसंस्था हिंदुस्थानांतील इतर भागांप्रमाणें मलबारांत नाहीं. आर्यांच्या जातिव्यवस्थेचा उगम कुटुंब होय. कुटुंब हा मूळ पाया समजून त्यावर पुढें त्यांनीं समाजरचना बसविली. ह्यासाठीं त्यांनीं समाजाचे चार मुख्य भाग करून त्यांजकडे चार कर्तव्यें पृथक्पणें वांटून दिलीं. ही कामाची वांटणी कालांतरानें इतकी स्पष्ट व पृथक् झाली कीं, दोन पक्षांचे क्षत्रिय लोक एकमेकांशीं लढत असतां, एकीकडे ब्राह्मण तपश्चर्या करीत असे, व दुसरे बाजूस कुणबी शेत नांगरीत असे, पण त्या झगड्यांत आपण पडावें असें कोणाच्याही बुद्धीस येत नसे. ( लोगन ). ह्यामुळेंच परकीय लोकांचे हल्ले आले असतां, देशांतील सर्व लोक स्वदेशसंरक्षणार्थ शत्रूवर उठल्याचें उदाहरण आपल्या प्राचीन इतिहासांत फारसें नाहीं. कारण देशरक्षणाचें काम क्षत्रियांचें असें इतर जाती समजत. आर्यांच्या व्यवस्थेनें समाजाची सुधारणा व भरभराट झाली त्याचें कारण हें प्रत्येक कसब चांगलें नांवारूपास आलें, तेणेंकरून प्राचीन आर्यांची प्रगति अतिशय झालेली दिसते. पण मलबारांतील समाजव्यवस्था अगदीं अलीकडची आहे. तेथचे नंबुतिरी ब्राह्मण इसवीसनाच्या आठव्या शतकांत बाहेरून तेथें आले. त्याच्या पूर्वी तेथें जैन लोक मात्र उत्तरेंतून आले होते व त्यांनींच आर्यांची

सुधारणा थोडीबहुत तेथें आणली होती. त्यांनीं निरनिराळ्या धंदेवाल्या लोकांचे समाज, म्हणजे ज्यांस गिल्ड्स् असें इंग्रजींत म्हणतात, ते मलबारांत स्थापिले. ह्या संघांस आरंभीं धर्माचें स्वरूप नव्हतें. तें आठव्या शतकांत ब्राह्मणांनीं दिलें, व जातींचीं बंधनें दृढ केलीं. हे ब्राह्मण वैदिक म्हणजे वेदाध्ययन करणारे असून, वेदांप्रमाणेंच त्यांचे विभाग आहेत. प्रसिद्ध शंकराचार्य हा मूळचा मलबारांतील नंबुतिरी ब्राह्मण होय. मलबारांतील ब्राह्मण शंकराचार्यांचेच अनुयायी आहेत. नंबुतिरी ब्राह्मणांचे दहा 'ग्राम' म्हणजे शाखा आहेत. प्रत्येक ग्रामावर सहा अधिकाऱ्यांची लोकनियुक्त सभा असे. तिच्या अध्यक्षास 'स्मार्त' म्हणत, व सभासदांस 'मीमांसक' म्हणत. ह्या सभेकडे जातींतील सर्व तंटे तोडण्याचें काम होतें. मात्र तंट्यांचा तपास करण्यास प्रांताच्या राजाची परवानगी लागे.

मलबारांतील दुसरी मुख्य जात नायरांची होय. नायर म्हणजे लोकांचे नायक. हेच देशसंरक्षक होत. हे आर्य नव्हत. मलबारांत आर्यांची संख्या फारच थोडी आली व देशसंरक्षणाकरितां क्षत्रिय लोक पुरेसे नसल्यामुळें नवीन क्षत्रिय जात त्यांस बनवावी लागली. म्हणून नायर म्हणजे क्षत्रियांचें काम करणारा शूद्र. हा शब्द 'नी' धातूपासून आला असावा. राज्यव्यवस्थेच्या सोयीसाठीं देशाचे निरनिराळे विभाग केलेले होते, त्यांस 'नाड' असें म्हणत. 'नाड' म्हणजे नायरांच्या अधिकाराचा टापू. प्रत्येक नाडांत सहाशें कुटुंबें असत, आणि प्रत्येक कुटुंबांतील एकएक इसम घेऊन 'षट्शत' (म्ह० सहाशें) ह्या नांवाची एक परिषद् असे. ह्या सभेकडे नाडाच्या सर्व व्यवस्थेचें काम होतें. सरकारचे कर वसूल करणें, लष्कर ठेवून प्रांताचें संरक्षण करणें, पोटशाखांकडून कामें करवून घेणें व लोकांच्या तंट्यांचा निकाल करणें, हीं कामें ह्या सभेकडे होतीं. अर्थात् नाड ह्मणजे प्राचीन

ग्रीकलोकांसारखेंच स्वतंत्र प्रजासत्ताक राज्य होय. हल्लीं सुद्धां मलबारांतील तालुक्यांचीं नांवें 'एरनाड' 'वल्लुवनाड' अशीं आहेत. नाडाच्या पोटभागास 'तर' असें म्हणत. तेरु म्हणजे गल्ली हा शब्द 'तर' शब्दावरून आला आहे. आरंभीं चार कुटुंबांचा एक 'तर' असे, म्हणजे एका नाडांत सवाशें 'तर' असत. तराच्या मुख्य व्यवस्थापकास कर्णवर ( karnavara ) असें नांव होतें. 'षट्शत 'सभेंत ह्या कर्णवरांचा समावेश होता. मुख्यस्थ, मध्यस्थ व प्रमाणी असे ह्या कर्णवरांचे तीन विभाग असत. प्रत्येक नाडावर सर्वानुमतें निवडलेला एक अधिकारी असे व सर्व नाडांनीं मिळून एक सार्वभौम राजा नेमण्यांत येत असे.

ही मलबारांतील विशिष्ट राज्यपद्धति ध्यानांत ठेवण्याजोगी आहे. स्वराज्याचा पूर्ण अधिकार नाडांच्या सभांकडे असल्यामुळें राजांचा किंवा अधिकाऱ्यांचा लोकांवर जुलूम होण्यास सवड नसे. तेलिचरी येथील इंग्रज वखारीच्या दुभाष्यानें आपल्या रोजनिशींत, ता. २८ मे, स. १७४६ रोजीं खालील मजकूर लिहिला आहे. "हे नायर म्हणजे कालिकोटच्या प्रजेचे मुखत्यार होत. ह्या मुखत्यारांचा संघ म्हणजे आपलें केवळ पार्लमेंट होय. हे संघ राजांचे हुकूम निमूटपणें ऐकून घेतात असें नाहीं; व राजांचे अंमलदार अन्याय करूं लागले तर त्यांस शिक्षा करण्याचा अधिकार ह्या संघांकडे आहे." नाडांच्या ह्या सभेस 'कुट्टं' असें नांव होतें. ही कुट्टं सभा एक जुटीनें काम करी व तिचें वजन अतिशय असे. स्वारी, शिकार, युद्ध, पंचायत वगैरे हरएक महत्त्वाच्या प्रसंगीं ही सभा भरत असे. ह्या सभेस डोळा, हात व हुकूम ( the eye, the hand, the command ), अशा लाक्षणिक संज्ञा होत्या. म्हणजे लोकांकडून वसूल गोळा करणें, त्यांचे परस्पर हक्क शाबूद राखणें, व सर्वांचे आचार बरोबर चालविणें हीं

कामें ह्या सभेचीं होतीं. कानड्याच्या दक्षिणेस सर्व किनाऱ्यावर व विशेषत: मलबारांत ही राज्यव्यवस्था चालू होती. स. १७९१ त मलबारांत ब्रिटिश राज्य सुरू झालें, तेव्हांच ही व्यवस्था मोडली. ती मोडली नसती तर, हें एक प्रकारचें स्वतंत्र स्वराज्य कायमचें टिकलें असतें, असा अनेक पाश्चात्य ग्रंथकारांचा अभिप्राय आहे.

नायरांशिवाय गणक म्हणजे ज्योतिषी, शिक्षक, सुतार लोहार, गवई, धोबी वगैरे अनेक जातींचे लोक होते. ह्या सर्व धंद्यांच्या लोकांनीं ग्रामसंस्था पूर्ण झाली होती. अशाच प्रकारची ग्रामसंस्था थोड्याबहुत फरकानें हिंदुस्थानांत चालू होती. 'तीयर' नांवाची दुसरी एक शेतकऱ्यांची माळ्यासारखी जात असून ते मूळचे सीलोनांतून मलबारांत आले असें सांगतात. ह्या जातीचे बायकापुरुष स्वरुपानें सुंदर व स्वच्छ असून त्यांच्या बायका युरोपियन लोकांबरोबर राहिल्या असतां, त्यांस बहिष्कार नसतो, ह्या कारणास्तव त्यांच्यांत आतां युरोपियन रक्ताची बरीच भेसळ झाली आहे. त्यामुळें लोकांचा वर्णही बराच पालटला आहे. ह्यास्तव युरोपियन लोकांस ते लोक फार आवडतात. ह्यांशिवाय हजाम, बुरूड, छत्र्या करणारे, चेरुमार म्हणजे गुलामांच्या सारखे लोक, आणि बाटलेले मुसलमान व ख्रिस्ती लोक मलबारांत पुष्कळ आहेत.

वर सांगितलेंच आहे कीं, नायर लोकांची विशिष्ट प्रकारची स्वतंत्र राज्यव्यवस्था बहुत शतकें मलबारांत चालू होती. पुढें जसजसे नवीन लोक मलबारांत आले, तसतसा त्यांचाही त्या राज्यव्यवस्थेंत समावेश होऊन, त्यांस इतरांचे हक्क प्राप्त झाले. ज्यू व ख्रिस्ती लोकांनीं मलबारांत वसाहती केल्या व त्यांचें माहात्म्य वाढलें, तेव्हां त्या लोकांसही राजांनीं कांहीं विशिष्ट हक्कांच्या सनदा करून दिल्या. अशा तीन सनदांचे कोरीव लेख मल्याळी भाषेंत लिहिलेले अलीकडेस उप-

लब्ध झाले आहेत. त्यांच्या खरेपणाविषयीं संशय घेण्यास जागा नसल्या-मुळें त्यांजवरून तत्कालीन राज्यपद्धतीची बरीच माहिती मिळते. त्या सनदा ह्या:——

१ **सनद पहिली,** ( इ. स. ७०० ). हींत भास्कर रविवर्मा नांवाच्या राजाचा उल्लेख आहे.

२ **सनद दुसरी,** ( इ. स. ७७४ ). हींत वीरराघव चक्रवर्ती ह्याचा उल्लेख आहे.

३ **सनद तिसरी,** ( इ. स. ८२४ ). हींत स्थाणुरविगुप्त राजाचा उल्लेख आहे.

ह्या तीनही सनदांतील लेखांचा विद्वानांनीं उलगडा करून अर्थ बसविला आहे. पहिल्या सनदेंत ज्यू लोकांस हक्क दिले आहेत; दुसरींत उत्तरेकडच्या ख्रिस्ती लोकांस व तिसरींत दक्षिणेकडील ख्रिस्ती लोकांस विशिष्ट हक्क दिले आहेत.

'मार सोपार' नांवाचा एक ख्रिस्ती गृहस्थ इ. स. ८२२ त बाबिलोनहून हिंदुस्थानांत 'कोलम' येथें आला. त्यानें तेथील अधि-काऱ्यांच्या मार्फत मलबारांतील आपल्या ख्रिस्ती धर्मबांधवांची व्यवस्था लावून घेतली. ही हकीगत इतिहासांतरीं आहे. पण वरील तिसऱ्या सनदेंत 'मरुवान सापीर इसो, इें नांव आहे. तें व वरचें 'मार सोपार' हीं एकच असावीं. ह्या लेखांवरून चेर ऊर्फ केरल देशाची मर्यादा सामान्यत: कालिकोटपासून कोलमपर्यंत होती असें दिसतें. वरील सन-दांत राजांचीं नांवें आहेत, तीं तेथच्या पेरुमाळ राजांचींच नांवें असावीं. शेवटचा स्थाणुरविगुप्त हाच पुढें सांगावयाचा चेरमान पेरुमाळ होय. त्याच्या नांवावरून तो बहुधा कोंकणांतील मौर्यवंशाचा असावा. सन-दांवर त्या त्या भागांतील मांडलिक राजांच्या व इतर साक्षी आहेत.

त्यावरून व एकंदर रचनेवरून नायरांच्या नाडांना जे राज्यांत हक्क होते, तेच ज्यू व ख्रिस्ती लोकांस ह्या सनदांनीं दिले आहेत. ह्या लोकांचा एक पृथक् समाज म्ह० नाड बनवून त्यांजवर त्यांच्याच जातीचा एक अंमलदार नेमण्यांत आला. त्याचा अधिकार वंशपरंपरेनें चालावयाचा होता. त्यास छत्री, मशाल, पालखी, शिंग, नौबत वगैरे बहात्तर प्रकारचा इतमाम होता. शिवाय दुसरे हक्क आहेत. 'मरुवान सापीर इसो' ह्यानें कांहीं जमिनींतील पाण्याचे हक्क विकत घेतले. नायरांच्या नाडाप्रमाणें ज्यू व ख्रिस्ती लोकांची 'षट्शत' सभा बनविण्यांत आली; म्ह० इतर जातींचे गिल्ड म्ह० संघ होते, तसेच ह्याही लोकांचे संघ निर्माण झाले. सर्वांच्या संमतीनें हे हक्क देण्यांत आले म्हणून सर्वांच्या साक्षी सनदांवर घातलेल्या आहेत. अशा प्रकारें ख्रिस्ती व ज्यू लोकांवर सार्वजनिक संस्थांची जबाबदारी सोंपून त्यांच्या संघपतींस इतरांप्रमाणें सार्वजनिक उत्पन्नाचा हिस्सा वंशपरंपरा तोडून देणें, ह्या गोष्टींस सर्वांची संमति मिळविण्यांत आली होती.

सनदांतील मजकुरावरून असें दिसतें कीं, सार्वभौम सरकारानें आपल्या हातांत फारच थोडी सत्ता ठेविली होती. प्रांतोप्रांतीं निरनिराळ्या सभा नेमून त्यांजकडे राज्यकारभार सोंपलेला होता. सर्वांचा मुख्य सार्वभौम राजा म्हणजे पेरुमाळ, त्याच्या हाताखालीं संघपति म्हणजे प्रांतिक सभेचा मुख्य ऊर्फ मांडलिक राजा. "ब्राह्मणांच्या दोनही संघांच्या संमतीनें हा लेख मंजूर केला आहे," असे शब्द सनदांचे शेवटीं आहेत. अर्थात् ब्राह्मणांचेही संघ होते व नवीन संघ बनवितांना ब्राह्मणसंघांची संमती घ्यावी लागे असें दिसतें. हिंदुस्थानच्या इतर भागांत ग्रामसंस्था होत्या, पण मलबारांतील ही राज्यपद्धति विशेष आहे. ह्या पद्धतीमुळें लोकांवर सार्वभौमाचा किंवा संघपतीचा जुलूम होणें शक्य नव्हतें. देशांत व्यापाराच्या किंवा अन्य कारणानें

नवीन लोक येऊन राहिले व त्यांची भरभराट झाली, म्हणजे त्यांस राज्यकारभाराचे हक्क देणें, व त्यांची व्यवस्था त्यांच्याच हातांत सोपणें, हें आपलें कर्तव्य होय, असें तत्कालीन राज्यकर्ते समजत. ख्रिस्ती, ज्यू वगैरे परकीय लोकांसही आपापल्या समाजापुरते व इतर समाजांच्या आड न येतील असे हक्क तोडून देऊन, सर्वांस स्वतंत्रतेनें व शांततेनें वागूं देण्याची सोय मलबारांत पूर्वीं होती. आजच्या हिंदुस्थान सरकाराची राज्यपद्धति ह्या जुन्या पद्धतीशीं तोळून पहावी. जे हक्क आम्हांस देण्यास ख्रिस्ती सरकार आज तयार नाहींं, ते हक्क आमच्या पूर्वजांनीं ख्रिस्ती व ज्यू लोकांस दिले होते. सन १८०४तील लॉर्ड वुइल्यम बेंटिंकचा एक असा उल्लेख आहे. 'मलबारच्या लोकांस स्वातंत्र्याची चाड फार आहे. ते कधीं जुलूम सहन करावयाचे नाहींत. चांगली वागणूक म्हणजे काय हें त्यांस उत्तम समजतें. न्यायासनाविषयीं व प्रचलित प्रघातांविषयीं त्यांस अतिशय पूज्यबुद्धि वाटते. शेतीचें काम ते मोठें सन्मान्य समजतात. शेतकऱ्यांपासून अंमलदारांनीं वसूल घेण्याचे नियम फार व्यवस्थेशीर ठरविलेले आहेत'

वरील तीन सनदांपैकीं दुसरीवर मात्र ब्राह्मणांची संमति आहे; पहिलीवर व तिसरीवर नाहीं. पहिल्या दोहोंतील संघ कोडूंगलूरच्या जवळचे असून तिसरींतील संघ दक्षिण त्रावणकोरांतील कोलमच्या जवळचा आहे. त्रावणकोरांत वैदिक ब्राह्मण फारसे नाहींत व त्या वेळींही नव्हते. वैदिक ब्राह्मण नंबुतिरी ह्यांचा जमाव मलबारांत विशेष आहे. पहिली सनद ७००तली व दुसरी ७७४तली असल्यामुळें, ह्या दोन सालांच्या दरम्यान नंबुतिरी ब्राह्मणांचा प्रवेश मलबारांत झाला असावा. ते दक्षिण कानड्यांतून आठव्या शतकांत मलबारांत आले.

नायरांमध्येंही पोटभेद आहेत. त्यांची राहणी स्वछ आहे. बायकांना स्वतंत्रता असून त्या समारंभांत पुरुषांप्रमाणेंच उघडपणें बाहेर येतात.

त्यांच्यांत स्वयंवराची चाल असून स्त्रिया प्रौढ झाल्यावर त्या आपला पति पसत करितात.[1]

'मलबारांतील लोक नेहमींच लढाऊ बाण्यानें राहतात. ते फार सभ्य आहेत. सातव्या वर्षी त्यांस कसरतीच्या शाळेंत घालून हत्यारांचा उपयोग शिकवितात. कसरतीनें त्यांचें अंग इतकें लवचिक होऊन जातें कीं, जणूं काय त्यांत हाड असें नाहींच. हे लोक नेहमीं अंगास तेल लावितात. त्यांस हत्यारांचा अभिमान विशेष आहे. हत्यार घेतल्याशिवाय ते बाहेर पडत नाहींत. खून झाला तर मयताच्या मुलानें किंवा नातेवाइकानें शत्रूचा प्राण घेतलाच पाहिजे, असा त्यांचा संप्रदाय असे.'[2] मुंबईचा गव्हर्नर जोनाथन डंकन, सर हेक्टर मनरो, लॉब्रूडोंने वगैरे अनेक गृहस्थांनीं नायर लोकांच्या शस्त्रप्रवीणतेची व शौर्याची अतिशय तारीफ केली आहे. त्यांचा नायक लढाईंत पडला तर प्राण जाईपर्यंत शत्रूचा सूड घेण्यास ते मागेंपुढें पाहत नाहींत. तत्कालीन व आजच्या स्थितींत कवढें अंतर ! !

प्रेत जाळल्यावर त्याच्या अस्थि सुंदर दगडी पेटींत घालून पुरण्याची चाल नायरांत होती. अशा रीतीनें पुरलेल्या निरनिराळ्या आकारांच्या पुष्कळ जुन्या पेट्या हल्लीं सांपडल्या आहेत. त्यांजवर नकशी असून लेख कोरलेले आहेत. ही चाल पूर्वी होती. अलीकडे अस्थि नदींत किंवा तीर्थांत टाकितात.

धर्मसंबंधानें पाहतां अशोकाच्या वेळेपासून मलबारांत बुद्ध व जैन धर्माचा प्रसार झाला. ह्या प्रांतांत जैन धर्माचें प्राबल्य विशेष होतें.

1. Johnston's relations of the most famous kingdom in the word,—( Ed. 1611 ).

2. ( Mrs. Murdoch Brown to Francis Buchanan,–beginning of 19th Cent ).

इ. स. च्या आठव्या शतकांत नंबुतिरी ब्राह्मण मलबारांत आल्यावर लोकांच्या धर्माचारांत पुष्कळ फरक पडला, व शंकराचार्यांची शिकवणी जोरानें अंमलांत आली.

मलबारचें वर्णन लिहिणारा मि० लोगन म्हणतो, कीं, 'मलबार संबंधानें ध्यानांत ठेवण्यासारखी मुख्य गोष्ट म्हणजे नायर लोकांचा प्रभाव होय. शेंकडों वर्षेंपावेतों त्यांचें लष्करी व इतर कामांत अतिशय प्राधान्य होतें. परकी लोक मध्यें आले नसते तर तें तसेंच कित्येक शतकेंपर्यंत पुढेंही टिकलें असतें. अजूनही नायर लोक मलबारांत राहतात, पण दुःखाची गोष्ट इतकीच कीं, लोकांचे नाहींसे होणारे हक्क शाबूद राखण्याचें सामर्थ्य त्यांच्या हातीं पूर्वीं होतें तें आतां राहिलें नाहीं. पूर्वीं राज्य-कर्त्यांचा त्यांजवर जुलूम चालत नसे. त्यांच्या राज्यव्यवस्थेस 'पार्लमेंट' हें नांव एका बहुश्रुत तत्रस्थ गृहस्थानें दिलें आहे. * * पूर्वीं मलबारच्या राजास रयतेवर अनियंत्रित अंमल चालवितां येत नसे. सर्व गोष्टी त्यास कुट्टं सभेच्या मार्फत कराव्या लागत. ही प्रजासत्ताक राज्यव्यवस्था प्रथम हैदरअलीनें मोडिली.'

एकंदरींत ह्या प्रांतांत पुष्कळ शतकेंपर्यंत सौख्य व सुबत्ता नांदत असून तेथचा व्यापार चांगला भरभराटींत होता.

**४. मलबारांतील मुसलमान.**—मलबारांत मुसलमानांचें महत्त्व फार आहे. मुसलमानांच्यामुळेंच मलबारचा व्यापार वाढून त्याची प्रख्याति झाली. येथें मुसलमानांचा प्रवेश नवव्या शतकांत ( म्ह० इ. स. ८९१ नंतर ) झाला. असें सांगतात कीं, मलबारांत चेरमाण पेरुमाळ नांवाचा एक पराक्रमी राजा क्रांगानूर येथ राज्य करीत होता. त्याच्या देशांत एकदां कांहीं आरब साधु आले. त्यांनीं राजाचें मन मुसलमानी धर्माकडे वळविलें. तेव्हां त्यानें मक्केस जाऊन येण्याचा निश्चय केला. त्यासाठीं एक जहाज त्यानें

गुप्त रीतीनें तयार केलें. त्यांत बसून राजा पळून गेला, आणि आरबस्तानांत 'शहर' नांवाच्या ठिकाणीं उतरला. तेथें मलिक-इब्न-दिनार हा गृहस्थ आपल्या सर्व कुटुंबासह राजास भेटला. पुढें दोघांची चांगली दोस्ती होऊन राजानें मुसलमानी धर्म स्वीकारिला, व तेथेंच तो कांहीं वर्षे राहिला. तेथून परत हिंदुस्थानांत येऊन येथच्या लोकांस मुसलमानी धर्मांत आणावें अशी त्याची इच्छा होती. पण मध्येंच आजारी पडून तो आरबस्तानांत मरण पावला. मरणापूर्वी त्यानें मलिक-इब्न-दिनार व दुसरे स्नेही ह्यांस जवळ बोलावून, 'तुम्ही मलबारांत जाऊन तेथें मुसलमानी धर्म पसरा' अशी आग्रहाची विनंती केली; आणि मलबारांतील राजास त्याबद्दल पत्रें देऊन मशिदी वगैरे बांधून त्यांस उत्पन्नें तोडून देण्याविषयीं सांगितलें व आपण देह ठेविला.

पुढें कांहीं काळानें मलीक-इब्न-दिनार हा कुटुंबासह पेरुमाळ राजाचीं पत्रें घेऊन मलबारांत आला. राजाच्या मरणाची बातमी त्यानें प्रथम गुप्त ठेविली. क्रांगानूरच्या राजानें त्याचा चांगला सत्कार केला, व चेरमाणानें लिहिल्याप्रमाणें त्यास मशिदीसाठीं जागा व उत्पन्नें करून दिलीं. मलीक-इब्न-दिनार हा मुख्य काजी झाला. पुढें त्रावणकोरांत जाऊन त्यानें कोलम येथें मशीद स्थापिली. तसेंच उत्तरेकडे जाऊन मंगळूर, कासारगोडें वगैरे ठिकाणीं मशिदी बांधिल्या. ह्याप्रमाणें पश्चिम किनाऱ्यावर मुसलमानी धर्माची स्थापना झाली. तेथील अधिकाऱ्यांकडून आपणास मदत होईल अशीं व्यापारोपयोगी ठिकाणें मुसलमानांनीं पसंत केलीं. ह्याप्रमाणें मलीक-इब्न-दिनार यानें मलबारांत उद्योग चालविला, त्यापूर्वीच किनाऱ्यावरील लोकांस आरब व्यापाऱ्यांची चांगली ओळख झाली होती. अगोदरपासूनच मलबारांत अरब व्यापारी येऊन राहिले होते; आणि तेथें हिंदु स्त्रियांशीं

लग्नें वगैरे करून त्यांची अर्धबाटगी प्रजा उत्पन्न झाली होती. ही प्रजा वाढत गेल्यामुळें व्यवस्थित धर्मबंधनांची आवश्यकता वाढली, व मलीक-इब्न दिनारच्या प्रयत्नास यश आलें. अशाप्रकारें दोन विधर्मी लोकांच्या मिलाफापासून जी प्रजा उत्पन्न झाली तिला 'मापला' असें नांव पडलें. मापला हा शब्द मलबारांतील मुसलमानांस लावितात. 'महापिल्ला' ( महा म्हणजे मोठा, व पिल्ला म्हणजे मूल ) म्हणजे मोठ्या सन्मानाचा पुरुष, ह्यास मुलासारखें ममतेनें वागविलें पाहिजे, अशा अर्थाच्या व्युत्पत्तीनें हा शब्द प्रचारांत आला.

मापल्यांची मुख्य जागा कानन्नूर. तेथें अद्यापि मापला मुसलमानांचा राजवंश आहे इसवी सनाच्या बाराव्या शतकाच्या आरंभीं मलबारांत एका राजापाशीं 'आर्यन कुलांगार नायर' ह्या नांवाचा एक पिढीजाद दिवाण होता. त्यानें मुसलमानी धर्म स्वीकारून महंमदअली असें नांव धारण केलें. हुशार व शहाणा असल्यामुळें मुसलमान झाला तरी त्याची दिवाणगिरी कायम राहिली. सारांश, मुसलमान होणें चांगलें अशीच मलबारांत त्या वेळीं लोकांची थोडीबहुत समजूत झालेली होती. मलबारांतील हें मुसलमानांचें वजन व उत्तरहिंदुस्थानांत मुसलमानांनीं केलेले अनर्थ ह्यांमध्यें एक प्रकारचा चमत्कारिक विरोध आहे. हिंदुलोकांवर जुलूम करून त्यांस मुसलमान करणें, लढाई, छळ, व कत्तली करणें इत्यादि प्रकार तिकडे चालू होते, त्याच वेळेस मलबारांत शांततेनें व गोडीगुलाबीनें मुसलमानी धर्मप्रसाराचें काम चाललें होतें. ख्रिस्ती धर्माचा सुद्धां येथें पुष्कळ प्रसार झाला.

वास्तविक म्हटलें म्हणजे मलबारांत हिंदुधर्माचा पगडा चांगलासा बसला नव्हता. तेथें ब्राह्मणांचें प्राबल्य झालें नसल्यामुळें मुसलमानी धर्माची स्थापना फार सुकर झाली. मलबार व हिंदुस्थानचे इतर भाग ह्यांच्यामधील हा मोठा फरक विशेष लक्षांत ठेवण्याजोगा आहे.

ब्राह्मणांच्या धर्मशिक्षणाचा पगडा इतर प्रांतांप्रमाणें ह्या प्रांतांत बसलेला नसल्यामुळें परकी धर्माचा प्रवेश पश्चिमकिनाऱ्यावर जितक्या सुलभ रीतीनें झाला, तितका इतर कोणत्याही प्रांतांत झाला नाहीं. मुसलमानांनीं व पोर्तुगीझांनीं येथें पुष्कळ लोक बाटविले. ह्या बाटलेल्या लोकांची संख्या मलबारांत जेवढी मोठी आहे तेवढी दुसरी कोठें नाहीं. मलबार किनाऱ्यावर पोर्तुगीझांस विशेष यश आल्यामुळें, सर्व हिंदुस्थान देशांत ख्रिस्तीधर्म सहज पसरेल अशी पोर्तुगीझांची कल्पना होऊन, त्यांनीं धर्मसंबंधांत विशेष प्रयत्न केले. ह्यावरून स्वधर्मसंरक्षणाच्या कामांत ब्राह्मणांनीं केवढी मोठी कामगिरी बजाविली आहे हें सहज दिसून येतें. ब्राह्मणांनीं इतर जातींवर आपला पगडा बसविल्यामुळें देशाची हानि झाली असें प्रतिपादन करणारांनीं त्यांची ही मलबारांतील कामगिरी ध्यानांत ठेवण्याजोगी आहे. हिंदुस्थानांत ब्राह्मणांनीं धर्मसंरक्षणाचें काम केलें नसतें तर आज सर्व देश मुसलमानी किंवा ख्रिस्ती झाला असता, असें अनुमान ह्यावरून निघतें.

आरबस्तानांत शहर येथें पेरुमाळ राजाची कबर आहे. हल्लीं मापला जातींत आरबांचें रक्त फार आहे असें नाहीं. ही जी अर्धबाटगी प्रजा झाली तिचा विस्तार सुरू आहे. कालिकोटचे सामुरी आपल्या जहाजांवर मुसलमान खलाशी पाहिजेत म्हणून हिंदुमुलांस मुसलमान करून वाढवीत असत. ह्या मुसलमानांनीं बहुतेक हिंदूंच्या चालीरीति घेतल्या आहेत ते बहुधा सुनी आहेत.

**८. मलबारांतले ख्रिस्ती.**—ह्यांशिवाय मलबारांतील दुसरे महत्त्वाचे लोक ख्रिस्ती होत. मलबारांत ख्रिस्तीधर्म सेंट टॉमस नांवाच्या साधूनें स्थापिला, असा समज आहे, म्हणून त्यांस सेंट टॉमस ख्रिश्चन्स् असेंही म्हणतात. पण हे मूळचे सिरियांतले असल्यामुळें त्यांस सिरियन असेंही म्हणतात. प्राचीन काळीं सिरियांतील ख्रिस्ती व्यापारी

हिंदुस्थानांत व्यापाराकरितां येत, त्यांनीं आपला धर्म येथें सुरू केला असावा. कोणत्या धर्माचे लोक प्रथम आले हें निश्चित नाहीं. तथापि इ. स. १००० पावेतों निरनिराळ्या पंथांचे ख्रिस्ती लोक इकड येऊन आपआपले पंथ स्थापीत होते. पोर्तुगीझ इकडे आल्यावर त्यांस ते सर्व जाऊन मिळाले. सन १५९८त अलेक्झिस मेनेझिस ह्यास पोपनें गोव्याचा बिशप नेमून इकडे पाठविलें. पुढें सन १६४३ त डच लोकांनीं कोचीन शहर काबीज केलें, तेव्हांपासून प्रॉटेस्टंट पंथ वर आला. एकंदरींत मलबारांतील ख्रिस्ती लोकांस जें महत्त्व आलें तें इतरांस आलें नाहीं. हिंदुस्थानांतले सर्व रोमन कॅथोलिक पोपच्या ताब्यांत आहेत. मंगळूर येथें बेसल जर्मन मिशन म्हणून आहे तें प्रॉटेस्टंट असून त्यांनीं बरेच उद्योगधंदे प्रचारांत आणिले आहेत.

६. **महामखसमारंभ.**–मलबारांत ‘कोलम’ नांवाची वर्षगणना चालते. ही ‘कोलम’ गणना ता. २९ ऑगस्ट सन ८२५ रोजीं सुरू झाली. तीस ‘आचार्यवागभेद्या,’ असें एक नांव आहे. त्या नांवावरून ती शंकराचार्यानें सुरू केली असावी असें दिसतें. दुसरी एक कल्पना अशी आहे कीं, मलबारचा शेवटचा राजा चेरमाण पेरुमाळ स. ८२५ च्या सुमारास राज्य सोडून मक्केस गेला, त्या वेळीं कांहीं तरी घडामोड होऊन ही वर्षगणना चालू झाली असावी.

मलबारांत दर बारा वर्षांनीं नवीन राजा नेमण्याचा एक मोठा समारंभ पूर्वींपासून होत असे. त्यास ‘ओनम्’ किंवा महामख असें म्हणत. हा समारंभ स. १७४३ पावेतों चालू होता. तेव्हांपासून तो बंद आहे. त्या समारंभास सर्व कुटुंब सभेचे सभासद व राज्यांतील सर्व लहानमोठे लोक हजर असत, व तेथें राज्यांतील सर्व गोष्टींचा खल होत असे.

कॅप्टिन अलेक्झांडर हॅमिल्टन हा सतराव्या शतकाच्या अखेरीस मलबारांत होता. त्यानें ह्या समारंभाची प्रत्यक्ष घडलेली हकीकत दिली आहे, ती अशी. 'झामोरी ( सामुद्री, सामुरी, ) असें मलबारच्या राजाचें नांव होतें. त्यानें बारा वर्षें राज्य करावें, ज्यास्त करूं नये असा संप्रदाय होता. बारा वर्षें भरण्यापूर्वीं त्यास मरण आलें तर ठीकच; पण मरण न आल्यास मोठ्या समारंभानें त्यानें सर्वांसमक्ष आपला शिरच्छेद करून घ्यावा अशी चाल होती. त्या प्रसंगीं मोठा समारंभ करीत. त्यास सर्व सरदार व सभ्य गृहस्थ बोलावीत, व मोठी मेजवानी देत. मेजवानीनंतर त्या सर्वांचा निरोप घेऊन राजा वधस्तंभाजवळ जाई. तेथें सर्वांसमक्ष आपली मान तो स्वतः कापून घेई. नंतर त्याचें शव मोठ्या समारंभानें जमलेले सर्व लोक दहन करीत. दहन झाल्यावर ते सर्व पुनः एकत्र जमून नवीन राजा नेमीत. अशी चाल प्राचीन काळीं होती. पण ती आतां बरेच दिवस बंद आहे. अलीकडचा प्रकार असा आहे कीं, दर बारा वर्षांनीं सर्व राज्यांत एक महोत्सव करितात. एका मोठ्या मैदानांत विस्तीर्ण मंडप बांधून जागा तयार करितात. तेथें दहाबारा दिवस महोत्सव चालू असतो. अहोरात्र वाद्यें वाजत असतात. बाराव्या दिवशीं जमलेल्या मंडळीपैकीं कोणीही चार इसम तीस चाळीस हजार फौजेच्या रांगांतून घुसून, तंबूंत असलेल्या सामुरीस मारण्यास धांवतात. त्यांपैकीं जो इसम सामुरीस ठार मारूं शकेल, त्यास पुढें राज्य मिळतें. सन १६९६ त जो महोत्सव झाला त्यास हा हॅमिल्टन हजर होता. ह्या समारंभाची जागा कालिकोटच्या दक्षिणेस चाळीस मैलांवर समुद्रकांठीं पोनानी येथें होती. त्या प्रसंगीं फक्त तीन असामी फौजेंत घुसले. त्यांनीं पुष्कळांस ठार मारिलें, पण शेवटीं ते सर्व तरवारीखालीं मरण पावले. त्यांपैकीं एकाचा पुतण्या जवळच होता, तो लगेच धांवत

सामुरीच्या तंबूंत गेला आणि त्यानें सामुरीवर वार केला, पण तो चुकला. इतक्यांत रक्षकांनीं त्यास ठार केलें. त्या प्रसंगीं तोफांचे वगैरे आवाज मीं दोन तीन दिवस ऐकत होतों.'

केरलमाहात्म्य व करलोत्पत्ति म्हणून मलबारच्या इतिहासाचे दोन ग्रंथ, पहिला संस्कृत व दुसरा मराठी असे आहेत. वरील हॅमिल्टनचीं हकीकत व केरलमाहात्म्यांतील हकीकत ह्यांत तफावत आहे, ती अशी कीं, माहात्म्यांत राजास ठार मारण्याचा उल्लेख नाहीं. फक्त बारा वर्षांनीं राजानें आपण होऊन राज्य सोडावयाचें, व लोकांनीं दुसरा नवीन राजा नेमावयाचा असा मजकूर आहे. मुंबईचा गव्हर्नर जोनाथन डंकन ह्यानेंही ह्या उत्सवाचें वर्णन लिहिलें आहे.[१]

गुरु दर बारा वर्षांनीं एक प्रदक्षिणा संपवून पुष्य नक्षत्रास येई तेव्हां हा महोत्सव होई. त्या वेळीं पूर्वींची सर्व व्यवस्था रद्द होऊन नवीन करण्यांत येत असे. हा समारंभ पोनानी तालुक्यांत तिरुनावायी येथें होत असे. कोलम गणना सुरू होण्यापूर्वीं पेरुमाळ राजांचा अंमल मलबारावर असतां हा महोत्सव सुरू झाला. शेवटचा राजा चेरमाण पेरुमाळ मक्केस जाऊन मुसलमान झाल्यावर उत्सव करण्यास मुख्य राजा कोणी राहिला नाहीं. तेव्हां तिरुनावायी हा गांव वल्लुवनाड परगण्यांत असल्यामुळें उत्सवाचें काम त्या परगण्याच्या राजावर येऊन पडलें. ही व्यवस्था बाराव्या तेराव्या शतकापर्यंत चालली. पुढें आरबांच्या मदतीनें व व्यापाराच्या किफायतीनें कालिकोटचा सामुरी मलबारांत विशेष प्रबल झाला. तेव्हां सर्व केरल देशाच्या वतीनें तो ह्या समारंभांत मुख्य भाग घेऊं लागला. त्या वेळीं केरल देशांत त्रावणकोरचाही समावेश होत असल्यामुळें तेथचा राजाही सामुरीचाच मांडलीक झाला. सन १७४३ त

१. Transactions of the Bombay Literary Society.

शेवटचा उत्सव झाल्यानंतर त्रावणकोर प्रांत मलबारांतून स्वतंत्र झाला, तो आजतागाईत तसाच आहे. कित्येक राजे सामुरीचें सार्वभौमत्व मान्य करीत नसत. हल्लीं कालिकोटास सामुरीचा वंश आहे. त्यांतील पुरुषांच्या परवानगीनें कालिकोटचें सर्व दप्तर चाळून मिलोगन यानें सन १६८३ तील महामखाचें वर्णन लिहिलें आहे त्यांतील मतलब असा. 'हा महोत्सव अठ्ठावीस दिवस चालला. त्याकरितां पूर्वी कित्येक महिने तयारी चालू होती. सर्व लोकांस निमंत्रणें पाठविलीं होतीं. सुमुहूर्तावर राजानें तेथें प्रयाण केलें. त्याची छावणी मध्यें असून सभोंवार सर्व मांडलिक राजांच्या छावण्या होत्या. पोनानी नदीवरून हल्लीं आगगाडी जाते. तींतून ही जागा नदीच्या उत्तरकांठीं दिसते. दहा दिवसपर्यंत सर्व फौजेची पाहणी होऊन नंतर प्रांतोप्रांतींची फौज सामुरीपुढें येऊन त्यास सलामी देई.

'राज्यारोहणाचा प्रकार मोठा चमत्कारिक असे. त्या दिवशीं राजा शिजलेल्या भाताची एक मोठी रास पुढें घेऊन बसे, आणि प्रथम आपण स्वतः तींतील थोडा भात खाऊन, नंतर जमलेल्या सर्व लोकांस तो आपल्या हातानें त्यांतील थोडथोडा प्रसाद वांटी. ज्यांनीं ज्यांनीं हा प्रसाद घेतला असेल त्यांनीं राजाच्या जिवाकरितां प्राण देण्याची शपथ घेतली असा अर्थ असे. ही शपथ ते बरोबर पाळीत. नवव्या शतकांतील मुसलमानी ग्रंथांत ही चाल वर्णिलेली आहे. बहुतेक राजांजवळ अशा जिवास जीव देणाऱ्या लोकांची संख्या मोठी असे. मापला म्हणून जे मुसलमान मलबारांत होते, त्यांनीं ही चाल स्वीकारिली. हे मापला लोक मोठे कडवे असून ब्रिटिश अमलाखालीं सुद्धां त्यांनीं अनेक दंगे केलेले आहेत. त्या दंग्यांत जिवाची पर्वा न करितां ते लोक इंग्रजी संगिनींवर जाऊन पडल्याचीं उदाहरणें आहेत. आतां त्यांच्या पदरीं गरिबी आली असून

लढाईचें काम राहिलें नाहीं व लोकसंख्या वाढली, तेव्हां ते अगदीं हताश व निरुपद्रवी होऊन राहिले आहेत.' ( Logan. )

**७. कालिकोटचे सामुरी.**—चेरमाण पेरुमाळ हा मुसलमान होऊन आरबस्तानांत गेल्यावर त्यानें आपल्या राज्याचे दोन भाग केले: एक, उत्तरकोलत्तीरी म्हणजे मलबार, व दुसरा, दक्षिणकोलत्तीरी म्हणजे त्रावणकोर. हीं राज्यें कांहीं दिवस चाललीं. पण त्यांचा अंमल मांडलिक राजांवर चांगलासा बसला नाहीं. आठव्या शतकांत एरनाड नांवाच्या नायर परगण्याचा अधिपति सामुरी ( म्हणजे सामुद्री, ज्यास पाश्चात्य ग्रंथकारांनीं झामोरिन अशी संज्ञा दिली आहे ), म्हणून होता. त्याच्या कुटुंबाचें आडनांव 'इरादी' असें होतें. राष्ट्रकुटांचे वगैरे हल्ले येत असतां पेरुमाळांस मदत करून हा सामुरी बराच महत्त्वास चढला; पेरुमाळ गेल्यावर त्यानें राज्याचा विस्तार वाढविला व विशेषतः समुद्रावर त्याचा संचार सुरू झाल्यामुळें त्याचा दरारा बराच वाढला व त्यानें आपल्या नांवापुढें 'कुन्नलकोन' म्हणजे 'गिरिसागरपति' अशी संज्ञा घेतली. त्यानें पोलनाड परगणा जिंकून आपल्या राज्यास जोडिला. पोलनाड म्हणजे कालिकोटच्या आजूबाजूचा प्रदेश. ह्या प्रदेशांत कालिकोट येथें त्यानें आपली राजधानी करून सर्व प्रकारची मजबुदी केली, व विशेषतः परकीय व्यापाऱ्यांस चांगला आश्रय व उत्तेजन दिलें; त्यामुळें राज्याची भरभराट झाली. आरब मुसलमानांच्या हातांत पूर्वेकडील सर्व व्यापार तीनचारशें वर्षें राहिला, तेवढ्या अवधींत सामुरीनें आरबांस उत्तम साह्य करून आपला व्यापार वाढविला, एवढेंच नव्हे, तर आरबांनीं त्यास घोडे व फौज देऊन ज्यास्त मुलूख जिंकण्यासही मदत केली. ह्याच कारणास्तव पोर्तुगीझ कालिकोटास आले, तेव्हां तेथें आरबांचें महत्त्व त्यांस विशेष दिसून आलें. पेरुमाळ निघून गेल्यावर महामखसमारंभाचा मुख्य मान कांहीं दिवस वल्लु-

वनाडच्या राजास मिळाला; व पुढें तो मान सामुरीस मिळूं लागला. सामुरीनें कोचीनच्या राजाचा बराच मुलूख जिंकिला. सन १२९२–९३ त मार्कोपोलो फिरत फिरत मलबारांत आला, तेव्हां तेथें त्यास बारा राज्यें दिसलीं. त्यांपैकीं मोठ्याची फौज पन्नास हजार व लहानाची फौज पांच हजार होती. त्या वेळेस विजयनगरचें राज्य प्रबळ होतें. सामुरीचें प्रस्थ चौदाव्या शतकांत विशेष वाढलें. अब्दुल रझाक नांवाचा एक प्रवासी सन १४४२ त लिहतो, 'कालिकोट येथें न्याय चांगला होतो. सर्वांची मालमत्ता सुरक्षित आहे; इतकी कीं मोठमोठे व्यापारी अतिशय मोलवान माल दूर देशाहून ह्या शहरीं आणून बाजारांत उघड्या रस्त्यांवर ठेवून देतात; व त्यांजवर कोणी सांभाळणारा नसला, तरी त्या मालास चोरीची भीति नसते. कोणी पाहराही ठेवीत नाहीं. जकातनाक्यांचे अधिकारी तो माल आपल्या ताब्यांत ठेवून घेतात. जर तो माल विकला, तर शेंकडा अडीच रुपये जकात घेतात; माल विकला नाहीं तर तो ते अधिकारी ज्याचा त्यास परत करितात.' अशा प्रकारची पूर्वीं व्यवस्था होती, म्हणूनच प्रजा संतुष्ट असून राज्यही भरभराटींत होतें. कालिकोट शहराचा मोठेपणाही अशा प्रामाणिकपणावरच वाढला अशी आख्यायिका आहे. पूर्वकिनाऱ्यावरील एक मोठा व्यापारी आपलें जहाज सोन्यानें भरून प्रवासास जात असतां, गलबतास वजन सहन न होऊन त्यानें आपलें जहाज कालिकोटास आणिलें; व बरेंचसें सोनें सामुरीच्या ताब्यांत ठेवून तो स्वदेशीं गेला; व पुनः परत कालिकोटास आल्यावर त्याचें सोनें सामुरीनें जसेंच्या तसें त्यास परत दिलें. तेव्हां सर्व व्यापारी लोकांत सामुरीची मोठी ख्याति झाली.

पोर्तुगीझ लोक प्रथम मलबारांत आले, तेव्हां तेही आरब वगैरे व्यापाऱ्यांप्रमाणेंच साळसूद असतील, असा तेथील बहुतेक राजांचा समज होता. व्यापारवृद्धीच्या कामांत धर्मप्रसार व राज्यस्थापना असले अंतस्थ

हेतु त्यांच्या मनांत असतील हा संशयच कोणास आला नाहीं. पूर्वी हजारों वर्षेपावेतों तसा प्रयत्नही कोणीं केला नव्हता. परंतु पोर्तुगीझ लोकांच्या आगमनप्रसंगीं जगांत कोणकोणत्या घडामोडी चालू आहेत हें पश्चिम किनाऱ्यांवरील राजांनीं समजून घेतलें नाहीं. कोचीनच्या राजास सामुरीच्या वैभवाचा द्वेष वाटत होता. सामुरीस जें वैभव आरबांपासून मिळालें तेंच आपणास पोर्तुगीझांपासून प्राप्त होईल अशी कोचीनच्या राजास आशा वाटत असावी, म्हणूनच पोर्तुगीझांशीं सख्य ठेवून सामुरीचा पाडाव करण्याचा विचार कोचीनच्या राजाच्या मनांत आला असावा. अंतर्वैमनस्यें तर होतींच; तरी पण ह्या परकीय व्यापाऱ्यांपासून आपला फायदाच आहे, त्यांजपासून आपली भरभराटच होईल असा मलबारांतील राजांचा समज असल्यामुळें, त्यांनीं कांहींएक शंका न घेतां पोर्तुगीझ व इतर लोकांस आपल्या राज्यांत खुषीनें आश्रय दिला.

डच लोक व्यापारांत फार जुलूम करीत असत. अमुक माल अमुक दरानेंच विकला पाहिजे असें ते ठरवीत. इंग्रजांची पद्धत अशी नव्हती. ते स्वतःचे दर न ठरवितां चालू भावानें व्यापार करीत. मलबारांत इंग्रजांचा प्रवेश सन १६६४ त झाला. त्या वेळीं तेथें जे राजे होते त्यांजपासून थोडथोडे व्यापाराचे हक्क इंग्रजांनीं मिळविले व विशेषतः मिरीं आपणासच सर्व विकावें, दुसऱ्या कोणास तें देऊं नये असा त्यांनीं तेथील राजापासून ठराव करून घेतला. ह्या राजाशीं इंग्रजांनीं आरंभीं वार्षिकी मक्त्याचे ठराव केले होते. पुढें इंग्रजांची सत्ता वाढत गेली, त्याप्रमाणें त्यांनीं त्यांस आपल्या ताब्यांत आणून नेमणुका करून दिल्या. कालिकोटचा शेवटचा राजा मनविक्रमसामुरी हा सन १८९६ त मरण पावला. त्यास 'महाराजा बहादूर' ही पदवी इंग्रजसरकारानें दिली होती. हल्लीं त्यांस सालिना एकलक्ष चौतीस हजारांची नेमणूक आहे.

---

# प्रकरण चवथें.

## पोर्तुगीझ राज्याची स्थापना.

### सन १९१५ पावेतों.



ह्या प्रकरणांतील हकीगत समजण्यास पोर्तुगालच्या खालील राजांचीं नांवें उपयोगी पडतील.

पहिला जॉन (स. १३८५–१४३८).
├ पेड्रो.
│ └ पांचवा आल्फांझो (स. १४३८–१४८१).
│   └ दुसरा जॉन (स. १४८१–१४९५).
│     └ इमान्युएल (स. १४९५–१५२१).
│       └ तिसरा जॉन (स. १५२१–१५५५).
│         └ सबॅश्शन (स. १५५५–१५८०).
└ प्रिन्स हेन्री (ज. १३९४; मृ. १४६०).

## स. १५८०त स्पेनपोर्तुगालचीं राज्यें एक झालीं.

**१. युरोपांत पोर्तुगालचा उदयः**—यूरोपच्या नैर्ऋत्य कोपऱ्यांत जो द्वीपकल्प आहे, त्यास आयबीरिया असें नांव असून त्यांत स्पेन व पोर्तुगाल ह्या दोन देशांचा समावेश होतो. ह्या द्वीपकल्पांत इ. स. पूर्वी ११०० च्या सुमारास टायर येथील फिनिशियन लोकांनीं येऊन आपल्या वसाहती केल्या; आणि त्या ठिकाणीं पूर्वेकडील जिन्नस नेऊन विकण्याचा व्यापार सुरू केला. आफ्रिकेच्या उत्तर किनाऱ्यावर कार्थेज यथें फिनिशियन लोकानींच राज्य स्थापिलें होते, त्यांतूनही कित्येक लोक आयबीरियांत जाऊन राहिले. कार्थेजचा सरदार हास्डुबाल ह्यानें न्यूकार्थेज म्हणजे हल्लींचें स्पेन देशांतील कार्थेजीना शहर स्थापिलें. पुढें रोमन लोक प्रबळ होऊन त्यांनीं हा देश इ. स. पू. २०० च्या सुमारास कार्थेजिनियन व फिनिशियन लोकांपासून जिंकून घेतला. तेव्हांपासून इ. स. ४७० पावेतों हा देश रोमन लोकांच्या ताब्यांत असून त्यांनीं त्यास हिस्पानिया असें नांव दिलें होतें. पुढें रोमन लोकांचा पराजय करून विझिगॉथ लोकांनीं स्पेनदेशांत आपलें राज्य स्थापिलें, तें स. ४१८–७११ पावेतों चाललें. त्याची राजधानी टोलेडो शहर होती.

इ. स. ७११त आरब मुसलमान सरदार तरीक ह्यानें स्पेनदेश मुसलमानांचे अमलाखालीं आणिला. हा मुसलमानी अंमल अकराव्या शतकाच्या मध्यापर्यंत चालून पुढें तो देश स्पेनच्या खिस्ती लोकांच्या ताब्यांत गेला. ह्या खिस्ती लोकांचीं दोन राज्यें स्थापन झालीं, एक कॅस्टाइल, व दुसरें आरेगॉन. मुसलमान लोकांचा थोडाबहुत अवशेष देशांत राहिला होता तो ह्या दोन राज्यांनीं हळूहळू नाहींसा केला. स. १४६९ त आरेगॉनचा राजा फर्डिनंड व कॅस्टाइलची राणी इझाबेला ह्यांचें लग्न होऊन तीं दोन राज्यें एक झालीं. स. १६०९त स्पेनचा राजा तिसरा फिलिप यानें सक्तीचा हुकुम करून देशांत वसती करून

राहिलेल्या सर्व मुसलमान लोकांस एकदम देशांतून घालवून दिलें. ह्या हुकुमानें वस्तुतः स्पेनचेंच नुकसान झालें. व्यापार व कसबाचीं कामें करण्यांतच मुसलमान लोक कुशल होते असें नाहीं; तर ते शेतकीच्या कामांतही विशेष प्रवीण होते. साखर, कापूस, तांदूळ, आणि रेशीम ह्यांची लागवड त्यांनीं स्पेनदेशांत सुरू केली होती; तसेंच कालवे वगैरे बांधून त्यांनीं जमीन कमावली होती. त्यामुळें स्पेनदेशचा हुन्नर वाढून तेथील जिनसांचा खप बाहेर विशेष होऊं लागला. मुसलमान लोकांस घालवून दिल्यानें स्पेनच्या व्यापाराचें जें नुकसान झालें त्यांतून अद्यापि स्पेनदेश वर निघाला नाहीं.

ही थोडक्यांत स्पेनची हकीगत झाली. हल्लीं ज्यास पोर्तुगाल म्हणतात, तो प्रांतही मुसलमानांचे ताब्यांत होता. त्यांजपासून आल्फांझो हेन्री ह्यानें तो जिंकून तेथें स्वतंत्र राज्य स्थापिलें. स. ११५८त लिस्बन शहर त्यानें काबीज करून आपली राजधानी केली. पुढें शंभर वर्षांवर सारखीं युद्धें चालून स. १२७९त पोर्तुगाल देश हल्लीं आहे तेवढा स्वतंत्र झाला. इंग्लंडचा राजा पहिला एड्वर्ड व पोर्तुगालचा राजा डेनिझ यांचें मोठें सख्य असे. ह्यामुळें इंग्रज व पोर्तुगीझ हीं दोनही राष्ट्रें पुष्कळ दिवसपर्यंत एकोप्यानें वागून दर्यावर्दीपणांत व व्यापारांत पुढारी होतीं. स. १३८६ त ह्या दोन राष्ट्रांमध्यें तह झाला तो विंडसरचा तह म्हणून प्रसिद्ध आहे. ह्या तहानें ह्या दोन राष्ट्रांचा स्नेह कायमचा असावा असें ठरलें. पोर्तुगालचा राजा पहिला जॉन ह्यास जॉन धि ग्रेट म्हणतात. त्यानें इंग्लंड व स्पेन ह्यांजबरोबर सख्य ठेवून फार वर्षें शहाणपणानें राज्य केलें. पंधराव्या शतकांत व तत्पूर्वीं युरोपच्या राष्ट्रांची अंतःस्थिति आजच्यासारखी नव्हती. त्या वेळीं तेथें अनेक लहानलहान राज्यें, व त्यांचे अनेक पोटविभाग होते. जिनोआ, व्हेनिस, फ्लारेन्स वगैरेचें महत्त्व सुद्धां तेवढ्या शहरांपलीकडे

विशेष नव्हतें. पोर्तुगालची स्थितिही थोडीबहुत अशीच होती. तेराव्या शतकांत पोर्तुगीझ राष्ट्रास स्वातंत्र्य प्राप्त झालें; व सुदैवानें स. १३८९ पासून १४२१ पावेतों सुमारें दीडशें वर्षें एकापाठीमागून एक हुशार असे पांच राजे गादीवर आले. ह्या पांच कारकिर्दींत पोर्तुगाल देश वैभवशिखरास चढला. ह्या कालांत इंग्लंडशीं स्नेह, मुसलमानांचा द्वेष, व अज्ञात भूभागांचे शोध ह्या तीन मुख्य गोष्टींनीं त्या देशाचा इतिहास भरलेला आहे.

२. **नौकाशास्त्रवेत्ता राजपुत्र हेन्री** (स. १३९४–६०).—जॉन ऑफ् गाँट्, 'डयूक ऑफ् लँकॅस्टर'ची मुलगी फिलिपा ही पोर्तुगालचा राजा पहिला जॉन यास दिलेली होती. ती फार शहाणी होती. तिची राहणी साधी असून ती धर्मनिष्ठ होती. राष्ट्रांचें वैर मोडून शांतता व सख्य करण्यांत तिनें आपलें आयुष्य खर्च केलें. तिला आठ मुलें झालीं. त्या सर्वांस तिनें उत्कृष्ट शिक्षण दिलें. त्यांपैकीं डुआर्टे, पेड्रो, फर्नांडो व हेन्री हे चार मुलगे नामांकित झाले. त्यांत सर्वांत धाकटा हेन्री ह्यास इतिहासांत 'नौकानयनवेत्ता' हें टोपण नांव मिळालें आहे. त्याचे पराक्रम स. १४१२ पासूनच लोकांपुढें चमकूं लागले. बापाबरोबर युद्धास जाऊन विजय संपादिल्यामुळें त्यानें ह्या मुलास निरनिराळ्या डयूकच्या जहागिरी दिल्या होत्या. राजपुत्र हेन्रीचें लक्ष मूळपासून नौकानयनाकडे विशेष होतें. जिब्रॉल्टरच्या समोर आफ्रिकेच्या उत्तर किनाऱ्यावर स्यूटा नांवाचें एक शहर आहे. तेथें अलेक्झांड्रिया वगैरे ठिकाणांहून मुसलमानांचा मोठा व्यापार चालत असे. सन १४१९ त राजपुत्र हेन्रीनें आरमार पाठवून तें शहर काबीज केलें. तेव्हां त्याच्या शौर्याबद्दल सर्व युरोपांत मोठी ख्याति झाली. स्पेन देशावर आरबांचा अंमल झाल्यापासून तेथें हिंदुस्थानांतील अनेक मौल्यवान जिनसांचा खप होऊं लागला होता. पण तेथून

आरबांचा अंमल नष्ट झाल्यापासून ते जिन्नस मिळण्याची मोठी पंचाईत पडूं लागली. तेव्हां हिंदुस्थानास जाण्याचा समुद्रमार्ग शोधून काढावा व तेणेंकरून मुसलमानांची सर्व संपत्ति आपण घ्यावी अशा इराद्यानें हेन्रीनें समुद्रांत अनेक सफरी करविल्या. स. १४१८ त सर्व संसार सोडून यूरोपचें अगदीं नैर्ऋत्य टोंक केप सेगर येथें त्यानें एक वाडा बांधून वेधशाळा स्थापन केली, व तेथेंच आपण राहूं लागला. त्या ठिकाणाहून त्याची दृष्टि अफाट समुद्रावर पोंचत असे. या ठिकाणीं त्यानें युरोपांतून मोठमोठे पंडित लोक आणविले, आणि बाह्य प्रदेशांच्या शोधासाठीं सफरी करविल्या. तो एका खिस्ती संस्थेचा अध्यक्ष असल्यामुळें त्यास जें उत्पन्न येई तें सर्व त्यानें या उद्योगांत खर्च केलें, व्यापार व खिस्ती धर्म या दोहोंची वृद्धि एकाच उद्योगानें त्यास करावयाची होती. ज्योतिष व नौकाशास्त्र यांचा अभ्यास करून त्यानें जे शोध केले त्यायोगें आशिया, आफ्रिका व अमेरिका येथील अज्ञात प्रदेश युरोपियनांच्या हातास लागले. त्याचा भाऊ पेड्रो यानें सन १४१६ पासून सन १४२८ पावेंतों यूरोपच्या सर्व देशांत प्रवेश करून व्यापाराची वगैरे विशेष माहिती मिळविली, तीही हेन्रीच्या फार उपयोगी पडली. त्या वेळीं आफ्रिकेच्या किनाऱ्यानें केप 'नंन्'च्या पुढें युरोपियन जहाजें जात नसत. 'नंन्' या शब्दाचा अर्थच 'पुढें जाण्याची हद्द बंद' असा आहे. हेन्रीनें त्याच्यापुढें केप बोजाडोरपर्यंतच्या किनाऱ्याचा शोध लाविला. त्याच्याच जवळील मदिरा बेटें सन १४१८ पासून १४२० पावेतों त्यानें शोधून काढिलीं. सन १४४० पासून १४५० चे दरम्यान अझोर बेटें व केपव्हर्ड यांचा शोध लागला. खिस्तीधर्मप्रसार करण्याच्या हेतूनें ही सर्व खटपट आपण चालविली आहे अशी त्यानें पोपाची समजूत केली, व बोजाडोरच्यापुढें ज्या प्रदेशाचा आपण नवीन शोध लावूं त्याजवर पोर्तुगालचा ताबा असावा, अशा आशयाचा

त्यानें पोपाचा हुकूम मिळविला. ह्याप्रमाणें सन १४४१त पोपाचा जो हुकूम सुटला, तो पुढील पोपांनीं वेळोवेळीं मंजूर केल्यामुळें, त्याजवरच प्रदेशवृद्धीच्या संबंधानें युरोपांतील राष्ट्रांची भिस्त असे.

मुसलमानांचा पाडाव करून ख्रिस्ती धर्माचा प्रसार करणें हें ह्या उद्योगाचें एक बीज होते. हातीं लागलेल्या नवीन प्रदेशांतील लोक आणितां येतील तितके हा राजपुत्र पोर्तुगाल देशास आणी व त्यांस ख्रिस्ती धर्माची दीक्षा देई. शिवाय त्यांच्या देशांतील व्यापारसंबंधीं सर्व माहिती तो त्यांजपासून काढून घेई. येणेंकरून गुलामांच्या क्रयविक्रयाचा आरंभ झाला. ह्या गुलामांच्या व्यापारांत पोर्तुगाल देशास फारच किफायत होत असे. शेतकीचीं व घरगुती कामें करण्यास सर्व पोर्तुगीझ लोकांनीं आपल्या पदरीं गुलामांचा मोठा संग्रह केला. फुकट काम करणारे लोक देशांत आल्यामुळें त्यांजवर शेतीचें वगैरे काम सोंपून, आपण परदेशीं जाण्यास पोर्तुगीझ लोक मोकळे झाले. ह्याप्रमाणें लढाऊ लोकांचा भरणा देशांत कमी झाल्यामुळें राष्ट्राचें नुकसान झालें, व त्याचे राष्ट्रावर जे वाईट परिणाम झाले, त्यांचें विवेचन पुढें येईल. सारांश, नवीन प्रदेशाचें स्वामित्व व तेथील सुवर्ण वगैरे संपत्ति युरोपियनांस प्राप्त झाली. पूर्वी गलबतांच्या दूरवर सफरी करण्यास कोणी धजत नसे. तो बाऊ नाहींसा होऊन धन-प्राप्तीच्या आशेनें यूरोपचे बरेच लोक पोर्तुगीझ छत्राखालीं समुद्रयात्रा करून अनेक संपन्न प्रदेशांवर झडप घालूं लागले. त्याचा परिणाम प्राच्य राष्ट्रांस अद्यापि भोगावा लागत आहे. हेन्रीच्या प्रयत्नानें उत्तम खलाशी तयार झाले, त्यांचा पोर्तुगीझ राष्ट्रास मोठा उपयोग झाला. अशीं कामें करून राजपुत्र हेन्री सन १४६० त मरण पावला. पश्चात् त्याचा पुतण्या पांचवा आल्फांझो व नंतर दुसरा जॉन ह्यांनीं हें नवीन शोधांचें काम तसेंच पुढें नेटानें चालविलें.

हेन्रीच्या उद्योगाबद्दल त्यास नॅव्हिगेटर म्हणजे नौकानयन-वेत्ता असें टोपणनांव इतिहासांत मिळालें आहे. त्याची महत्त्वाची कामगिरी ही कीं, पूर्वी हजारों वर्षें केप बोजाडोरच्या पुढें अटलांटिक महासागरांतून आफ्रिकेच्या किनाऱ्यानें समुद्रमार्गानें खालीं कोणी गेला नव्हता; व पुढें जाणें धोक्याचें व निष्फळ आहे, अटलांटिक महासागर दक्षिण बाजूनें तलावासारखा असून त्याचा इतर महासागरांशीं संधि झालेला नाहीं, असें जें सर्वांस वाटत होतें, तें चुकीचें होय; व हिंमत करून पुढें आफ्रिकेच्या दक्षिण टोंकास वळसा घालून दुसऱ्या महासागरांत उतरणें हें शक्य आहे, असें हेन्रीनें सिद्ध केलें. त्यानें बेचाळीस वर्षें परिश्रम करून दक्षिणेस अठरा अंशपावेतों नवीन शोध लाविला आणि पुढील शोधांची पद्धत बांधून दिली.

पोर्तुगीझ लोकांस आज सुद्धां हिंदुस्थानच्या राज्याचा इतका अभिमान वाटतो ह्याचें कारण त्या वेळचें त्यांचें प्रत्येक कृत्य मोठ्या श्रमाचें, धाडसाचें, व खर्चाचें होतें. तें तडीस जाण्यास मोठाच कालावधि लागला. त्यांस अनेक अडचणी आल्या, त्यांचें विवेचन नौकाशास्त्राच्या इतिहासांत महत्त्वाचें आहे. जर्सन डा कुन्हा यांच्या मुंबईच्या वर्णनांत खालील मजकूर आहे. ( पृष्ठ १२० ).

राजपुत्र हेन्री यास नवीन शोध करण्यास स्फूर्ति आली त्याचीं कारणें:—

१ केप बोजाडोरच्या पुढील प्रदेश कसा आहे तें जाणण्याची इच्छा;
२ तिकडील प्रदेशांत ख्रिस्ती राष्ट्रें व उपयुक्त बंदरें आढळल्यास, त्यांचा व आपल्या देशांचा व्यापार वाढविणें;
३ आफ्रिकेंत मुसलमानांची शक्ति किती आहे हें शोधून काढणें;
४ तिकडे एकादा ख्रिस्ती राजा मुसलमानांविरुद्ध आपणांस मदत करणारा असल्यास पाहणें;
५ ख्रिस्ती धर्माची वृद्धि करणें.

स. १४६३त म्हणजे राजपुत्र हेन्री मरण पावल्यावर तीन वर्षांनीं पोर्तुगीझ लोक ‘ सिएरा लिओन ’ ( सिंहाची रात्रीची आरोळी )च्या किनाऱ्यापर्यंत गेले. स. १४७१ त आफ्रिकेच्या किनाऱ्यानें भूमध्यवृत्ता-पर्यंत ते गेले. सन १४८४ त कांगो नदीपर्यंत त्यांचा प्रवेश झाला. नवीन प्रदेशांत गेल्यावर ते धर्मोत्सव करीत. ता. १९ जानेवारी १४८२ रोजीं ‘ ला मिना ’ येथें ते उतरले. दुसरे दिवशीं सकाळीं एका उंच झाडाच्या फांदीवर त्यांनीं पोर्तुगालचें निशाण चढविलें; त्या झाडाखालीं एक मोठा होम केला, आणि सर्वांनीं मिळून स्तोत्र-पाठ करून, तद्देशीय लोकांस ख्रिस्ती धर्मांत येण्याची बुद्धि व्हावी व आपल्या धर्माची भरभराट असावी अशी त्यांनीं प्रार्थना केली. सन १४८६ त बार्थोलोमो डिआझ हा आफ्रिकेच्या दक्षिण टोकाचा शोध लावून परत आला. ता. ४ मे सन १४९३ रोजीं पोपानें एक लेख प्रसिद्ध करून स्पेन व पोर्तुगाल ह्यांच्या शोधांची हद्द ठरवून दिली. असा हुकुम करण्यास पोपास अधिकार होता किंवा नाहीं ह्या प्रश्नाविषयीं बरीच चर्चा झाली आहे. पण त्या वेळीं कित्येक शतकेंपर्यंत ख्रिस्ती राष्ट्रांतील तंटे तोडून त्यांचे तह जमवून देणें, हें काम विशेषतः पोपच करीत असे. पोर्तुगाल देशाचें स्वातंत्र्य सन ११७९त पोपा-च्याच हुकुमानें कायम झालें. ह्या नवीन प्रदेश शोधण्याच्या कामांत एकंदर तीन पोपांचे हुकूम आहेत. सन १४५४ तला पांचव्या निकोलसचा हुकूम असा आहे कीं, वाटेल त्या विधर्मी लोकांस जिंकून ख्रिस्ती धर्मांत आणावें. दुसरा, सन १४८१ तला चौथ्या सेक्स्टसचा हुकूम असा होता कीं, केप बोजाडोरच्या दक्षिणेस पोर्तुगालनें शोधलेल्या प्रदेशावर त्याचाच ताबा समजावा. तिसरा सन १४९३तला सहाव्या अलेक्झांडरचा आणखी एक हुकूम आहे. ह्या हुकु-मानें पोर्तुगाल आणि स्पेन ह्यांच्या राज्यांची मर्यादा पोपानें ठरवून दिली.

ख्रिस्ती राष्ट्रें पोपाचा हुकूम पाळीत होतीं; व सोळाव्या शतकाच्या अखेरीपर्यंत पोपाचा हुकूम तोडण्यास युरोपियन ख्रिस्ती राष्ट्रें धजत नसत. पोर्तुगीझ सरकारच्या ताब्यांत हिंदुस्थानांत फारशी सत्ता नसतांही, ते लोक, सर्व हिंदुस्थान देश आपला आहे अशी भाषा कागदोपत्रीं वापरीत असत, ह्याचें कारण ह्या पोपाच्या हुकुमांत आहे.

राजपुत्र हेन्रीला पोर्तुगालचें राज्य मिळालें नाहीं. त्याच्या वडील भावाचा मुलगा पांचवा आल्फांझो हा स. १४३८–८१ पावेतों राज्यावर होता. त्यानें वरचेवर गलबतें पाठवून वर सांगितल्याप्रमाणें आफ्रिकेच्या किनाऱ्याचा बराच शोध लाविला. स. १४८१त आल्फांझो मरण पावला व त्याचा मुलगा दुसरा जॉन हा गादीवर आला. तोही चाणाक्ष होता. त्याच्या कारकिर्दींत ह्या शोधांचें खरें फल पोर्तुगाल देशास प्राप्त झालें. जॉन राजा फक्त समुद्रावरच भिस्त ठेवून राहिला नाहीं. खुष्कीच्या मार्गानेंही त्यानें अनेक प्रयत्न केले. आफ्रिकेच्या पूर्व-किनाऱ्यावर आफ्रिकन लोकांचें एक प्रबळ राज्य असून, तेथचा राजा प्रेस्टर जॉन नांवानें युरोपांत प्रसिद्ध होता. त्याच्या राज्यांत मसाले पिकत. ही गोष्ट पोर्तुगालच्या जॉन ह्यास कळल्यावर तो प्रेस्टर जॉनच्या तपासास लागला. त्यासाठीं भूमध्यसमुद्रांतून व पुढें पाय-रस्त्यानें जॉननें अनेक मंडळी तपासास पाठविली. स. १४८७ त कोव्हिल्हो आणि पेव्हा ह्या दोन हुशार गृहस्थांस त्यानें पूर्वेकडे पाठविलें. ते नेपल्स् व अलेक्झांड्रियावरून कायरो येथें उतरले. तेथून मुसलमान लोकांकडून पुढील प्रदेशांची माहिती मिळवीत ते एडन येथें आले. पुनः कायरो येथें उभयतांनीं भेटावयाचा करार करून कोव्हिल्हो एडनाहून हिंदुस्थानाकडे निघाला व पेव्हा उत्तरेस इथिओ-पिया ( अबिसीनिया ) कडे गेला.

कोव्हिल्हो एका मुसलमानी गलबतांत बसून एडनहून मलबार किनाऱ्यावर काननूर व कालिकत येथें आला. कालिकत येथें सुंठ, मिरीं वगैरे जिन्नस विपुल आहेत असें त्यास दिसून आलें. पुढें गोवा व ऑर्मझ येथें जाऊन तेथून तो आफ्रिकेच्या किनाऱ्यावर सोफाला येथें उतरला. येथें त्यास मादागास्कर बेटाची व किनाऱ्याकिनाऱ्यानें खालीं दक्षिणेंत जाऊन परत युरोपांत येण्याची माहिती मिळाली. ही माहिती घेऊन तो पुन: एडनावरून कायरो येथें आला. तेथें युरोपांतून जॉन राजाकडून आलेली आणखी कांहीं मंडळी त्यास भेटली व पेव्हा मरण पावल्याचें वर्तमान कळलें. तेव्हां मिळालेली सर्व माहिती पोर्तुगाल देशास पाठवून तो ऑर्मझ येथें गेला, व तेथून एडनास येऊन इथिओपियांत उतरला. तेथें प्रेस्टरजॉन ऊर्फ अलेक्झांडर नामक राजाची व त्याची गांठ पडली. प्रेस्टर जॉननें पोर्तुगालच्या राजाबद्दल अत्यंत स्नेहभाव व्यक्त केला. पुढें कोव्हिल्हो तेथेंच राहिला; पण त्यानें आपणास मिळालेली सर्व माहिती पोर्तुगाल देशास पाठविली. ह्याप्रमाणें ह्या कोव्हिल्होच्या सफरीची हकीगत आहे.

**३. डिआझ व कोलंबस ह्यांच्या सफरी, (स. १४८७ व ९२).**— प्रेस्टर जॉनच्या देशाचा शोध लावण्यासाठीं जॉन राजानें दोन मंडळ्या पाठविल्या: एक भूमध्यसमुद्रांतून जमिनिच्या मार्गानें वर सांगितलेली, आणि दुसरी अटलांटिक महासागरांतून आफ्रिकेच्या दक्षिणबाजूनें. ह्या दुसऱ्या सफरीचें आधिपत्य बार्थोलोमो डिआझ याजकडे होतें. हा एक धाडशी खलाशी दर्यावर्दी कुटुंबांतच जन्मलेला होता. पन्नास पन्नास टनांचीं ( एक टन म्ह० सुमारें ३ खंडी ) दोन गलबतें घेऊन तो स. १४८६ च्या ऑगस्टच्या अखेरीस लिस्बन सोडून निघाला. तो थेट लांबपर्यंत आफ्रिकेच्या दक्षिणटोंकाशीं आला. तेव्हां तेथें हवाही बरीच थंड वाटूं लागली. म्हणून किनाऱ्याकडे जाण्याच्या हेतूनें

दक्षिणदिशा सोडून त्यानें पश्चिमेस गलबतें हांकारिलीं तरी किनारा सांपडेना, सबब तो परत उत्तरेस फिरला; तेव्हां त्यास किनारा लागला. ह्याचा अर्थ असा, कीं न समजतां त्यानें आफ्रिकेच्या दक्षिण टोंकास वळसा घातला. पुढें तो तसाच उत्तरेस जातांना आलगोआच्या उपसागरांतील एका बेटावर आला, त्यास त्यानें सँटा क्रूझ हें नाव दिलें, तें अद्यापि चालत आहे. थोडासा पुढें गेल्यावर एक नदी लागली, तेथून खलाशांच्या आग्रहास्तव डिआझ यास परत फिरावें लागलें. परत येतांना त्यानें पुन: आफ्रिकेच्या दक्षिण टोंकास वळसा घातला. ह्या प्रवासांत त्यास अनेक संकटें भोगावीं लागलीं, त्यांवरून त्या टोंकास त्यानें 'तुफानांचें भूशिर' असें नांव दिलें. तेथून डिआझ स. १४८७ च्या डिसेंबरांत परत लिस्बनास आला. त्याची सर्व हकीकत ऐकून राजा जॉन ह्यास अत्यंत समाधान वाटलें. कारण आफ्रिकेच्या दक्षिण टोंकाचा अंत लागून समुद्रमार्गानें हिंदुस्थानचा रस्ता मिळण्याची त्याची आशा दुणावली. त्या आनंदाच्या भरांत 'तुफानांचें भूशिर' हें नांव बदलून, त्या राजानें 'चांगल्या आशेचें भूशिर' हें अन्वर्थक नांव आफ्रिकेच्या दक्षिण टोंकास दिलें.

इकडे कोलंबस काय करीत होता हें ह्या ठिकाणीं सांगणें जरूर आहे. कोलंबस हा जिनोआचा राहणारा. जिनोआचें राज्य भरभराटींत होतें. पण तेथें कोलंबसास आश्रय मिळेना, तेव्हां पोर्तुगीझ राजाची व लोकांची प्रवासांतील धाडसाची कीर्ति ऐकून तो आश्रय मागण्याच्या हेतूनें लिस्बनास गेला. तेथेंच त्याचें लग्न झालें. भूगोलशास्त्रासंबंधीं उत्तम माहितीही तेथें त्यास मिळाली. तसेंच अटलांटिक महासागरांत पश्चिम बाजूनें वाहत आलेल्या मानव कृतीच्या अनेक चिजा त्यास पाहण्यास मिळाल्या. तेव्हां थेट पश्चिम दिशेकडे गेलें असतां, आशियाचा पूर्वकिनारा म्हणजे हिंदुस्थानचा पूर्वकिनारा आपणांस

लागेल असा त्याचा तर्क झाला. त्यानें ह्या सफरीस पोर्तुगालच्या राजाकडे मदत मागितली. राजानें त्या कामांतील निष्णात पंडितांची एक सभा बसवून तिचा अभिप्राय मागितला. कोलंबसाचा खटाटोप वेडेपणाचा आहे, त्यांत कांहीं अर्थ नाहीं, असा दोन निरनिराळ्या सभांनीं अभिप्राय दिल्यावर राजाचा निरुपाय झाला. पुढें कोलंबसाची माहिती काढून घेऊन आपणच तो प्रयत्न करावा असा एक घाट रचला गेला. पण त्याच्या माहितीचा दुसऱ्यास काय उपयोग ! ह्या दुष्ट भावानें हिरमोड होऊन कोलंबस स. १४८४त गुप्तपणें लिस्बन सोडून परत जिनोआस गेला. तेथेंही त्याचा आदर झाला नाहीं, तेव्हां अनेक संकटें सोसून त्यानें स्पेनच्या राजाराणीकडे शिफारस लाविली; तेव्हां राणी इझाबेलानें त्यास आश्रय देऊन त्याची व्यवस्था लावून दिली. ह्याप्रमाणें कोलंबस स. १४९२च्या आगष्टच्या तिसऱ्या तारखेस निघून अमेरिकेचा शोध लावून परत आल्यावर, स्पेनच्या राजाला पोप सहावा अलेक्झांडर याजकडून नवीन सांपडलेल्या मुलखाबद्दल सनद मिळाली. त्या सनदेंत असा मजकूर होता, कीं 'पूर्वी स. १४५४त पांचव्या निकोलस पोपानें आफ्रिकेच्या दक्षिणेकडील मुलखाच्या मालकीची सनद पोर्तुगालला दिलीच आहे. आतां स्पेनच्या राजाराणींनीं शोध लाविलेल्या मुलखाची मालकी त्यांस मिळावी अशी त्यांची इच्छा आहे. त्यावरून असें ठरविण्यांत येतें, कीं अझोर आणि केपव्हर्ड बेटांच्या पश्चिमेस ३०० मैलांवर एक समोर दक्षिणोत्तर मर्यादा करून, त्या रेषेच्या पूर्वेकडील नवीन, म्हणजे खिस्ती राष्ट्राचा अंमल नाहीं अशा, प्रदेशावर यावच्चन्द्रदिवाकरौ पोर्तुगालचा ताबा समजावा, आणि त्या रेषेच्या पश्चिमेकडील प्रदेशावर स्पेनचा ताबा समजावा.' पण एक राष्ट्र पूर्वेकडे व एक पश्चिमेकडे वाढत गेल्यास, दोघांची दुसऱ्या बाजूस कोठें तरी भेट झालीच पाहिजे हें पोपाच्या लक्षांत न येऊन अशी मर्यादा त्यानें ठरवून दिली.

त्या कारणानें ह्या पोपाच्या हुकुमावरून पुढें पुष्कळ तंटे उत्पन्न झाले. प्रथम तर पोर्तुगाल व स्पेन यांचाच तंटा लागून, वरील हुकमांत लिहिलेली ३०० मैलांची मर्यादा तिप्पट वाढविण्यांत आली.

ह्याप्रमाणें युरोपियन ख्रिस्ती राष्ट्रांनीं पृथ्वीवरील प्रदेशांची लूट सुरू केली, ती अद्यापि चालू आहे. ह्या राष्ट्रांनीं हा उपद्व्याप पैशाच्या लोभानें चालविला होता, हें तर उघडच आहे; पण ही अनावर धनतृष्णा त्यांनीं धर्माच्या पांघरुणाखालीं झांकून टाकिली होती. अपहारबुद्धीचें समर्थन करण्यासाठीं बिचाऱ्या ख्रिस्ती धर्माची अशी ओढाताण करण्यास प्रत्यक्ष तद्धर्मगुरूंनीं मागें पुढें पाहिलें नाहीं. पोपाच्या हुकुमांतील 'ख्रिस्ती राष्ट्राचा अंमल नसलेले नवीन प्रदेश,' हे शब्द इतके विचित्र आहेत कीं त्यांवर टीका करण्याची जरूर नाहीं. ह्या हुकमांप्रमाणें उभय राष्ट्रांत सर्व करार ठरून त्याजला पोपाची संमति पुढें ता. २४ जून, स. १५०६त मिळाली.

पूर्वसमुद्रांत पोर्तुगीझ लोकांचा एकवार प्रवेश झाल्यावर, इंग्रज खलाशी पोपाचा वरील हुकूम तोडून तेथें जाण्यास फार दिवस कांकू करीत होते, ह्याचें कारण ही पोपाची वांटणी होय. स्पेनचे व पोर्तुगीझ खलाशी इंग्रज खलाशांस चांचे व चोर असें म्हणत, त्याचें कारण हेंच. डच लोकांनीं पूर्वसमुद्रांत प्रवेश करून स्पेनच्या वैराचा सूड घेतला. इंग्रजांनीं तसेंच करून पोपाच्या विरुद्ध प्रॉटेस्टंट पंथाचा पगडा स्थापन केला. इंग्रजांचे सोन्याचे पौंड पोर्तुगाल देशांत फार चालत असत, त्या नाण्यांस पोर्तुगीझ लोक आपल्या भाषेंत 'पायरेट' म्हणजे 'चांचे' असें म्हणत.

**४. वास्को ड गामाची पहिली सफर.**—डिआझ परत आल्यावर राजा जॉन लवकरच आजारी पडून स. १४९५त मरण पावला. पश्चात् त्याचा मुलगा इमॅन्युएल गादीवर आला. हा राजाही शहाणा असून

त्यानें पूर्वीच्या अनुभवाचा उपयोग करून हिंदुस्थानास जाण्याचा जलमार्ग शोधण्याचें काम नेटानें चालविलें. प्रसिद्ध ज्योतिषांकडून प्रश्न पाहवून ह्या उद्योगांत सिद्धि येईल असें त्यांचें अभिवचन मिळविलें. ह्या कामासाठीं त्यानें तीन गलबतें मुद्दाम बांधविलीं, आणि त्यांची सर्व सिद्धता करून त्या सफरीवर वास्को ड गामा नामक एका हुशार दर्यावर्दी खलाशाची नेमणूक केली. त्या गलबतांचा आकार १२९ पासून ३०० टन पावेतों होता, वास्को ड गामा ह्याजबरोबर त्याचा भाऊ पोलो ड गामा हाही ह्या प्रवासांत होता. शिवाय डिआझच्या सफरींतील कांहीं खलाशी व बोर्थोलोमो डिआझचा भाऊ डिओगो डिआझ हेही बरोबर होते. सर्व मिळून ह्या प्रवासांत सुमारें दोनशें लोक होते. त्यांची सर्व तयारी व सिद्धता राजानें स्वतः मेहनत करून तडीस नेली. शनिवार ता. ८ जुलै स. १४९७ रोजीं हीं गलबतें यूरोपचा किनारा सोडून निघालीं. ऑक्टोबरनोव्हेंबरच्या सुमारास आफ्रिकेचें दक्षिण टोंक त्यांनीं ओलांडिलें, तेथें त्यांस तुफानांचा इतका त्रास झाला, कीं लोक पुढें जाण्यास धजेनात व बंडावा करूं लागले. तेव्हां गामानें सर्वांस दहशत घालून कित्येक पुढाऱ्यांस अटकेंत ठेविलें आणि बंदोबस्त केला. पुढें ख्रिस्ट्मस डे म्हणजे डिसेंबरच्या पंचवीस तारखेस त्यांस किनाऱ्याची जमीन लागली, त्यास नेटल ( म्हणजे ख्रिस्ताचा जन्मदिवस ) हें नांव त्यांनीं दिलें, तें अद्यापि चालत आहे. सन १४९८ च्या मार्चांत ते मोझांबिक येथें आले. रस्त्यांत त्यांनीं मुसलमान लोकांची एक होडी पकडिली; त्यांत मुंबईकडचा एक मुसलमान दलाल त्यांस सांपडला. त्यास इकडील रस्त्यांची व व्यापाराची उत्तम माहिती असल्यामुळें त्याचाच गामा ह्यास फार उपयोग झाला. त्याचें नांव दावणे ( Davanè ). दलालांच्या स्वराष्ट्रद्रोहामुळेंच अनेक प्रसंगीं गामाचा निभाव लागला आहे. आफ्रिकेच्या किनाऱ्यावरील आरब मुसलमान अधिकारी

पोर्तुगीझ लोकांस ओळखून होते. हे लोक इकडे आल्यानें आपल्या हातचा व्यापार जाऊन आपलें सर्वस्वी नुकसान होईल हें त्यांस ठाऊक होतें. म्हणूनच गामाचा नाश करण्याचे त्यांनीं अनेक प्रयत्न केले; पण एतद्देशीय लोकांनींच त्यास सावध केल्यामुळें त्याचा बचाव झाला.

ह्याप्रमाणें मोंझांबिक, मोंबासा वगैरे ठिकाणांहून गामा मलिंद ( ? ) येथें आला ( एप्रिल, १४९८ ). मलिंदच्या राजानें त्याचा चांगला सत्कार केला. 'खंबायत येथें न जातां कालिकोट येथें जा', असें त्यास ह्याच राजानें सांगितलें; आणि पोर्तुगीझ लोकांशीं इमानानें वागण्या-विषयीं दावणे ह्यासही त्यानें उपदेश केला. मलिंद येथें तीन महिने राहून गामानें आपल्या जहाजांची दुरुस्ती केली; आणि पुढील समुद्राची माहिती असलेले कांहीं हुशार खलाशी बरोबर घेऊन, तो ता. ६ ऑ-गस्ट रोजीं तेथून निघाला, व वीसबावीस दिवसांनीं कालिकोट बंद-राजवळ त्यानें आपलीं जहाजें नांगरिलीं.

पोर्तुगीझ लोकांस हिंदुस्थानांत येण्याचा समुद्रमार्ग सांपडला, तेव्हां 'भुकेलेल्या लांडग्यांचे कळप उत्कृष्ट मेंढरांच्या कळपांवर जसे जाऊन पडतात', तशीच त्यांची स्थिति झाली. हजारों वर्षांच्या व्यापारानें धनसंपन्न झालेला प्रदेश त्यांच्या नजरेस पडला. त्या वेळीं कालिकोट, ओर्मझ, एडन आणि मलाका हीं व्यापाराचीं मोठीं शहरें होतीं. ह्या बंदरांतून इकडचे जिन्नस आरब लोक आपल्या जहाजांतून युरोपास पुरवीत असत. मोलक्कांतील मसाले व एबनी, टिमोरचें चंदन, बोर्निओचा कापूर, सुमात्रा आणि जावा येथील सुगंधी गोंद ( benzoin ), कोचीन चायनांतील कोरफडीचें लांकूड ( aloes wood ); चीन, जपान व सयाम येथील अत्तरें, डिंक, मसाले, रेशीम व खेळ; पेगूचीं रत्नें; कारो-मांडेल किनाऱ्यावरील तलम वस्त्रें; बंगाल्यांतील बहुमोल वस्त्रें, नेपाळ व भूतान येथील स्पिकेनार्डचा (spikenard?) सुगंध, गोवळकोंड्याचे

त्यानें पूर्वीच्या अनुभवाचा उपयोग करून हिंदुस्थानास जाण्याचा जल-मार्ग शोधण्याचें काम नेटानें चालविलें. प्रसिद्ध ज्योतिषांकडून प्रश्न पाहवून ह्या उद्योगांत सिद्धि येईल असें त्यांचें अभिवचन मिळविलें. ह्या कामासाठीं त्यानें तीन गलबतें मुद्दाम बांधविलीं, आणि त्यांची सर्व सिद्धता करून त्या सफरीवर वास्को ड गामा नामक एका हुशार दर्यावर्दी खलाशाची नेमणूक केली. त्या गलबतांचा आकार १२९ पासून ३०० टन पावेतों होता, वास्को ड गामा ह्याजबरोबर त्याचा भाऊ पोलो ड गामा हाही ह्या प्रवासांत होता. शिवाय डिआझच्या सफरींतील कांहीं खलाशी व बोर्थोलोमो डिआझचा भाऊ डिओगो डिआझ हेही बरोबर होते. सर्व मिळून ह्या प्रवासांत सुमारें दोनशें लोक होते. त्यांची सर्व तयारी व सिद्धता राजानें स्वतः मेहनत करून तडीस नेली. शनिवार ता. ८ जुलै स. १४९७ रोजीं हीं गलबतें यूरोपचा किनारा सोडून निघालीं. ऑक्टोबरनोव्हेंबरच्या सुमारास आफ्रिकेचें दक्षिण टोंक त्यांनीं ओलां-डिलें, तेथें त्यांस तुफानांचा इतका त्रास झाला, कीं लोक पुढें जाण्यास धजेनात व बंडावा करूं लागले. तेव्हां गामानें सर्वांस दहशत घालून कित्येक पुढाऱ्यांस अटकेंत ठेविलें आणि बंदोबस्त केला. पुढें क्रिस्ट्मस डे म्हणजे डिसेंबरच्या पंचवीस तारखेस त्यांस किनाऱ्याची जमीन लागली, त्यास नेटल ( म्हणजे क्रिस्ताचा जन्मदिवस ) हें नांव त्यांनीं दिलें, तें अद्यापि चालत आहे. सन १४९८ च्या मार्चांत ते मोझांबिक येथें आले. रस्त्यांत त्यांनीं मुसलमान लोकांची एक होडी पकडिली; त्यांत मुंबईकडचा एक मुसलमान दलाल त्यांस सांपडला. त्यास इकडील रस्त्यांची व व्यापाराची उत्तम माहिती असल्यामुळें त्याचाच गामा ह्यास फार उपयोग झाला. त्याचें नांव दावणे ( Davanè ). दलालांच्या स्वराष्ट्रद्रोहामुळेंच अनेक प्रसंगीं गामाचा निभाव लागला आहे. आफ्रिकेच्या किनाऱ्यावरील आरब मुसलमान अधिकारी

पोर्तुगीझ लोकांस ओळखून होते. हे लोक इकडे आल्यानें आपल्या हातचा व्यापार जाऊन आपलें सर्वस्वी नुकसान होईल हें त्यांस ठाऊक होतें. म्हणूनच गामाचा नाश करण्याचे त्यांनीं अनेक प्रयत्न केले; पण एतद्देशीय लोकांनींच त्यास सावध केल्यामुळें त्याचा बचाव झाला.

ह्याप्रमाणें मोंझांबिक, मोंबासा वगैरे ठिकाणांहून गामा मलिंद ( ? ) येथें आला ( एप्रिल, १४९८ ). मलिंदच्या राजानें त्याचा चांगला सत्कार केला. 'खंबायत येथें न जातां कालिकोट येथें जा', असें त्यास ह्याच राजानें सांगितलें; आणि पोर्तुगीझ लोकांशीं इमानानें वागण्याविषयीं दावणे ह्यासही त्यानें उपदेश केला. मलिंद येथें तीन महिने राहून गामानें आपल्या जहाजांची दुरुस्ती केली; आणि पुढील समुद्राची माहिती असलेले कांहीं हुशार खलाशी बरोबर घेऊन, तो ता. ६ ऑगस्ट रोजीं तेथून निघाला, व वीसबावीस दिवसांनीं कालिकोट बंदराजवळ त्यानें आपलीं जहाजें नांगरिलीं.

पोर्तुगीझ लोकांस हिंदुस्थानांत येण्याचा समुद्रमार्ग सांपडला, तेव्हां 'भुकेलेल्या लांडग्यांचे कळप उत्कृष्ट मेंढरांच्या कळपांवर जसे जाऊन पडतात', तशीच त्यांची स्थिति झाली. हजारों वर्षांच्या व्यापारानें धनसंपन्न झालेला प्रदेश त्यांच्या नजरेस पडला. त्या वेळीं कालिकोट, ओर्मझ, एडन आणि मलाका हीं व्यापाराचीं मोठीं शहरें होतीं. ह्या बंदरांतून इकडचे जिन्नस आरब लोक आपल्या जहाजांतून युरोपास पुरवीत असत. मोलक्कांतील मसाले व एबनी, टिमोरचें चंदन, बोर्निओचा कापूर, सुमात्रा आणि जावा येथील सुगंधी गोंद ( benzoin ), कोचीन चायनांतील कोरफडीचें लांकूड ( aloes wood ); चीन, जपान व सयाम येथील अत्तरें, डिंक, मसाले, रेशीम व खेळ; पेगूचीं रत्नें; कारोमांडेल किनाऱ्यावरील तलम वस्त्रें; बंगाल्यांतील बहुमोल वस्त्रें, नेपाळ व भूतान येथील स्पिकेनार्डचा (spikenard?) सुगंध, गोवळकोंड्याचे

हिरे; निर्मूलचें पोलाद; सिलोनचे मसाले, पाच व मोत्यें; मलबारांतील मसाले व साग; खंबायतेंतील लाख, कलाबतू व जवाहीर; काश्मिरांतील शाली व नकशीचीं भांडीं; सिंधमधील गोंद ( bdellium? ); तिबेटांतील कस्तुरी; खुरासानांतील वनस्पति ( galbanum? ); आफगाणिस्थानांतील कात; इराणांतील गोंद ( sagapenum? ); झांजीबार, बर्बर, व शहर येथील अंबर, हस्तीदंत, पाच, सुगंधी द्रव्यें; वगैरे जिनसांची देवघेव कालिकोट बंदरांत चालत असे.*

---

* अलीकडच्या अनेक शोधांवरून हिंदुस्थानच्या प्राचीन सुधारणेची खरी माहिती उपलब्ध होत असून, प्रजासत्ताक राज्यव्यवस्था, नौकानयनकुशलता, परदेशांशीं व्यापार, इत्यादि अनेक महत्त्वाच्या कामांत हिंदुलोक प्राचीन काळापासून प्रवीण होते ही गोष्ट ज्यास्त ज्यास्त निदर्शनास येत चालली आहे. हिंदुलोक नौकानयनांत कुशल होते, त्यांजपाशीं मोठमोठीं गलबतें होतीं; त्या गलबतांतून ते दूरपर्यंत मोठमोठ्या समुद्रांवर प्रवास करीत असत; दहाव्या शतकापर्यंत ह्या कामांत त्यांची बरोबरी करणारे दुसरे लोक नव्हते; पूर्वेकडे चीनजपानपावेतों व पश्चिमेकडे अफ्रिकेच्या सर्व पूर्वकिनाऱ्यावर हिंदु व्यापाऱ्यांचा संचार होता. जावा, बोर्निओ, सुमात्रा इत्यादि बेटांत हिंदूंनीं मोठमोठ्या वसाहती स्थापिल्या होत्या; तसेंच एडन, सोकोत्रा, मोझांबीक इत्यादि सर्व ठिकाणीं त्यांचा प्रवेश होता. जावा वगैरे बेटांतील देवळें, जुन्या इमारती, तेथच्या लोकांचे धर्माचार व रीतरिवाज हे सर्व हिंदु लोकांसारखेंच असून, पश्चिमेस आरबस्तानपासून, पूर्वेस चीनदेशापावेतों अर्ध्या अधिक आशियाखंडास सर्व प्रकारची सुधारणा हिंदुस्थानानें पुरविली होती. अशी माहिती अलीकडे उपलब्ध झाली आहे. [ बांबे गॅझेटियर, व्हा. १,–गुजराथचा इतिहास, ह्या पुस्तकांत जावा व कंबोडिया ह्यांजवर शेवटीं दोन लेख आहेत त्यांत वरील मजकूर आहे.] गुजराथ, काठेवाड, सिंध, माळवा, पंजाब वगैरे प्रांतांतून पुष्कळ लोक जावा व इतर बेटांत जात व तेथें वसाहती करून राहत. हिंदुस्थानांतल्यासारखीं लेणीं जावा बेटांत सांपडलीं आहेत. दोनही लेण्यांतील मूर्तींचें व खोदीव काम अगदीं हुबेहूब आहे. गुजराथ किनाऱ्यावरील ऐतिहासिक माहितीवरून कळून येतें, कीं गेल्या दोन

ह्या वेळीं कालिकोट शहर खरोखर मोठ्या भरभराटींत होतें. तेथच्या राजास झामोरिन ऊर्फ सामुद्री म्हणत. त्या ठिकाणचा व्यापार सुमारें सहाशें वर्षांपासून आरब मुसलमानांच्या ताब्यांत होता. मक्का आणि कायरो ह्या शहरच्या श्रीमान व्यापाऱ्यांचीं मोठमोठीं गलबतें आरबी समुद्रांत एकसारखीं फिरत असत. हिंदुस्थानांतील जिन्नस इजिप्ट देशांतून युरोपास पुरविण्याचा संपूर्ण मक्ता आरबांच्या ताब्यांत असल्यामुळें ते व्यापारी फार सधन व वजनदार झाले होते. त्यांस ह्या पोर्तुगीझ लोकांचें इकडे येणें आवडलें नाहीं. पोर्तुगीझ लोकांस इकडे येऊं दिल्यानें काय अनर्थ उद्भवतील हें त्यांस उत्तम प्रकारें ठाऊक होतें; आणि त्यांचा येथून उच्छेद करण्यासाठीं त्यांनीं अतिशय प्रयत्न केले. पण वास्को ड गामाही मोठा चाणाक्ष असल्यामुळें, त्यानें मुसलमानांच्या सर्व युक्त्या हाणून पाडिल्या. प्रथमच त्यानें अशी आफवा उठविली, कीं पोर्तुगीझ लोकांचें एक मोठें आरमार सफरीस निघालें आहे. आपलीं हीं गलबतें त्यांपैकींच असून, त्यांची आपली चुकामूक झाल्यामुळें, बाकीच्या गलबतांचा शोध लावण्यासाठीं आपण येथें आलों आहों; बाकी हिंदुस्थानाकडे येण्याचा आपला मनोदय नाहीं. गामाचे मनांत एकदम किनाऱ्यावर जाऊन कालिकोटच्या राजास भेटावें असें होतें. पण दावणे ह्यानें त्यास सावध करून सांगितलें कीं, राजाकडून ओलीस माणसें आणवून तीं आपल्या जहाजांवर कबजांत ठेविल्याशिवाय तुम्हीं बाहेर पडू नये. ही गोष्ट गामास बरोबर पटली. जहाजांजवळ अनेक होड्या सामान विकण्याकरितां येत,

---

हजार वर्षांत ह्या किनाऱ्यावरील लोकांनीं दर्यावर्दीपणांत कौशल्य दाखवून वायव्य-हिंदुस्थानच्या लोकांस मॅलेद्वीपसमूहांत नेऊन तेथें त्यांच्या उत्कृष्ट वसाहती वसविल्या आहेत. व्यापार, वसाहती व द्रव्यार्जन ह्या उद्देशांनीं हिंदुस्थानचे लोकही समुद्रप्रवास करून दूरदेशीं जात असत.

त्या सामानांची किंमत लोक मागतील ती द्यावी अशी ताकीद गामानें आपल्या लोकांस दिल्यामुळें पोर्तुगीझ लोकांच्या औदार्यविषयीं शहरांत मोठा पुकारा झाला. तीन दिवसांनीं कोलिकोटच्या राजानें मनुष्य पाठवून, 'तुम्हीं काय उद्देशानें आलां आहां' असा तपास केला. त्यावर दावणे यास राजाकडे पाठवून 'हरवलेल्या गलबतांचा शोध करण्यास आलों आहों; आतां मसाले वगैरे विकत घेऊन परत जाऊं' असें गामानें राजास कळविलें. गामानें मलिंदच्या राजास अनेक मौल्यवान वस्तु नजर केल्या असें दावणे ह्यानें झामोरिन ह्यास कळविल्यावर, झामोरिनच्या तोंडास पाणी सुटून त्यानें मिरीं वगैरे सामान वाटेल तितकें विकत घेण्याची परवानगी गामा ह्यास दिली.

झामोरिनचा हा हुकूम ऐकून आरब व्यापारी चपापून गेले. त्यांनीं ही गोष्ट पश्चिम किनाऱ्यावरील सर्व बंदरांच्या व्यापाऱ्यांस कळविली, व राजानें आपला हुकूम फिरवावा म्हणून त्याच्या कामगारांमार्फत खटपट चालविली. राजाच्या कामगारांस त्यांनीं असें कळविलें, कीं 'पोर्तुगीझ लोक सधन आहेत; ते केवळ व्यापाराकरितांच इतक्या दूर आलेले नाहींत; हा देश व येथची अंतःस्थिति निरखून पाहवी व मग परत जाऊन मोठमोठीं लढाऊ आरमारें आणून हा देश जिंकावा असा त्यांचा इरादा आहे.' ह्याप्रमाणें सांगून त्यांनीं नजरनजराणे देऊन कामगार लोक वश करून घेतले.

इकडे गामानेंही आपले हेर व दुभाष्ये पाठवून मुसलमानांच्या बेतांची इत्थंभूत माहिती काढून आणिली. परीझ नांवाचा एक स्पेनचा गृहस्थ मुसलमान होऊन कालिकोट येथें राहिला होता. त्यास दावणे ह्यानें गलबतांवर आणून गामास भेटविलें. हा परीझ शहरांत मुसलमानांशीं दोस्ती दाखवी; व आंतून त्यांच्या सर्व गुप्त बातम्यांची वर्दी गामास देई. एवंच दावणे व परीझ हे दोन विश्वासघातकी

मनुष्य गामाच्या विशेष उपयोगी पडले. त्यांच्या शिकवणीनें गामाच्या वकिलांनीं राजाच्या मुलाकती घेतल्या; आणि दररोज कांहीं माल किनाऱ्यावर आणून विकावयाचा व कांहीं विकत घेऊन गलबतांवर न्यावयाचा असा क्रम चालविला. ह्या व्यापारांत घासाघीस करावयाची नाहीं, माल बरावाईट पाहवयाचा नाहीं, वजनांची तक्रार करावयाची नाहीं, असा पोर्तुगीझ लोकांनीं उद्योग चालविला. हें पाहून मुसलमान व्यापाऱ्यांनीं राजास कळविलें, कीं ' हे कोणी तरी दुष्ट हेतूनें आलेले गुप्त हेर आहेत. खरे व्यापारी असा आंतबट्टयाचा व्यापार कधीं करणार नाहींत. ह्यांस ठार मारून ह्यांचीं गलबतें वगैरे जाळून टाकावीं. '

पुढें राजानें गलबतांवर आपले ओलीस पाठविले, त्यांस ठेवून घेऊन वास्को ड गामा राजाच्या भेटीस गेला. त्यानें उत्तम प्रकारचा पोषाख केला होता. त्यानें अनेक उत्तमोत्तम चिजा राजास बरोबर नेऊन नजर केल्या. राजाची भेट घेऊन परत येत असतां अधिकारी लोकांनीं त्यास भलत्याच ठिकाणीं नेऊन अटकेंत ठेविले. कोणीकडून तरी गामास चिडवून त्यास भलतेंच कृत्य करावयास लावावयाचें असा कामगारांचा उद्देश होता. ही गोष्ट हेरांमार्फत अगोदरच गामास कळली असल्यामुळें तो अत्यंत शांतपणानें वर्तत होता. त्याजविरुद्ध कागाळ्या आल्यामुळें राजासही राग आला होता; व त्यास मारून टाकावें असा राजानें हुकूमही सोडिला होता. तेव्हां गामाच्या भावानें गलबतावर असलेले ओलीस एकदम परत पाठवून दिले. त्यांनीं पोर्तुगीझ लोकांच्या चांगुलपणाबद्दल राजाची खात्री केली, आणि अशा शिताफीनें गामाची सुटका झाली. मध्यंतरीं त्याचा सौदा संपलाच होता. तेव्हां ' आम्हांस इतका त्रास दिल्याबद्दल तुमचा सूड घेतल्याशिवाय राहणार नाहीं,' अशी धमकी परीझच्या मार्फत राजास व सर्व मुसलमान व्यापाऱ्यांस

देऊन, गामा नोव्हेंबरच्या सुमारास परत निघाला. निघण्यापूर्वी राजानें त्याची क्षमा मागून त्यास कळविलें, कीं 'गुन्हेगार मंडळीस आम्हीं शिक्षा केलीच आहे, तेव्हां राग सोडून तुम्हीं पुनरपि आमच्या देशास येऊन व्यापार करावा.' परत जातेवेळीं झामोरीननें पोर्तुगालच्या राजास एक पत्र दिलें त्यांतील मतलब. 'आपल्या घराण्यांतील सरदार वास्को ड गामा हे आमच्या राज्यांत आल्यामुळें आम्हांस फार संतोष होत आहे. आमच्या राज्यांत दालचिनी, लवंग, सुंठ, मिरीं आणि जवाहीर यांची समृद्धि असून, त्यांच्या बदलीं आपलेकडून सोनें, चांदी, पोवळीं, इत्यादि जिन्नस आम्हांस मिळावे, अशी आमची इच्छा आहे.'

कालिकोटहून निघून गामा काननूर येथें गेला. काननूरच्या राजाला कालिकोटची सर्व खबर लागली होती, व त्याजकडे दोनही पक्षांचे वशिले आले होते. त्यावरून पोर्तुगीझ लोकांशीं सख्य करण्याचाच त्यानें निश्चय करून, बंदरांत येतांच गामा ह्यास त्यानें आपल्याकडे बोलवून घेतलें; त्याजबरोबर पोर्तुगालच्या राजाशीं दोस्तीचा व व्यापाराचा तह केला; व त्यास नजराणे वगैरे देऊन रजा दिली. गामानेंही त्याचा सत्कार चांगला केला. येथें त्यास व्यापाराचे जिन्नस इतके मिळाले कीं, गलबतांत जागा नाहीं म्हणून ते त्यास सोडून द्यावे लागले. असें काम करून ता. २० नोव्हेंबर सन १४९८ रोजीं गामा परत युरोपास निघाला. रस्त्यांत वारा पडल्यामुळें, गोव्यानजीक अंजद्वीपाजवळ त्यास वरवा करावा लागला. पुढें तेथून निघून गामा ता. ८ जानेवारी १४०९ रोजीं मलिंद येथें आला. तेथें राजानें त्याचा सत्कार उत्तम केला. त्यानें गामास जे दोन खलाशी दिले होते, ते त्यानें आपणासाठीं मागून घेऊन युरोपास नेले. तेथून ता. २० रोजीं गामा पुढें निघाला, तो ता. १८ सेप्टेंबर १४२९ रोजीं परत लिस्बन येथें येऊन पोंचला.

रस्त्यांत त्याचा भाऊ पोलो गामा आजारी पडून मरण पावला. ह्या हिंदुस्थानच्या सफरीस त्या वेळीं ९ पासून १२ महिने लागत.

स्वदेशीं परत आल्यावर राजानें वास्को ड गामाचा उत्तम प्रकारचा सत्कार केला हें सांगणें नकोच. आज कित्येक शतकांचा व पिढ्यांचा प्रयत्न तडीस गेल्याबद्दल त्यास अत्यंत धन्यता वाटली. तो मोठ्या समारंभानें सामोरा जाऊन गामास भेटला व त्याजला डॉम ( ड्यूक ऊर्फ सरदार ) ही पदवी दिली. गामानें आणिलेले नजराणे पाहून राजा फारच संतुष्ट झाला. गामाच्या जहाजांतून आणलेला माल विकल्यावर असें आढळून आलें, कीं ह्या सर्व सफरीस जेवढा खर्च लागला होता, त्याच्या साठपट उत्पन्न हातीं आलें. त्या वेळीं युरोपांत मिरीं दर पौंडास १ शि. ९ पे., दालचिनी ३ शि. २ पे, सुंठ २ शि. १ पे, जायपत्री ५ शि. ३ पे, व जायफळ १ शि. ९ पे., ह्या भावानें मसाले विकले जात असत. गामा ह्यास राजानें मोठमोठीं बक्षिसें व नेमणुका करून दिल्या.

ह्याप्रमाणें हिंदुस्थानास जाण्याचा जलमार्ग पोर्तुगीझ लोकांस सांपडल्यामुळें एकंदर जगाच्या इतिहासांत मोठी क्रांति घडून आली. कालिकोटच्या मुसलमान व्यापाऱ्यांस जी भीति त्या वेळीं वाटली तीच पुढें खरी झाली, हें पुढील इतिहास सांगत आहेच. युरोपांत पोर्तुगालचें महत्त्व वाढलें; व्हेनिस, जिनोआ वगैरे राष्ट्रांचा व्यापार बसला; व नौकानयनकलेंत प्रवीण असलेलीं राष्ट्रें उदयास आलीं. "इथिओपिया,* आरेबिआ, पर्शिया आणि चीन ह्या देशांच्या व्यापाराचे, नौकानयनाचे व जिंकलेल्या प्रदेशाचे मालक" ( Lords of the Conquests, Navigation, and Commerce of Ethiopia, Arabia, Persia and China) ही भव्य पदवी पोर्तुगालच्या राजास मिळाली.

---

* इथिओपिया ह्मं० इजिप्तच्या दक्षिणेकडील नीग्रो लोकांचा देश.

९. **पेड्रो काब्रालची सफर.**–( स. १५०० ) वास्को ड गामा परत आल्यावर त्याच्या सांगणीनें एक गोष्ट सर्व पोर्तुगीझ दरबारच्या व लोकांच्या मनावर ठसली, ती ही कीं, हिंदुस्थानचा व्यापार ताब्यांत घ्यावयाचा असेल तर आरब मुसलमानांशीं निकराचें युद्ध चालविलें पाहिजे. ह्यास्तव मोठमोठीं तेरा गलबतें, तोफा, युद्धसामुग्री व उत्तमोत्तम खलाशी तयार करून, इ. स. १५०० ह्या सालीं पोर्तुगालच्या राजानें पेड्रो काब्राल ह्यास कालिकोटास पाठविलें. बरोबर कालिकोटच्या राजास देण्याकरितां अनेक चिजा होत्या व त्याजशीं व्यापाराचा तह करावा अशी काब्राल ह्यास ताकीद होती. बार्थोलोमो डिआझही ह्या स्वारीबरोबर होता. एकंदर ह्या स्वारींत १२०० मनुष्य होतें व पाद्री लोक बरेच होते. ही स्वारी ता. ९ मार्च सन १५०० रोजीं पोर्तुगाल देशाहून निघाली. केपव्हर्ड बेटास लागल्यावर काब्रालचीं गलबतें वाऱ्याच्या जोरानें नैर्ऋत्येच्या बाजूस गेलीं. तिकडे त्यास दक्षिण अमेरिकेच्या पूर्वकिनाऱ्यावरील ब्राझील देश लागला. ही खबर पोर्तुगाल देशास पाठवून काब्राल आग्नेयीस वळला. रस्त्यांत मोठें तुफान होऊन चार गलबतें बुडालीं आणि वरचे सर्व लोक मरण पावले. त्यांत बार्थोलोमो डिआझही मरण पावला. रस्त्यांत आणखी एकदोन गलबतें जायबंदी होऊन मंडळी दोन ऑगस्ट रोजीं मलिंद येथें आली. मलिंद येथून दोन गुजराथचे माहीतगार खलाशी बरोबर घेऊन काब्राल निघाला तो प्रथम घोघो बंदराजवळ आला; तेथून दक्षिणकिनाऱ्यानें अंजद्वीपास व तेथून ३० ऑगस्ट रोजीं कालिकोटच्या बंदरांत दाखल झाला. ह्या खेपेस पोर्तुगाल देशाहून हिंदुस्थानास येण्यास काब्राल ह्यास सुमारें सहा महिने लागले.

कालिकोटच्या राजाकडून ओलीस मंडळी आणवून काब्रालनें किनाऱ्यावर जाऊन राजाची भेट घेतली. उभयतांमध्यें दोस्तीचा तह

झाला; आणि पोर्तुगीझांनीं तेथें एक वखार घातली. इतकें सगळें झालें तरी मुसलमान व्यापारी त्यांस सामान मिळूं देईनात. दोन महिन्यांत दोन गलबतांची सुद्धां भरती झाली नाहीं. तेव्हां पोर्तुगीझ जहाजांची व मुसलमान जहाजांची लहानशी लढाई होऊन पन्नाससाठ पोर्तुगीझ मारले गेले. पुढें मुसलमानांचीं दहा जहाजें बुडवून काब्राल कालिकोट सोडून निघाला, तो डिसेंबरांत कोचीन येथें आला. रस्त्यांत आणखी दोन मुसलमानांचीं जहाजें त्यानें बुडविलीं. ह्याप्रमाणें आरब व्यापारी व पोर्तुगीझ या दोघांचा झगडा पुष्कळ दिवस चालू राहिला; आणि त्यांत निरनिराळ्या पक्षाचे लोक सामील झाले. व्हेनिशन लोकांचा आश्रय मुसलमानांस होता. कोचीनचा राजा त्रिमंपारा यानें काब्रालचा सत्कार चांगला करून त्यास व्यापाराचे जिन्नस विकत घेण्याची मोकळीक दिली. कोचीन शहर त्या वेळीं अगदीं भिकार होतें, आणि राजाचें वैभवही थोडेंच होतें. परंतु त्याच्या चांगुलपणाचें बक्षीस म्हणून 'कालिकोट जिंकून तुम्हांस देऊं' असें काब्राल ह्यानें त्यास अभिवचन दिलें. कोचीन येथें वखार घातली त्यावर काब्रालनें बार्बोझा नांवाचा पोर्तुगीझ व्यापारी मुख्य नेमिला. अशा प्रकारें परक्या ठिकाणीं वखारी घालून आपले व्यापारी ठेवून देणें; व त्यांजकडून युरोपच्या मालाची विक्री करवून, सभोंवारच्या प्रदेशांत उत्पन्न झालेला माल खरेदी करून युरोपास पाठविणें हा व्यापाऱ्यांचा प्रघात हिंदुस्थानांत फार प्राचीन काळापासून सुरू होता. अद्यापिही रॅली ब्रदर्स सारखे व्यापारी ह्याच प्रकाराचें अवलंबन करीत आहेत. पुढें कोचीन सोडून काब्राल काननुरास गेला. तेथच्या राजानें त्याजबरोबर आपला एक वकील पोर्तुगाल देशास पाठविला. लगेच, काब्राल ता. १६ जानेवारी रोजीं परत युरोपास निघाला. कोचीनच्या राजानें नायर लोक गलबतांवर ओलीस दिले होते, तेही तो बरोबर युरोपास घेऊन

गेला. ह्यावरून दोस्त असलेल्या कोचीनच्या राजाशीं त्यानें केवढा दुष्टपणा केला पहा. कोचीन येथें ठेविलेल्या युरोपियन व्यापाऱ्यांचीही त्यानें कांहीं योजना केली नाहीं. तथापि कोचीनच्या राजानें त्यांस फार चांगल्या रीतीनें वागवून पुढें सुरक्षित परत पाठविलें. काब्राल परत येतांना रस्त्यांत मलिंद येथें त्याचें एक गलबत खडकावर आपटून फुटलें. ह्याप्रमाणें संकटें सोशीत ता. २१ जुलई स. १५०१ रोजीं काब्राल लिस्बनास पोंचला. त्यानें आणिलेल्या जिनसांची यादी—दालचिनी, आलें, सुंठ, मिरीं, लवंग, जायपत्री, जायफळ, कस्तुरी, civet, storax, benzoin, मातीचीं भांडीं, cassia, mastic, जळाऊ सुगंध, पाच ( myrrth ) लाल व सफेत चंदन, कोरफड, कापूर, अंबर, caune, लाख, बाहुल्या, anib, tuzzia, अफू वगैरे.

काब्राल परत आल्यावर पोर्तुगालच्या राजानें चार गलबतें ड नोव्हा नामक कप्तानाच्या हाताखालीं हिंदुस्थानांत पाठविलीं. त्यांची व कालिकोटच्या गलबतांची वरीच मोठी लढाई होऊन पोर्तुगीझ लोकांस जय मिळाला. ह्या लढाईत कोचीनच्या राजानें युरोपियनांस मदत केली. कालिकोटच्या एका गलबतावर १५०० उत्तम मोत्यें, व कांहीं रत्नें व खलाशी लोकांस उपयोगी पडणारीं तीन चांदीचीं यंत्रें ड नोव्हास मिळालीं. हीं यंत्रें यूरोपच्या लोकांस माहीत नव्हतीं. हें सर्व सामान घेऊन व गलबतें मालानें भरून ड नोव्हा परत आला. परत येतांना ता. २१ मे स. १५०२ रोजीं एक बेट त्यास लागलें. त्या दिवशीं कान्स्टंटाईन धि ग्रेट बादशहाची आई हेलेना हिची पुण्यतिथि असल्यामुळें, त्या बेटास त्यानें सेंट हेलेना हें नांव दिलें. त्या वेळीं तेथें वस्ती बिलकूल नव्हती; व ओळखीचीं जनावरेंही नव्हतीं. ड नोव्हानें बकरीं, गाढवें, डुकरें वगैरे जहाजावर असलेलीं कित्येक जनावरें

त्या बेटावर सोडून दिलीं. तेथें पाणी उत्तम असल्यामुळें जहाजांस ह्या बेटाचा फार उपयोग होऊं लागला.

६. **वास्को ड गामाची दुसरी सफर.**—काब्रालच्या वृत्तांतावरून हिंदुस्थानच्या व्यापारासाठीं कालिकोटच्या राजाशीं खडाजंगीचें युद्ध करणें जरूर आहे, असें पोर्तुगालच्या राजास वाटून त्यानें एक मोठें लढाऊ आरमार तयार केलें; व त्यावर वास्को ड गामा ह्यास मुख्य नेमिलें. ह्या आरमारांत वीस गलबतें होतीं; व आठशें लढाऊ लोक होते. त्यांस प्रोत्साहन मिळण्याकरितां खासगी रीतीनें मसाले वगैरे आणून विकण्याची त्यांस परवानगी देण्यांत आली. हें आरमार मार्च १५०२ त निघालें. रस्त्यांत मोझांबीक, किल्वा वगैरे ठिकाणच्या राजांकडून करभार घेऊन आगष्टांत ते मलिंद येथें आले. किल्वा येथें कित्येक मुसलमानी बायका ख्रिस्ती होण्याच्या हेतूनें पोर्तुगीझ जहाजांवर आल्या. त्यांपैकीं लग्न झालेल्या स्त्रियांस गामानें परत पाठविले व बाकीच्यांस ठेवून घेतलें. मलिंद सोडून ते प्रथम दाभोळ व तेथून अंजद्वीपावरून काननूरला येत असतां हानावरच्या खाडींत त्याची तिमय्या नामक एका दर्यावर्दी लुटारू नायकाची गांठ पडली. गामानें तिमय्याचा पाठलाग करून त्याचें गलबत जाळून टाकिलें. दुसऱ्या दिवशीं ते भटकळ येथें आले. भटकळ शहरांत भरभराटीचा व्यापार चालत असून तें विजयनगरच्या राजाच्या ताब्यांत होतें. तेथच्या अधिकाऱ्याजवळून जबरदस्तीनें आपल्या फायद्याचा ठराव करून घेऊन, गामा काननुरास आला. रस्त्यांत मुसलमानांचें मौल्यवान मालाचें एक जहाज त्यानें जाळून टाकिलें. त्याजवरील लोक प्राण जाईपर्यंत पोर्तुगीझांशीं लढले. काननूरच्या राजाच्या व गामाच्या स्नेहपूर्वक भेटी झाल्या. परस्पर नजरनजराणे वगैरे झाले. सर्व व्यापाऱ्यांच्या संमतीनें त्यांनीं मालाच्या

खरेदीविक्रीचीं वजनें व दर कायम केले. पुढें मालाच्या खरेदी-विक्रीची व्यवस्था करून मुसलमान जहाजांचा व कालिकोटच्या राजाचा सूड घेण्याकडे गामा वळला.

कालिकोटच्या बंदरांत गामा ह्यास एकही गलबत आढळलें नाहीं. पण गामा दाखल होतांच, राजानें आपण शरण आलों आहों असें दाखविण्याकरितां एक ब्राह्मण वकील त्याजकडे पाठविला. त्याजबरोबर राजानें असें सांगून पाठविलें कीं, " तुम्हांस विशेष त्रास देणारे मुख्य मुख्य दहा आरब इसम तुमच्या ताब्यांत देतों, त्यांस आपण वाटेल ती शिक्षा करावी; शिवाय मालाच्या नुकसानीबद्दल वीसहजार रुपये भरून देतों. हें म्हणणें गामानें कबूल केलें. मात्र आरब लोक अगदींच थोडे पाठविले हें त्यास आवडलें नाहीं. दुसरे दिवशीं त्या दहा आरबांनीं आपल्या मुक्ततेबद्दल वीस हजार रुपये दंड देऊं केला. पण तें कांहींच न ऐकतां गामानें आपलें आरमार एकदम शहराच्या नजीक आणिलें, व शहरावर तोफांचा भडिमार चालविला, त्यामुळें शहरांत आकांत उडाला. इकडे दोन मोठीं जहाजें व बावीस लहान बोटी कारोमांडल किनाऱ्यावरून तांदूळ भरून बंदरात येत होत्या, त्या गामानें पकडिल्या; त्यांतील उपयोगी पडणारा सर्व माल व सामान त्यानें घेतलें; व त्यांवरील सर्व माणसांचे हात, कान व नाक हीं कापून टाकिलीं. कालिकोटच्या राजाकडून वकील म्हणून आलेल्या ब्राह्मणाची त्यानें तीच अवस्था केली. नंतर त्या सर्वांचे त्यानें पाय बांधविले; व दांतांनीं बंद तोडतां येऊं नयेत म्हणून सोंट्यांनीं त्यांचे दांत पाडून ते घशांत भरविले. अशी मंडळी सुमारें आठशें होती. त्या सर्वांचा एका जहाजावर ढीग करून त्यावर पातरा वगैरे पसरून, आग लाविली, व शिडें पसरून जहाज वाऱ्याबरोबर किनाऱ्याकडे पाठविलें. तसेंच ब्राह्मण वकिलाला दुसऱ्या एका गलबतावर घातलें, त्याच्या

ताव्यांत ते तोडलेले सर्व अवयव दिले, व राजास लिहून पाठविलें, कीं 'ह्यांची भाजी करून खा.' ह्या भयंकर कृत्यानें सर्व लोकांमध्यें पोर्तुगीझांबद्दल अत्यंत द्वेष उत्पन्न झाला व ते सूड घेण्याच्या विचारास लागले. आंबोयना बेटांत स. १६२३ त थोड्याशा इंग्रज लोकांची डच लोकांनीं कत्तल केली, किंवा सिराज-उद्दौल्यानें १४६ इंग्रजांस अंधारकोठडींत कोंडून मारिलें, ह्या कृत्यांचीं लांबलचक वर्णनें निरनिराळ्या ग्रंथांत किती तरी दिलीं आहेत. पण त्याबरोबरच वरील कृत्याची व त्यासारख्या दुसऱ्या शेंकडों क्रूर कृत्यांची हकीगत ऐतिहासिक पूर्ततेकरितां आपणांस माहीत पाहिजे.

पुढें ड गामा कोचीनकडे गेला असतां काननूरच्या राजाचा त्यास असा निरोप आला कीं, 'कांहीं आरब व्यापारी आठ जहाजें भरून चालले आहेत, त्यांनीं मालाची जकात किंवा किंमत दिलेली नाहीं. ह्याचा बंदोबस्त करावा.' तेव्हां गामानें सोद्रे नांवाच्या इसमास लगेच काननुरास पाठविलें. त्यास तीं गलबतें तेथेंच नांगरलेलीं दिसलीं. त्यांचा मालक खोजा महंमद म्हणून होता. त्यास पकडून सोद्रेनें त्याजकडून राजाचा सर्व हिशेब चुकवून दिला; तथापि त्याचे शेवटीं हाल करून त्यास ठार मारिलें. ह्या कामगिरीबद्दल काननूरच्या राजानें सोद्रे यास एक हजार सोन्याचे पर्दाव † ( Pardaos ) बक्षीस दिले; व त्यास कोंबडीकरितां म्हणून दररोज एक पर्दाव देण्याचें ठरविलें. बंदरांत पोर्तुगीझ जहाजें असलीं म्हणजे त्यांस दररोज एक पर्दाव देण्याची ही वहिवाट पुढें पुष्कळ दिवस चालू होती.

इकडे गामा कोचीन येथें गेला. तेथच्या राजानें त्याचा सन्मान करून मालानें जहाजें भरून दिलीं. पोर्तुगीझ लोक आल्यापासून त्या राजास ह्या व्यापारापासून मोठीच किफायत होऊं लागली; त्यामुळें पुढील

† पर्दाव (सं. प्रताप) हें गोव्यास पूर्वीं एक नाणें असून त्याची किंमत सुमों सवा रुपया होती.

परिणामाकडे त्यानें लक्ष दिलें नाहीं. क्विलोन म्हणजे कोलम नांवाचें आणखी एक व्यापाराचें बंदर कालिकोटच्या दक्षिणेस होतें. तेथच्या राणीनें ह्या व्यापाराची किफायत ऐकून, आपल्या बंदरांत माल भरण्यासाठीं दोन गलबतें पाठविण्याची गामास विनंती केली. त्याप्रमाणें कोचीनच्या राजाच्या संमतीनें त्यानें दोन गलबतें क्विलोन येथें पाठवून भरून आणिलीं. इतक्यांत त्यास कोचीनच्या राजाकडून बातमी आली, कीं कालिकोटाहून एक मोठें आरमार तयार होऊन लढण्यासाठीं आपणावर येत आहे. ह्या कामासाठीं कालिकोटच्या राजानें अतोनात श्रम व पैसा ख़र्च केला होता, व एकवार पोर्तुगीझ व कोचीनचा राजा ह्यांची कायमची खोड मोडावी असा त्याचा विचार होता. पण झामोरीनच्या बेतांची खडानखडा माहिती राजद्रोही माणसांच्या मार्फत गामास लागलेली असल्यामुळें, झामोरीनकडून निरोप घेऊन आलेल्या ब्राह्मणाचे हालहाल करून त्यानें त्याचे ओठ व कान कापिले, व कुत्र्याचे कान कापून त्याच्या कानांस शिवून दिले, आणि अशा रीतीनें त्यास परत झामोरीनकडे पाठविलें. पुढें मोठमोठीं दहा जहाजें सामानानें भरून गामा कोचीन सोडून परत जाण्यास निघाला. सोद्रे मात्र कांहीं गलबतें घेऊन मुसलमानांच्या टेहेळणीवर राहिला. रस्त्यांत खोजा कासम नामक व्यापाऱ्याचीं जहाजें त्यास भेटलीं. उभयतांची लढाई होऊन मुसलमान लोक हटले; व इलाज चालेना तेव्हां समुद्रांत उड्या टाकून पोहून किनाऱ्यावर गेले. एका जहाजांत सोद्रे यास भारी किंमतीचा माल सांपडला. तसेंच त्यांत कित्येक श्रीमान बायका व मुलें होतीं तीं व सोनेंरत्नांचा बनविलेला महंमदाचा एक पुतळा सोद्रेच्या ताब्यांत आला. त्यांतील कांहीं सुंदर मुली पोर्तुगालच्या राणीला नजर म्हणून घेऊन बाकीच्या सोद्रेनें खलाशांच्या स्वाधीन केल्या. तसेंच मुसलमानांचीं जीं जहाजें त्याच्या हातास

लागलीं, त्यांना आग लावून तीं वाऱ्याबरोबर किनाऱ्याकडे पाठविलीं. ही कामगिरी बजावून सोद्रे काननुरास जाऊन गामास भेटला. गामानें काननूरच्या वखारीवर बोर्बोझा ह्याची नेमणूक केली. तसेच तेथील राजाच्या संमतीनें कांहीं तोफा व दारूसामान गुप्त रीतीनें पुरून ठेवून सभोंवार तटबंदी करविली. शिवाय तांबड्या समुद्रांतून पश्चिम किनाऱ्यावर आरबांचीं जहाजें आल्यास त्यांवर टेहेळणीकरितां सोद्रे यांस ठेविलें, व वाटेल तें जहाज लुटावें व बुडवावें अशी त्यास ताकीद दिली. अशी व्यवस्था करून गामा ता. २८ डिसेंबर स. १५०२ रोजीं परत निघाला. तो ता. १ सेप्टेंबर स. १५०३ रोजीं लिस्बनास पोंचला. ह्या खेपेस त्यानें अपार संपत्ति बरोबर आणिली. त्याजला व त्याच्या खलाशांना राजानें मोठमोठे सन्मान व बक्षिसें दिलीं.

गामा निघून गेल्यावर कोचीनच्या राजाशीं लढण्याकरितां झामोरीननें एक मोठी फौज तयार केली. तेव्हां कोचीन येथें असलेले पोर्तुगीझ लोक झामोरीनच्या स्वाधीन करून त्याजबरोबर तह करावा, अशी कोचीनचा राजा त्रिमंपारा यास त्याच्या मंत्रिमंडळानें सल्ला दिली. पण त्यानें तें न ऐकतां जें होईल तें सोसण्याचा निश्चय केला. कोचीनच्या वखारीचा मुख्य कोरिया यानें सोद्रे यास आपल्या मदतीस बोलाविलें. पण सोद्रे आला नाहीं. त्यानें खंबायतेकडे जाऊन आरबांची पांच जहाजें पकडून लुटलीं. पुढें एका वाऱ्याच्या ठिकाणीं तो वरवा करून राहिला. तेथें राहिल्यास धोका आहे असें सर्व लोक सांगत असतां तें न ऐकतां तसाच आग्रहानें तो राहिला असतां, मोठें वादळ होऊन त्यांत त्याचा व त्याच्या गलबतांचा नाश झाला. इकडे कोचीनच्या राजानें झामोरीनशीं लढण्याची तयारी केली. त्याच्या फौजेचा मुख्य युवराज नारायण हा होता. झामोरीनची फौज फारच मोठी होती. सन १५०३त उभय फौजांची लढाई होऊन नारायण पडला व झामो-

रीन ह्यास जय मिळाला. पुढें झामोरीन ह्यानें कोचीन शहर काबीज केलें. तेव्हां त्रिमंपारा पळून जाऊन लपून राहिला.

हिंदुस्थानांत ह्याप्रमाणें युद्धप्रसंग चालू असतां पोर्तुगालच्या राजानें एक मोठें आरमार तयार करून हिंदुस्थानांत पाठविलें. त्यांत मोठालीं नऊ जहाजें असून त्यांचे तीन भाग होते. तिहींवर आल्फान्झो ड आल्बुकर्क, फान्सिस्को ड आल्बुकर्क, व साल्ढाना हे तीन मुख्य कामगार होते. त्यांपैकीं पहिला आल्बुकर्क, हा फार हुशार असून पोर्तुगीझ इतिहासांत त्याचें नांव चिरस्मरणीय झालें आहे. स. १५०३ च्या अखेरीस हीं जहाजें हिंदुस्थानास येऊन पोंचलीं; तेव्हां तेथें असलेल्या पोर्तुगीझ लोकांस धीर आला. झामोरीनची फौज कोचीन सोडून निघून गेली व त्रिमंपारा संकटांतून सुटला. अखेरपर्यंत पोर्तुगीझ लोकांशीं विश्वासानें वागल्याबद्दल त्याचा ह्या दोघां आल्बुकर्कनीं मोठा गौरव केला. त्यांनीं झामोरीनचा पराभव करून कोचीनच्या राजास त्याच्या गादीवर नेऊन स्थापिलें; व पाचीको नांवाचा एक हुशार खलाशी कांहीं जहाजांसह कोचीन येथें ठेवून, व किलोनच्या राणीशीं तह करून ते परत युरोपास गेले. मागें झामोरीननें कोचीनवर पुनः स्वारी केली, पण पाचीकोनें त्याचा चांगलाच पराभव केला. ह्या प्रसंगीं पाचिकोनें थोड्या लोकांनिशीं जे पराक्रम केले, त्यांमुळें पोर्तुगीझ लोकांचें युद्धकौशल्य व शौर्य इत्यादि गुणांबद्दल हिंदुस्थानांत त्यांची सर्वत्र ख्याति झाली, त्यांच्या नांवाचा सर्वत्र वचक बसला, राजे व धनाढ्य लोक त्यांच्याशीं सलगी करण्यास उत्सुक झाले, व पुढें सुमारें शंभर वर्षेंपावेतों पोर्तुगीझ लोकांची हिंदुस्थानांत चांगली सरशी झाली. स. १५०४त पाचीको युरोपास परत आला, पण शाब्दिक गौरवापलीकडे राजानें त्यास कांहीं देणगी वगैरे दिली नाहीं.

**७. फ्रान्सिस्को ड आल्मीडा.—( स. १५०५–०९ ).** पाचीको परत आल्यावर हिंदुस्थानसंबंधी पोर्तुगीझ राजाचे विचार बरेच बदलले. अलीकडच्या सफरींनीं हिंदुस्थानच्या अंतःस्थितीची त्यास बरीच माहिती झाली, व त्यांच्या विजयांनीं आपणास पुढें काय करितां येईल ह्याचा त्यांस अंदाज करितां आला. हिंदुस्थानचा व्यापार तर त्याच्या सहज आटोक्यांतला होता, पण प्रयत्न केला असतां तेथें आपलें राज्यही स्थापन करितां येईल अशी राजास आशा उत्पन्न झाली. निदान व्यापाराकरितां तरी मुसलमानांशीं निकराचें युद्ध केल्याशिवाय भागत नाहीं, त्यासाठीं एक मजबूद आरमार व फौज हिंदुस्थानांत ठेवून देणें प्राप्त आहे असें त्यास वाटलें; व एकदां अशी तयारी ठेवल्यावर जेवढें करतां येईल तेवढें करणें अवश्य होय. ह्या हेतूनें इमान्युएल राजानें जंगी तयारी केली. एकंदर आरमारावर व सर्व व्यापारावर देखरेख ठेवण्याकरितां फ्रान्सिस्को ड आल्मीडा ह्या वजनदार मनुष्याची नेमणूक करून त्यास इकडे पाठविलें. आल्मीडा हा स. १५०५ च्या सेप्टेंबरांत काननूर येथें येऊन दाखल झाला; व लगेच त्यानें 'कोचीन, काननूर व क्विलोन ह्या ठिकाणचा पोर्तुगीझ प्रतिनिधि ( व्हाइस् रॉय )' अशी भपकेदार पदवी धारण केली. हा अधिकार त्याजकडे तीन वर्षे चालणारा होता.

अशा सर्व समारंभानें आल्मीडाची नेमणूक झाल्यामुळें त्यानेंही आपल्या वर्तनक्रमांत बराच फेरफार केला. पोर्तुगीझ लोकांच्या वसाहती किल्ले, तट वगैरेंनीं मजबूत करून मुसलमानांचा उच्छेद करावयाचा, व आरबी समुद्रावर व एकंदर हिंदी महासागरावर दुसऱ्या कोणाचा शह राहूं द्यावयाचा नाहीं, हें मुख्य काम त्यानें हातीं घेतलें. पोर्तुगालहून येतांना रस्त्यांत मजबूत जागा असावी अशा हेतूनें त्यानें आफ्रिकेच्या पूर्वकिनाऱ्यावर किल्वा येथें किल्ला बांधिला व मोंबासा

थील अधिकाऱ्यास आपला मांडलिक बनविलें. तसेंच गलबतांच्या रस्त्याचे वाकबगार खलाशी पाहिजेत म्हणून त्यांसाठीं कायमची नेमणूक करून दिली. त्यामुळें पोर्तुगीझ जहाजांस परकीयांच्या मर्जीवर अवलंबून राहण्याची जरूर राहिली नाहीं. आल्मीडाबरोबर चौदा गलबतें व १५०० फौज आली होती. त्यानें होनावर व काननूर येथील राज्यें जिंकून कोचीन येथें आपलें मुख्य ठाणें कायम केलें. आल्मीडाचा मुलगाही पराक्रमी होता. त्यानें किलोन येथें माप्ला मुसलमानांचा पराभव केला, व सीलोन बेटास जाऊन तेथल्या अधिकाऱ्यास पोर्तुगीझ अंमलाखालीं आणिलें, आणि तेथें दालचिनी भरून विलायतेस पाठविण्याचा ठराव केला. सीलोन येथून आल्मीडाच्या मुलानें एक हत्ती युरोपास पाठविला, तोच तिकडे गेलेला पहिला हत्ती होय. त्यानें झामोरीनच्या जहाजांचा कालिकोट येथें पराभव केला. पोर्तुगीझ लोकांच्या तोफांपुढें हिंदुस्थानांतील व्यापारी जहाजांचा इलाज चालत नसे.

इकडे आरबांच्या हातांतला व्यापार कमी झाल्यामुळें सर्व मुसलमानी देशांत हाकाटी झाली. विशेषत: इजिप्टच्या सुलतानानें एक मोठें आरमार तयार केलें, व अमीर हुसेन नांवाच्या एका दर्यावर्दी पुरुषास त्याजवर मुख्य नेमिलें. हा अमीर हुसेन व त्याच्या हाताखालचे खलाशी समुद्रावरील युद्धकलेंत पोर्तुगीझ लोकांइतकेच प्रवीण होते. सन १५०८ त हें इजिप्टचें आरमार तांबड्यासमुद्रांतून गुजराथच्या किनाऱ्यावर आलें. तेथें अहंमदाबादचा सुलतान व दीवचा नबाब मलीक अयाझ ह्यांनीं त्यास पुष्कळ मदत दिली. हें मोठें आरमार चौल बंदरांत आलें, तेव्हां त्यावर आल्मीडाच्या मुलानें निकराचा हल्ला केला. कालिकोटच्या झामोरीनची व ह्या मुसलमान आरमाराची भेट न होऊं देण्यासाठीं आल्मीडा झटत होता. दोन दिवस सारखी धडपड चालली. आल्मीडाच्या जहाजांस गराडा पडला, तोफेच्या गोळ्यानें त्याचा

एक पाय जायबंदी झाला; तरी तो खुर्चीवर पडून हुकूम सोडीत होता. इतक्यांत आणखी एक गोळा येऊन त्यानें त्याचा प्राण घेतला. वीस वर्षांच्या मुलाचा हा प्रयत्न ध्यानांत ठेवण्यासारखा आहे. मलीक अयाझ ह्यास जय मिळाला तरी त्यानें उदार अंतःकरणानें हातीं लागलेल्या पोर्तुगीझ लोकांस चांगलें वागविलें; व असा शूर पुत्र पोटीं निपजल्याबद्दल गौरवादाखल आलमीडास त्यानें पत्र लिहिलें.

इतक्यांत आलमीडाची तीन वर्षांची कारकीर्द पुरी झाली, व आल्बुकर्कची त्या जागेवर नेमणूक होऊन तो लिस्बनहून हिंदुस्थानांत आला. तरी पुत्राच्या मरणाचा सूड उगविल्याशिवाय आलमीडा आपला हक्क सोडीना. आल्बुकर्कही त्याच्या आड आला नाहीं. आलमीडा वेगानें मुसलमानांवर चालून आला. सन १५०९ त दीवनजीक उभयपक्षांची भयंकर लढाई झाली. तींत तीन हजार मुसलमान व बावीस पोर्तुगीझ पडले. अहंमदाबादचा सुलतान महंमद बेगडा यानें मलीक अयाझचा पराभव झालेला पाहून त्याचा पक्ष सोडून पोर्तुगीझ लोकांशीं तह केला. पुढें आलमीडा लवकरच कोचीन येथें परत आला व सन १५०९ च्या नवंबर महिन्यांत कोचीन सोडून निघाला असतां रस्त्यांत आफ्रिकेच्या किनाऱ्यावर एक मारामारी होऊन तींत तो मारला गेला. फ्रान्सिस्को ड आलमीडा हा हिंदुस्थानचा पहिला पोर्तुगीझ व्हाइसरॉय होय. हिंदुस्थानांत पोर्तुगीझ लोकांचें राज्य स्थापन करणें शक्य नाहीं. फक्त आरमार ठेवून व्यापाराच्या वखारींचें संरक्षण करावें म्हणजे झालें, असें आलमीडाचें मत होतें. ह्या बाबतींत तो व त्याचा अनुगामी आल्बुकर्क ह्या दोघांमध्यें मोठा विरोध होता. आलमीडाच्या पश्चात् आल्बुकर्क हा दुसरा पोर्तुगीझ व्हाइस् रॉय झाला, व त्यानेंच पोर्तुगीझ लोकांचें कायमचें वास्तव्य हिंदुस्थानांत करून दिलें असल्यामुळें त्याचा लौकिक मोठा आहे. सबब त्याचें चरित्र जरा विस्तारानें दिलें पाहिजे.

**८. आल्फान्झो ड आल्बुकर्क,—पहिली कामगिरी १५०६–९**

आल्बुकर्कचा जन्म इ. स. १४५३ त झाला. तो उच्च कुलांतला होता. पांचव्या आल्फान्झो राजानें त्याला आपल्या मुलांबरोबर विद्या देऊन वाढविलें. त्याला गणितशास्त्राचा विशेष नाद असे. तत्कालीन पद्धतीप्रमाणें युद्ध व साहसें करून लौकिक मिळविण्याची त्यास हौस होती. स. १४७१त मोराक्को जिंकण्याकरितां गेलेल्या फौजेबरोबर तो होता, व तेथें दहा वर्षें त्यास राहवें लागल्यामुळें तेवढ्या अवधींत उत्तम प्रकारचा अनुभव त्यानें मिळविला. इ. स. १४८१त परत आल्यावर त्यास घोडेस्वार फौजेच्या सेनापतीची जागा मिळाली. दुसऱ्या जॉन राजाजवळ त्याचें चांगलें वजन होतें. स. १५९५त जॉन राजा मरण पावला, पुढें त्याचा मुलगा इमान्युएल ह्याची आल्बुकर्कवर विशेष मर्जी बसली नाहीं. पुनः त्याची मोराक्कोच्या कामगिरीवर नेमणूक झाली; व तेथें असतांना मुसलमानांविषयीं त्याच्या मनांत अत्यंत वैर उत्पन्न झालें. तेथून परत आल्यावर राजानें त्यास इ. स. १५०३ तील सफरीबरोबर हिंदुस्थानांत पाठविलें. ह्या वेळीं त्यानें विशेष महत्त्वाचें कृत्य कांहीं केलें नाहीं, मात्र पुढें उपयोगी पडणारा परस्थितीचा अनुभव मिळवून घेतला; व स. १५०४ त परत लिस्बन येथें आला. तांबडा समुद्र व इराणी आखात ह्यांतून चालणारा मुसलमानांचा संचार कायमचा बंद केला पाहिजे, अशी त्यानें आपल्या राजास सल्ला दिली व त्यासाठीं सोकोट्राचें बेट जिंकण्याकरितां स. १५०६त राजानें त्याची रवानगी इकडे केली. कान्स्टांटिनोपलच्या सुलतानानें पूर्वेकडील मुसलमानांस मदत करूं नये एतदर्थ इमान्युएल राजानें एक आरमार भूमध्यसमुद्रांतून तुर्कस्तानावर पाठविलें. टर्की आणि इजिप्त ह्यांचें वैमनस्य होतें. पण ही गोष्ट पोर्तुगीजांस ठाऊक नसल्यामुळें, ते एक होऊन आपली वाट लावतील अशी भीति त्यांस वाटत होती. सोकोट्रा जिंकल्यावर आल्बुकर्कनें

मलबारकिनाऱ्यावर जाऊन आलमीडाची मुदत संपतांच प्रतिनिधीच काम पाहवें असा राजाचा हुकूम होता.

मलबारकिनाऱ्याप्रमाणेंच आफ्रिकेच्या पूर्वकिनाऱ्यावर अनेक लहान लहान राजे होते. कोचीनप्रमाणें मलिंदचा राजा पोर्तुगीझांस मिळाला होता, म्हणून मोंबासा, अंगोजा वगैरे ठिकाणचे राजे मलिंदच्या राजास त्रास देत. ह्यासाठीं आल्बुकर्कनें प्रथम त्या सर्वांचा समाचार घेऊन त्यांस पोर्तुगीझ राजाला खंडणी देण्यास भाग पाडिलें. नंतर तो सोकोट्रावर आला. तेथें कांहीं ख्रिस्ती लोकांची वस्ती होती, व मुसलमानांचा एक मजबूद किल्ला होता, तो आल्बुकर्कनें तेव्हांच जिंकून घेतला, व त्यावर आपले अंमलदार नेमून सर्व नवीन व्यवस्था केली; आणि मुसलमानांच्या जमिनी व उत्पन्नें खालसा करून तीं तेथच्या ख्रिस्ती लोकांस दिलीं. सोकोट्राहून निघून आल्बुकर्क मस्कत येथें गेला. तेथच्या अधिकाऱ्यांस जिंकल्यावर इराणी आखातांतलें केवळ नाकें व व्यापाराचें उत्तम ठिकाण जें ओर्मझ तें जिंकण्यास तो आला. खोजा अत्तर नांवाचा ओर्मझच्या राजाचा दिवाण होता, त्याच्या मार्फत आल्बुकर्कनें ओर्मझ येथें किल्ला बांधण्याचा तह केला. पण हाताखालचे अंमलदार त्याजवर उठल्यामुळें ओर्मझचें काम अर्धवट टाकून त्यास मलबाराकडे यावें लागलें. येथपर्यंतच्या कृत्यांवरून आल्बुकर्कचें धोरण व्यक्त होण्यासारखें आहे. आफ्रिकेच्या दक्षिण टोंकापासून मलाकापर्यंतचा सर्व किनारा, बेटें, व नाक्याचीं बंदरें पोर्तुगीझांच्या ताब्यांत राहवीं, ठिकठिकाणीं किल्ले बांधून तेथें पोर्तुगीझ फौज ठेवावी, म्हणजे मुसलमानांचा व्यापार सर्वस्वी बंद पडून पोर्तुगीझांचा अव्याहत चालेल असें त्याचें मत होतें. पण पुष्कळ किल्ले वगैरे बांधून आपल्या सत्तेचा पसारा करून ठेवणें अनुचित होय, अशी आलमीडाची ताकीद होती. सबब कोचीन येथें आल्बुकर्क व आलमीडा ह्या दोघांची बरीच

झटापट होऊन आल्बुकर्क यास कांहीं दिवस कैदेंत कंठावे लागले. पुढें पोर्तुगालहून आणखी एक आरमार येऊन आलमीडा आपला कारभार सोडून स्वदेशास परत गेला. ( नोव्हेंबर स. १५०९ ). तेव्हांपासून आल्बुकर्क हिंदुस्थानांतील पोर्तुगीझ राज्याचा मुख्य झाला.

**९. गोव्याचा पाडाव,–परिस्थिति (स. १५१०–१२).**–आलमीडाशीं चाललेल्या तंट्यांत आल्बुकर्कचे जे दिवस गेले, त्यांचा त्यास चांगलाच उपयोग झाला. त्या योगानें त्यास परिस्थितीचें सूक्ष्म निरीक्षण करितां आलें. मलबारांत व दक्षिण हिंदुस्थानांत हिंदु राज्यें होतीं. तसेंच ब्राह्मणी राज्याच्या मुसलमानी शाखाही प्रबल होत्या. ह्या हिंदूंचें व मुसलमानांचें वांकडें असून, हिंदु राज्यें नाहींशीं करून एकजात मुसलमानी अंमल स्थापण्याचा त्या राजांचा विचार चाललेला होता. स. १५६५त तालिकोट येथें लढाई होऊन विजयनगरचें राज्य मोडलें, व मुसलमानांचा हेतु तडीस गेला. आफ्रिकेचा पूर्व-किनारा, मलबारकिनारा व आरबी समुद्र यांजवर आरब मुसलमानांचा संचार असून, त्यांजबरोबरच पोर्तुगीझांची स्पर्धा चालू होती. हे आरब व्यापारी किनाऱ्यावरील हिंदु रयतेस व राजांस अतिशय त्रास देत; त्यांस बाटवून मुसलमान करीत. ह्यास्तव परभारें एखादा शत्रु येऊन त्यांचें पारिपत्य करील तर ती गोष्ट कोचीन, किलोन वगैरे ठिकाणच्या हिंदु राजांस इष्टच होती. पोर्तुगीझ लोकांचा खरा कावा झामोरीनला मात्र कळला होता, व तोच त्यांच्याशीं एकसारखा लढत होता. पण इतर हिंदूंस पोर्तुगीझांपेक्षां आरबांचेंच शत्रुत्व ज्यास्त वाटत होतें. शिवाय व्यापाराच्या कामींही आरबांकडून हिंदूंस विशेष प्राप्ती होत नसे. पोर्तुगीझ व्यापारी एकदम घाऊक माल वाटेल ती किंमत देऊन थेट युरोपांत घेऊन जाऊं लागल्यामुळें, मलबारच्या व्यापारास तेजी आली व सर्व हिंदु राजे व लोक पोर्तुगीझांचे हितचिंतक बनले.

विजयनगरचा नरसिंगराय ह्या वेळीं प्रबळ होता; पण मुसलमानांच्या द्वेषास्तव त्यानें पोर्तुगीझांच्या विरुद्ध हालचाल केली नाहीं. शिवाय मुसलमानांचा अंमल स्पेनदेशांत असल्यामुळें व आफ्रिकेच्या उत्तर व पूर्वकिनाऱ्यावर आजपावेतों मुसलमानांशींच झगडे करण्याचा पोर्तुगीझांस प्रसंग आल्यामुळें, त्यांना मुसलमानांचा जसा द्वेष वाटे, तसा हिंदूंचा वाटत नसे. उलट हिंदूंबद्दल त्यांच्या मनांत सहानुभूतिच वागत होती. मलबारकिनाऱ्यावर क्रिस्त्यांची वस्ती फार पूर्वींपासून होती, व ते हिंदूंच्या अंमलाखालीं सुखी होते. ही स्थिति अवलोकन करून आल्बुकर्कनें, १ हिंदु राजांशीं कायमचें सख्य करावयाचें, २ मुसलमानांचा पाडाव करावयाचा, व ३ तेणेंकरून पोर्तुगीझांचा व्यापार व अंमल दृढ करावयाचा हे तीन मुख्य उद्देश धारण केले. ओर्मझहून उत्तम आरबी व इराणी घोडे मलबार किनाऱ्यावर येत, ते घोडे आपण आणून विजयनगरच्या राजास पुरवावे व विजयनगरच्या राजानें मुसलमानांशीं लढण्यास आपणांस मदत करावी, अशा प्रकारचा तह आल्बुकर्कनें विजयनगरास आपला वकील पाठवून सिद्धीस नेला. हिंदूंशीं सख्य व मुसलमानांचा पाडाव, हा त्याच्या वर्तनाचा मुख्य हेतु होता. ह्याच पद्धतीचा अवलंब पुढें इंग्रजांनीं केला हें ध्यानांत ठेवण्याजोगें आहे.

कालिकोटचा राजा हिंदु होता; व त्याजबरोबर सख्य असावें अशी आल्बुकर्कची इच्छा होती. पण त्याच्या हाताखालील अधिकाऱ्यांनीं स. १५१० त कालिकोटच्या राजवाड्यावर एकाएकीं हल्ला केला, त्यांत शंभर पोर्तुगीझ लोक व बारा मोठमोठे अधिकारी मारले गेले व राजास जय मिळाला. ह्या प्रसंगीं आल्बुकर्कलाही जखमा लागल्या होत्या, पण त्यांतून तो बरा झाला. पुढें सोकोत्रावर स्वारी करण्याकरितां तयारी करून तो निघाला, तो गोव्याजवळ अंजद्वीप येथें

आला. तेथें तिमय्या नामक एका कावेबाज हिंदु गृहस्थानें गोवें जिंकण्याची त्यास सल्ला दिली, तो प्रकार असा.

तिमय्याचें नांव वर वास्को ड गामाच्या हकीगतींत आलें आहे. हा एक दर्यावर्दी पुरुष असून मोठा खटपटी होता. वास्को ड गामानें त्याचीं गलबतें जाळलीं होतीं. तथापि ती गोष्ट विसरून त्यानें आल्मीडाचा स्नेह संपादिला, व पोर्तुगीझ लोकांस मदत करून स्वतःचें वैभव वाढविलें. तिमय्याच्या शिकवणीनें आल्बुकर्क यानें असा विचार केला, कीं गोवें हें पश्चिम किनाऱ्यावर व्यापाराचें मोठें ठिकाण असून दोन खाड्यांच्यामध्यें असल्यामुळें गलबतें राहण्यास सोयीचें बंदर आहे. ह्या ठिकाणीं सर्व देशचीं गलबतें नेहमीं येत असतात. अशा प्रकारची उत्तम जागा आपल्या ताब्यांत असल्याशिवाय राज्य राखतां येणार नाहीं. कोचीन, कालिकोट व किलोन येथें पोर्तुगीझांच्या तटबंदी वखारी होत्या खऱ्या, तरी पण त्या ठिकाणीं निरनिराळीं स्वतंत्र राज्यें असल्यामुळें, पोर्तुगीझांस तेथील राजांच्या मर्जीवर अवलंबून राहणें भाग पडे. आफ्रिकेकडून येण्यास गोवें हें जवळ व मध्यावर असून कोचीनप्रमाणें एका बाजूस नव्हतें. शिवाय तें विजापूरच्या मुसलमान सुलतानाच्या ताब्यांत असल्यानें, तें काबीज करण्यास हिंदूंशीं वैर संपादावें लागत नव्हतें. हिंदूंशीं सख्य ठेवून मुसलमानांचा उच्छेद करावयाचा, हा आल्बुकर्कच्या व्यवस्थेचा मुख्य हेतु होता. तेव्हां तिमय्याचें म्हणणें त्यास पटून सोकोट्राचा नाद सोडून प्रथम गोवें काबीज करण्याचा त्यानें निश्चय केला.

प्राचीन काळापासून गोव्यावर अनेक हिंदु राजांचा अंमल होता. चौदाव्या शतकाच्या आरंभीं तें होनावरच्या मुसलमान नबाबानें जिंकिलें; पुढें तें विजयनगरच्या राजानें जिंकून आपल्या ताब्यांत घेतलें (स. १३६७). सन १४४०त तेथचे लोक स्वतंत्र झाले व

नवें गोवें म्हणून जवळच दुसरें शहर त्यांनीं स्थापिलें. येथें ओर्मझहून येणाऱ्या घोड्यांचा मोठा व्यापार चालत असे. स. १४७०त ब्राह्मणी राजा दुसरा महंमद यानें तें जिंकिलें. पुढें अनेक वेळां हिंदु राजांनीं तें परत काबीज करण्याचा प्रयत्न केला; पण तो सिद्धीस गेला नाहीं. स. १४८९त युसुफ आदिलशहा विजापुरास स्वतंत्र झाला, त्याच्या ताब्यांत तें गेलें. ह्या आदिलशहाच्या कारकिर्दीत गोव्याची मोठी भरभराट होती. तेथें मोठमोठे वाडे त्यानें बांधिले. तेथेंच राजधानी करावी असेंही त्याच्या मनांत होतें. पण ह्या आदिलशहाच्या कारकिर्दीत हिंदूंवर मोठा जुलूम होत असे. आल्बुकर्क गोव्यास आला, तेव्हां मलीक यूसुफ गुर्गी नांवाचा मुसलमान अधिकारी गोव्यास होता, त्यानें सर्व हिंदूंवर मोठा कहर केला. त्याचमुळें तिमय्यानें आल्बुकर्ककडे जाऊन मुसलमानांच्या जाचांतून हिंदूंस सोडविण्याची शक्कल काढिली. त्या वेळेस आदिलशहा दूरदेशीं गुंतला होता; व सर्व हिंदु प्रजा मुसलमानांस त्रासून पोर्तुगीझांस सामील होण्यास तयार होती. बंदराच्या नाक्याशीं पणजीचा किल्ला आहे. तो आल्बुकर्कनें ता. १ मार्च स. १५१० रोजीं काबीज केला. नंतर दोन दिवसांनीं शहरही त्याच्या हस्तगत झालें. मुसलमान अधिकारी पळून गेले. लोकांस जाचांतून आपली सुटका झालीशी वाटून परमानंद झाला व त्यांनीं आल्बुकर्कवर सुवर्णपुष्पवृष्टि केली. लगेच त्यानें शहराचा बंदोबस्त चालविला.

ह्या घडामोडीची बातमी तेव्हांच सर्वत्र पसरली. मुसलमान व हिंदु राजांनीं आल्बुकर्ककडे आपले वकील पाठविले. विजयनगरच्या राजानें गोवें आपणांस परत मिळावें असें मागणें केलें. इराणचा शहा व ओर्मझचा राजा ह्यांनीं पोर्तुगीझांविरुद्ध अंतस्थ कारस्थानें चालविलीं. पण आल्बुकर्कनें धूर्ततेनें वागून सर्वांशीं सौम्योपचार योजिले. गोवा

शहर पोर्तुगीझांनीं घेतलें ही बातमी ऐकून यूसुफ आदिलशहा ६० हजार लोक घेऊन गोव्यावर आला. 'तुम्हांस दुसरें पाहिजे तें बंदर देतों, निदान तिमय्यास आमच्या हवालीं कराल तर गोवें सुद्धां देतों,' असें आदिलशहानें आल्बुकर्ककडे बोलणें लाविलें. पण तें त्यानें मान्य केलें नाहीं. तेव्हां आदिलशहानें एकदम शहरांत प्रवेश केला. त्या वेळीं आपणास लढण्याचें सामर्थ्य नाहीं असें पाहून आल्बुकर्क आपले सर्व लोक घेऊन जहाजांवर पळून गेला; मात्र जातांना त्यानें दारूखाना उडवून दिला व हातीं सांपडलेल्या दीडशें मुसलमानांची कत्तल केली. पण खाडींतून बाहेर निघून जाण्याजोगी हवा नसल्यामुळें गोव्याच्या बंदरांतच त्यास तीन महिने मुक्काम करावा लागला. येथें रोज उभय पक्षांची चकमक चालू होती. ह्या प्रसंगीं हाताखालचे लोकही आल्बुकर्कवर उठले होते; पण तो मोठ्या धैर्यानें वागला. पुढें त्यास युरोपांतून मदत आली व होनावरास जाऊन तो तिमय्यास भेटला. इकडे आदिलशहा गोवें सोडून गेला असल्यामुळें तेथचा बंदोबस्त कच्चा होता, तेव्हां पुनः गोव्यावर हल्ला करण्याविषयीं तिमय्यानें आल्बुकर्क यास भर दिली. स्वतः तिमय्या गरसप्पाच्या राजासह आल्बुकर्कच्या मदतीस आला. नोव्हेंबर महिन्यांत त्यांनीं पुनः गोव्यावर स्वारी केली. निकराचें युद्ध होऊन दोन हजार मुसलमान पडले; व गोवा शहर आल्बुकर्कच्या हस्तगत झालें. त्या वेळीं तेथचे जे मुसलमान रहिवाशी त्याच्या हातीं आले, त्या सर्वांची निरपराधी बायकामुलांसुद्धां त्यानें कत्तल उडवून दिली. तसेंच तीन दिवसपर्यंत शहरांत लूट करण्याची त्यानें आपल्या अनुयायांस परवानगी दिली. ह्या क्रूर कृत्यांचें समर्थन करणें अशक्य आहे. आल्बुकर्कनें लगेच गोव्याची सर्व तटबंदी मजबूद केली. ह्याच संधीस यूसुफ आदिलशहा मरण पावला; व त्याचा मुलगा

इस्मईल अल्पवयी असल्यामुळें, विजापूर दरबाराकडून गोव्यासंबंधीं कांहीं एक प्रयत्न झाला नाहीं.

गोवा पोर्तुगीझ लोकांच्या हस्तगत झाल्यानें अनेक कायमचे परिणाम घडून आले. पोर्तुगीझ लोकांची सत्ता पश्चिम किनाऱ्यावर कायमची स्थापन झाली. विजापूर, अहंमदाबाद, विजयनगर वगैरे ठिकाणच्या राज्यकर्त्यांस पोर्तुगीझ लोकांचा वचक बसला; व आपल्या लोकांस एक शत्रु ज्यास्त झाला. पुढें शंभर वर्षेपर्यंत पूर्वेकडून युरोपांत जाणाऱ्या सर्व मालाचा व्यापार एकट्या पोर्तुगीझांच्या ताब्यांत राहिल्यानें, गोवा शहर अत्यंत संपन्न व नामांकित झालें. त्या शंभर वर्षांत पृथ्वीवरील सर्व शहरांत गोव्याची गणना पहिल्या प्रतीची होती. आल्बुकर्कचें व त्याच्या कारभाराचें इतिहासांत नांव होण्यास गोवा शहर कारण झालें आहे. मात्र ज्या हिंदूंनीं पोर्तुगीझ राज्य स्थापण्यास मदत केली, त्यांचे हाल आज कुत्रा खात नाहीं !

१०. **मलाकाचा पाडाव** ( स. १५११ ).—गोव्याची व्यवस्था केल्यावर होनावरच्या राजाचा भाऊ मल्हारराव ह्यास आल्बुकर्कनें गोवा बेटाचा कारभार दरसाल तीन लक्ष वसूल घेण्याच्या करारानें दिला; व मलाका द्वीपकल्प जिंकण्याच्या इराद्यानें त्यानें आपलीं लढाऊ गलबतें तिकडे हाकारिलीं. गोव्याच्या खालोखाल आल्बुकर्कच्या कारकिर्दींत ही दुसरी गोष्ट होय. मलाका हें मसाल्यांच्या व्यापाराचें मुख्य नाकें होतें. मसाल्यांचीं बेटें व चीनजपानाकडील सर्व व्यापार ह्या द्वीपकल्पाच्या आटोक्यांत होता. खुद्द मलाका शहर एका मुसलमान सुलतानाच्या ताब्यांत होतें. तेथचें बंदर अप्रतिम असून, मसाल्यांच्या व्यापारानें सधन झालें होतें. तेथें बहुतेक सर्व प्राच्य राष्ट्रांतील व्यापारी लोक राहत असत. व्यापारी तंट्यांचा निकाल लावण्याकरितां चार राष्ट्रांच्या चार प्रतिनिधींची एक

सभा नेमलेली असे. हा मलाकाचा द्वीपकल्प 'गोल्डन कर्सोनीस' ह्या नांवानें युरोपियनांस माहीत होता. स. १५०९ त सेकीरा नांवाचा पोर्तुगीझ खलाशी पांच जहाजें घेऊन मलाका येथें आला. हाच तेथें गेलेला पहिला युरोपियन होय. सेकीरानें माल वगैरे भरण्याचा प्रयत्न करितांच आरबांनीं आपली विरुद्ध खटपट सुरू केली. तेव्हां सेकीरा यास तेथून पळ काढावा लागला. मात्र वीस पोर्तुगीझ लोक मागें मलाका येथील अधिकाऱ्यांच्या हातांत सांपडले. त्यांजवर मुसलमान होण्याकरितां जुलूम सुरू झाला. तेव्हां निनाचतू ( Ninachatu ) नांवाच्या एका हिंदु व्यापाऱ्यानें त्यास अंतस्थ रीतीनें मदत करून त्यांचें पत्र आल्बुकर्ककडे पावतें केलें. तेव्हां आल्बुकर्क आपलें आरमार घेऊन मलाका येथें आला. कांहीं दिवस बोलाचाली होऊन कैदी झालेले लोक आल्बुकर्क यास परत मिळाले. तथापि त्यानें शहरावर दोन हल्ले करून तें काबीज केलें. सुलतान पळून गेला. शहरांत असलेल्या हिंदु जावानीझ, चिनी व ब्रह्मी व्यापाऱ्यांस आपला आश्रय देऊन त्यांचे प्रतिनिधि नेमून दिले; निनाचतू याजवर विशेष मेहेरबानी करून त्यास हिंदूंचा पुढारी केलें. जावानीझ लोकांचा एक मुख्य पुढारी विरुद्ध वागत आहे अशी बातमी लागल्यावरून आल्बुकर्कनें त्यास व त्याच्या नातेवाइकांस ठार केलें. अशा प्रकारच्या क्रूर कृत्यांनीं त्याचा वचक चहूंकडे बसला. मलाका पोर्तुगीझांच्या ताब्यांत आल्यानें आरब मुसलमानांच्या हातांतील सर्व व्यापार नाहींसा झाला. यूरोपच्या पश्चिम किनाऱ्यापासून तों चीनजपानपावेतों कोठेंच त्यांचा रिघाव राहिला नाहीं. पुढें सुमात्रा, पेगू, सयाम, कोचीनचायना वगैरे ठिकाणच्या अधिकाऱ्यांशीं आल्बुकर्कनें स्नेह संपादिला; व मलाका येथें मजबूद किल्ला बांधून व बंदोबस्त करून तो स. १५११त परत आला. तों गोव्यास वेढा पडून तें हातांतून

जाण्याच्या बेतांत आहे असें त्यास कळलें. आल्बुकर्क दूर गेला असें विजापुरीं कळतांच, तेथच्या वजिरानें पोलादखान नामक सेनापतीस गोवें काबीज करण्यास पाठविलें. त्यानें तिमय्या आणि मल्हारराव ह्यांचा पराभव करून गोव्याचें बेट घेतलें. तिमय्या व मल्हारराव हे पळून विजयनगरास गेले. तेथें तिमय्याचा खून झाला, व मल्हाररावास होनावरची गादी मिळाली. पुढें गोव्याच्या किल्यांतील पोर्तुगीझ अंमलदारानें पोलादखानावर हल्ला केला; पण त्यांत त्याचाच पराभव होऊन तो मारला गेला. इकडे पोलादखानाच्या हातून गोवें काबीज होत नाहीं असें पाहून, दरबारानें रसूलखान नामक दुसरा एक शूर सरदार गोव्यावर पाठविला. तेव्हां पोलादखान व रसूलखान ह्या दोघांचें भांडण जुंपून, रसूलखानानें पोर्तुगीझांचीच मदत घेऊन पोलादखानास हटवून परत लाविलें. पोलादखान निघून गेल्यावर रसूलखान पोर्तुगीझ लोकांवर उठला. त्यानें किल्यास वेढा घातला असतां आल्बुकर्क परत आला. त्याच संधीस पोर्तुगालहूनही त्यास चांगली मदत आली. तेव्हां सर्व जमवाजमव करून त्यानें रसूलखानाशीं लढून गोवाबेट काबीज केलें. रसूलखान सर्व जागा सोडून देऊन परत विजापुरास गेला. गोव्यांतील जे लोक रसूलखानास जाऊन मिळाले होते, त्यांची आल्बुकर्कनें फारच भयंकर दशा केली. हें वर्तमान स. १५१२त घडलें.

ह्याप्रमाणें गोव्याच्या पायीं अनेक संकटें पोर्तुगीझांवर येत असल्यामुळे, तें सोडून द्यावें व केवळ व्यापारापुरतीच आपण तजवीज ठेवावी, असें पोर्तुगालच्या राजाकडून आल्बुकर्क यास लिहून आलें. त्याजवर त्यानें जें उत्तर लिहून पाठविलें, त्यांत ह्या धूर्त मुत्सद्याचीं सर्व धोरणें स्पष्ट रीतीनें प्रतिपादिलेलीं आहेत. त्याचें म्हणणें असें कीं, 'एक गोवा येथें पोर्तुगीझांनीं विजय संपादन केल्यामुळें

९

पोर्तुगालच्या राजाचा अंमल इकडे जितका दृढ झाला आहे, तितका कितीही आरमारें आणिलीं असतीं तरी झाला नसता. समुद्रावर पोर्तुगीझ लोकांचें वर्चस्व असणें अत्यंत अवश्य आहे. जर का एक पराभव समुद्रावर झाला, तर हिंदुस्थानांत आपणास क्षणभरही कोणी राहूं देणार नाहीं. आज गोवा आहे म्हणून वाटेल ती सत्ता आपल्या हातांत आहे. इतक्या दिवस आम्हीं गोव्याचें संरक्षण करून टिकाव धरिला, ह्यांतच आमचें पाणी लोकांस दिसून आलें आहे. गुजराथ, कालिकोट वगैरे ठिकाणचे राजे आमची दोस्ती संपादण्यास उत्सुक झाले आहेत. समुद्रकांठीं मजबूत किल्ल्यांचीं ठाणीं आपल्या ताब्यांत असल्याशिवाय नुसत्या आरमारानें आपलें संरक्षण होणारें नाहीं. गोव्याप्रमाणेंच दीव व कालिकोट येथें आपण किल्ले बांधून आपली मजबुती केली पाहिजे. इतका सगळा प्रकार समजूनही, जर आपणास गोवा सोडून देण्याची बुद्धि परमेश्वर देईल, तर पोर्तुगीझ लोकांचें राज्य इकडे होऊं नये असेंच त्याच्या मनांत आहे असें मी समजेन. माझ्या जिवांत जीव आहे तोंपर्यंत स्वराष्ट्राकरितां झगडण्यास मी तयार आहें, मात्र नसते कुतर्क काढून माझा उत्साहभंग आपण करूं नये.' अशाच प्रकारचा वाद पुढें तीनशें वर्षांनीं ईस्ट इंडिया कंपनी आणि क्लाइव्ह, वेल्स्ली ह्यांसारखे कामगार यांजमध्यें चालला होता हें ध्यानांत ठेवण्याजोगें आहे.

**१०. आल्बुकर्कचा मृत्यु व त्याचीं धोरणें (स. १५१५).**— एडन आपल्या ताब्यांत घेऊन तांबड्या समुद्रांतील मुसलमानांच्या व्यापाराचे रस्ते कायमचे बंद करून टाकावे हें आणखी एक मोठें काम आल्बुकर्क यास करावयाचें होतें, पण तें त्याच्या हातून तडीस गेलें नाहीं. गोवा, गोव्याचें बेट व पणजी ह्या सर्वांस मिळून एक मोठा मजबूत तट त्यानें बांधिला. तसेंच कालिकोटचा झामोरीन मरण

पावला व त्याच्या मुलानें कालिकोट येथें पोर्तुगीझांस किल्ला बांधूं दिला. हा किल्ला विशेष मजबूत झाला. स. १५१४ हें साल आल्बुकर्कनें अंतर्व्यवस्था करण्यांत घालविलें. स. १५१५त ओर्मझवर स्वारी करून तें त्यानें काबीज केलें. हेंच त्याच्या कारकिर्दीचें शेवटचें कृत्य होय. ओर्मझहून परत येत असतां त्याची प्रकृति बिघडली व तो सन १५१५ च्या डिसेंबरांत गोव्याच्या बंदरांत येत असतां जहाजावर मरण पावला. त्याचें प्रेत गोवा येथें पुरण्यांत आलें; व पुढें स. १५६६त त्याचे अवशेष लिस्बन येथें नेऊन पुरण्यांत आले. मरणसमयीं त्याचें वय ६३ वर्षांचें होतें. त्यानें ६ वर्षें हिंदुस्थानांत कारभार केला. शौर्य, मुत्सद्दी चातुर्य, व एकनिष्ट स्वराष्ट्रसेवा इत्यादि गुणांनीं आल्बुकर्कचें नांव पोर्तुगीझ इतिहासांत विशेष स्मरणीय झालें आहे. पोर्तुगीझांचा सर्वांत मोठा अंमलदार हाच होय.

हिंदुस्थानांतील पोर्तुगीझ इतिहासाचीं तीन मुख्य अंगें आहेत: व्यापारवृद्धि, राज्यविस्तार, व धर्मप्रसार. ह्या तीन अंगांचा उद्भव निरनिराळ्या वेळीं निरनिराळ्या प्रकारें झाला. व्यापाराची कल्पना व्हास्को ड गामाची व तत्पूर्वीच्या खलाशांची. राज्यविस्ताराची कल्पना आल्बुकर्कची. धर्मप्रसाराची कल्पना पुढें निघाली व तिच्याचमुळें विशेषतः पोर्तुगीझांचा इकडे ऱ्हास झाला. डच, इंग्रज वगैरे राष्ट्रांच्या पुढील कल्पनांत पहिलीं दोन अंगें होतीं. धर्माचें महत्त्व त्यांस वाटलें नाहीं. आल्मीडाच्या वेळेपर्यंत केवळ व्यापार व वखारी वाढविण्याची खटपट चालली. पण किनाऱ्यावर नाक्याचीं ठाणीं ताब्यांत घेऊन तेथें किल्ले वगैरे बांधून हिंदुस्थानांत पोर्तुगीझ राज्य कायम केल्याशिवाय व्यापार सुरळीत चालणार नाहीं, ही कल्पना मनांत आणून त्या राज्याचा पाया घालण्याचें काम आल्बुकर्कनें केलें. तें राज्य अनेक राज्यक्रान्तींतून अद्यापि टिकलें आहे. पण क्रिस्ती धर्माचा इकडे फैलाव

करावयाचा ही एक कल्पना मात्र केवळ पोर्तुगीझांची. सोळाव्या शतकांतील इंग्रज व डच राष्ट्रांनीं आपल्या पुढील उद्योगांत धर्माचा समावेश केला नाहीं. पोर्तुगीझांचाही तो हेतु आरंभीं नव्हता; व कालिकोट वगैरे ठिकाणीं त्यांच्या व्यापारास प्रतिबंध झाला नसता, तर राज्यस्थापनेचीही जरूर कदाचित् पडली नसती. पण आल्बुकर्कची अशी खात्री झाली, कीं व्यापारासाठीं जीं ठिकाणें योग्य आहेत, तीं पूर्णपणें आपल्या ताब्यांत असल्याशिवाय व्यापार चालावयाचा नाहीं. आपला व्यापार वाढावा म्हणून पोर्तुगीझ लोकांनीं मुसलमानांचा एकतंत्री व्यापार बुडविला. ह्यांत पोर्तुगीझ लोकांनीं केलेलें काम ज्यास्त अवघड होतें. कारण तत्कालीन तुटपुंज्या साहित्यानें हिंदुस्थानास येण्याचा मार्ग शोधून काढून, पुढें आफ्रिकेपासून सुमात्रापर्यंतच्या प्रदेशांत मुसलमानांचा उच्छेद करणें हें काम लहान नव्हतें. पोर्तुगालच्या राजानें प्रत्यक्ष आपण होऊन तें हातीं घेतलें, म्हणून तें तडीस गेलें. डच व इंग्रजांनीं पुढें हातीं घेतलेले उद्योग केवळ व्यक्तिविषयक खासगी कंपन्यांचे होते. त्यांत राजाचें किंवा सर्व राष्ट्राचें अंग नव्हतें. पण पोर्तुगीझ राजा इमॅन्युएल ह्याच्या लक्षांत खरी स्थिति नीट उतरली. मुसलमानांचा व्यापार बंद करण्यासाठीं एडन, सोकोट्रा, ओर्मझ, गोवा, सीलोन, मलाका इत्यादि ठिकाणें आपल्या ताब्यांत ठेवण्याचा त्यानें आग्रह धरिला. त्याच्या सुदैवानें त्या वेळचे पराक्रमी मुसलमान राजे, रूमशामचा सुलतान पहिला सलीम, इजिप्टचा सुलतान, व इराणचा शहा इस्मईल हे सर्व आपसांत लढत होते. ते एकमतानें वागते, तर पोर्तुगीझांची सरशी झाली नसती. मुसलमान तरी पोर्तुगीझांशीं एका धोरणानें कधींच वागले नाहींत. म्हणूनच आल्बुकर्कनें त्यांस अनेक प्रसंगीं क्रूरपणानें वागविलें असें त्याचे चरित्रकार म्हणतात. मुसलमानांचा व्यापार बुडविण्यास पोर्तुगीझांनीं त्यांजशीं क्रमाक्रमानें अनेक युध्द्या लढविल्या.

पोर्तुगीझ अंमलदारांचा लेखी परवाना घेतल्याशिवाय जीं गलबतें तांबड्या समुद्राकडे व्यापाराकरितां जातां येतानां आढळतील, तीं एकदम पकडून लुटावीं किंवा जाळावीं असा क्रम थोडीं वर्षें चालल्यावर, त्याच्या पुढची पायरी मुळीं परवानेच द्यावयाचे नाहींत ही होय. परवान्याशिवाय गलबतांनीं फिरूं नये, व परवाने तर द्यावयाचे नाहींत, असा प्रकार कांहीं दिवस चालला. तिसरी युक्ति नाक्याच्या ठिकाणीं किल्ले बांधण्याची. अशा क्रमानें त्यांनीं मुसलमानांचा व्यापार बुडविला. येथपावेतों राजा इमॅन्युएल, आल्मीडा व आल्बुकर्क ह्यांचें एकमत होतें. पण ह्याच्या पुढें हिंदुस्थानांत पोर्तुगीझांचा कायमचा अंमल असला पाहिजे असा आग्रह धरणारा आल्बुकर्कच होय. हा अंमल कायम करण्यास त्यानें चार भिन्न उपायांची योजना सांगितली: १ नाक्याचीं ठिकाणें जिंकून घेणें; २ एतद्देशीय स्त्रियांशीं पोर्तुगीझ पुरुषांचीं लग्नें लावून कांहीं ठरीव प्रदेशांत आपल्या लोकांची वसाहत करणें; ३ किल्ले बांधणें; व ४ कित्येक राजांशीं तह जोडून त्यांस पोर्तुगॉलचे मांडलिक बनविणें. ह्यांपैकीं दुसरा उपाय शिवायकरून बाकीच्यांचें विवेचन वर आलेंच आहे. दुसरा उपाय थोडासा विचित्र असून त्याचे परिणामही तसेच झालेले आज दृष्टीस पडतात. पोर्तुगीझ व इंडियन ह्या दोन भिन्न राष्ट्रांमध्यें लग्न लावण्याचा प्रघात पाडून हाफ्कास्ट नांवाची जी क्रिस्ती प्रजा आज जिकडे तिकडे दिसते, तिची सुरुवात ह्या आल्बुकर्कनें केली आहे. ही गोष्ट दुसऱ्या कोणत्याही युरोपियन राष्ट्रानें इकडे केली नाहीं. गोवा जिंकल्यावर आल्बुकर्कनें मुसलमानांची कत्तल केली, तेव्हां त्यांच्या अनाथ विधवांचीं पोर्तुगीझ पुरुषांबरोबर त्यानें लग्नें लाविलीं. अशा लग्नांस तो स्वतः हजर राहून देणग्यांनीं वगैरे उत्तेजन देत असे. आपल्या कारकिर्दीत सुमारें साडेचारशें लग्नें त्यानें लाविलीं. ह्याप्रमाणें हिंदुस्थानांत राहणारी क्रिस्ती प्रजा उत्पन्न करून आपल्या

धर्माचा प्रसार करावा हा एक विशेष प्रकार आल्बुकर्कनें अमलांत आणिला. पण पुढील अनेक अधिकाऱ्यांस ही गोष्ट पसंत पडली नाहीं. आल्बुकर्कनें अशा विवाहितांस ज्यास्त सवलती व उत्पन्नें करून दिलीं, तरी क्रिस्ती धर्माचा प्रसार इकडे म्हणण्यासारखा झाला नाहीं, यावरून हिंदुधर्माची दृढता चांगली व्यक्त होते. एतद्देशीयांची चलाखी व तीव्र बुद्धि आल्बुकर्कनें तेव्हांच ताडिली; व नवीन व्यवस्थेंत त्यांचाच भरणा त्यानें विशेष केला. त्यांजकरितां शाळा घातल्या. एतद्देशीय लोकांची त्यानें एक फौजही तयार केली. हिंदुस्थानांतील राज्यकारभाराचा खर्च येथच्या उत्पन्नांतून भागवावा अशी त्याची व्यवस्था असून, येथें प्रचलित असलेली ग्राम-व्यवस्था त्यानें कायम ठेविली. गोवा व मलाका येथें टांकसाळी घालून त्यानें पोर्तुगीझ राजाच्या नांवानें नवीं नाणीं सुरू केलीं. क्रिस्तीधर्मप्रसा-राकरितां त्यानें बरीच खटपट केली, तरी केवळ जुलमानें आपला धर्म लोकांवर लादण्याचें क्रूर काम पुढें पोर्तुगीझ अंमलांत चाललें, तें मात्र ह्यानें सुरू केलें नाहीं. एतद्देशीय राजांचीं आपसांतील वैमनस्यें, पोर्तुगीझ लोकांचीं उत्कृष्ट जहाजें व तोफा, त्यांचें अप्रतिम शौर्य, व आल्बुकर्कच्या अंगचें शहाणपण ह्या कारणांनींच पोर्तुगीझांचा अंमल हिंदुस्थानांत चालू झाला.

आल्बुकर्क मरण पावला तेव्हां ओर्मझपासून सीलोनपावेतों सर्वत्र शांतता होती. खंबायत, चौल, दाभोळ, गोवा, होनावर, भट-कळ, काननूर, कोचीन वगैरे ठिकाणें व ह्या हद्दींतले राजे व जमीन-दार हे सर्व पोर्तुगीझांचे अंकित होऊन, आरबी समुद्रावर पोर्तुगीझ जहाजांचा संचार अबाधित चालू झाला. सीलोनपासून मलाकापर्यंतच्या किनाऱ्यावरील मोठमोठ्या राजांनीं पोर्तुगीझांशीं स्नेह जोडणारे तह केले.

चीन, जावा, पेगू येथचे राजेही त्यांचे स्नेही झाले. सारांश, पोर्तुगीझ लोकांच्या एकंदर रियासतींत आल्बुकर्क हाच त्यांचा मोठा मुत्सद्दी पुरुष होऊन गेला.

---

# प्रकरण पांचवें.

## पोर्तुगीझ राज्याची अमदानी.

### (स. १५१०–१६१२).

१. आल्बुकर्कनंतरचे अधिकारी, (स. १५१५–२८). २. न्यूनो डाकुन्हा, (स. १५२९–३८). ३. जॉन कॅस्ट्रो व दीवचा पाडाव, (स. १५४६). ४. स. १५४८–८० पर्यंत आलेले कामगार. ५. स. १५८०–१६१२ पावेतों. ६. उतरती कळा, स. १६१२–४०.

**१. आल्बुकर्कनंतरचे अधिकारी (स. १५१५–१५२८).—** आल्बुकर्क जिवंत असतांच आल्बर्गारियाची नेमणूक होऊन तो इकडे आला. तो मोठ्या कुलांतला होता; पण स्वभावानें आल्बुकर्कच्या अगदीं विरुद्ध असल्यामुळें, तो लवकरच सर्व लोकांस अप्रिय झाला. आल्बुकर्कची पद्धति मोडून नवीनच व्यवस्था करण्याची त्याची इच्छा होती; पण त्यास तसें करितां येईना. आल्बुकर्कचीच राज्यव्यवस्था राजा इमॅन्युअल ह्यास शेवटीं पसंत पडली. तांबड्या समुद्रांतील मुसलमानांचा संचार बंद करणें एवढेंच मुख्य काम आल्बर्गारियास राजानें सांगितलें. तदनुसार स. १५१७त सुमारें चाळीस गलबतें व १००० लढाऊ

लोक बरोबर घेऊन तो एडनास गेला. पूर्वी एवढें मोठें पोर्तुगीझ आरमार कधींच बाहेर पडलें नव्हतें. पण हलगर्जीपणामुळें व हाताखालील मंडळींच्या नाखुषीस्तव ह्या स्वारीचा कांहीं उपयोग न होतां, वादळांनीं वगैरे बहुत नुकसान होऊन ती परत आली. पुढें तो सिलोनास गेला; आणि तेथच्या राजाकडून खंडणी घेऊन तेथें स. १५१८त त्यानें एक किल्ला बांधिला. पोर्तुगीझांनीं सीलोन जिंकण्याचा हा आरंभ होय. स. १५१८च्या अखेरीस लोपेझ सेक्वीरा ह्याची गव्हर्नरच्या जाग्यावर नेमणूक होऊन आल्बर्गारिया युरोपास परत गेला. सेक्वीरानें तीन वर्षे काम केलें; नंतर मेनेझीसची नेमणूक झाली, (स. १५२१–१५२४). ह्या दोनही कारकिर्दींत विशेष महत्त्वाची गोष्ट घडली नाहीं. मात्र युरोपांत राजा इमॅन्युएल स. १५२१ त मरण पावला. हिंदुस्थानांत पोर्तुगीझांचा अंमल कायमचा बसण्यास ह्या राजाचा शहाणपणाच फार उपयोगी पडला. विशेषतः योग्य माणसांची निवड करून, त्यांच्या अडचणी लगेच दूर करणें, हातीं धरलेल्या कामांत पैसा, माणसें व गलबतें ह्यांचा मुबलक पुरवठा करणें, इत्यादि गोष्टी त्यानें उत्तम प्रकारें तडीस नेल्यामुळें, ह्या उद्योगाची भरभराट झाली. तथापि ह्या यशाचें मुख्य श्रेय त्याचा बाप दुसरा जॉन ह्यासच दिलें पाहिजे. कारण दूरचे प्रदेश शोधून काढण्याचें अवघड काम त्यानें तडीस नेलें; व त्यानें माणसें तयार केलीं, त्यांच्याच हस्तें पुढील पराक्रम घडून आले. इमॅन्युएल पोर्तुगाल देशांत फारसा प्रिय नव्हता. तो संशयी व अनुपकारी असून पैशाचाही लोभी होता. हिंदुस्थानच्या व्यापारापासून होणारा सर्व फायदा त्यानें स्वतः घेतला. इमॅन्युएल नंतर त्याचा मुलगा तिसरा जॉन पोर्तुगालच्या गादीवर बसला. तो इमॅन्युएलपेक्षां पुष्कळ चांगला होता. त्यास गुणाची पारख असे व गुणांचें चीज केल्याशिवाय तो

राहत नसे. तथापि धर्माच्या कामांत तो दुराग्रही होता. हिंदुस्थानांत राज्य स्थापून व्यापार व ऐहिक संपत्ति वाढवावी एवढाच त्याचा उद्देश नव्हता, तर येथच्या लोकांस क्रिस्ती करून परलोकाचीही भर करावी अशी त्यास जबरदस्त इच्छा होती. पोर्तुगाल देशांत 'पवित्र न्यायासन' (the Holy Inquisition) स्थापून, तद्वारा लोकांवर धर्माची जाचणूक त्यानें लादल्यामुळें, राष्ट्राचा उत्साह व बुद्धिमत्ता खुरटून गेलीं. व हिकडे हिंदुस्थानांतही लोकांस बाटविण्याचा दुष्ट क्रम त्यानें सुरू केल्यामुळें, त्याच्या राज्याचा पाया फार दुर्बल झाला.

ह्या तिसऱ्या जॉन राजानें प्रसिद्ध खलाशी वास्को ड गामा ह्यास व्हाइसरॉय नेमून स. १५२४त हिंदुस्थानांत पाठविलें. व्हाइसरॉय नेमल्यामुळें त्याचा अधिकारही मोठा होता. ह्या पूर्वीच गामाचा असा गौरव व्हावयास पाहिजे होता. पण इमॅन्युएल राजाची त्याजवर मर्जी नव्हती. हिंदुस्थानांतील पोर्तुगीझ अधिकारी बरेच स्वेच्छाचारी व वरिष्ठांचा हुकूम मानीतनासे झाले होते. त्यांस पैसे खाण्याची संवय लागून, ते कामें बरोबर करीत नसत. त्यांचा बंदोबस्त करण्याचें काम गामा ह्यास सांगितलेलें होतें. तो इकडे येऊन दाखल झाल्यावर चौलचा किल्ला पाहून गोव्यास गेला. गोव्याचा अधिकारी पेस्ताना ह्याजविरुद्ध पुष्कळ तकरारी आल्या होत्या, सबब त्यास गामानें नोकरींतून एकदम कमी केलें. पुढें कोचीन येथें जाऊन तेथच्या पोर्तुगीझ अधिकाऱ्याजवळून नोकरीचा राजीनामा घेतला. येणेंकरून गामाचा दरारा चांगला बसला. पण असा अंमल गाजविण्यास तो फार दिवस जगला नाहीं. तो अगदींच वयोवृद्ध झाला होता, व स. १५२४च्या डिसेंबरांत मरण पावला. त्याला कोचीन येथें पुरलें; पण पुढें स. १५३८त त्याच्या अस्थि पोर्तुगाल देशांत नेण्यांत आल्या.

गामाच्या पश्चात् दोन वर्षेपावेतों डॉम हेन्री ड मेनेझीस ह्यानें गव्हर्नरचें काम केलें. तो स. १५२६ त मरण पावल्यावर लोपो व्हाझ ड सांपेयो ह्याची नेमणूक झाली. पण सांपेयोच्या विरुद्ध पुष्कळ लोकांच्या तक्रारी होत्या. किल्ल्यांची वगैरे व्यवस्था ठीक नव्हती. शिवाय तुर्कस्थानचा पराक्रमी बादशहा सुलेमान हिंदुस्थानावर स्वारी करण्याकरितां मोठें आरमार तयार करीत होता. त्याचें व व्हेनिशन लोकांचें सख्य होतें. पोर्तुगीझ लोकांचा समुद्रमार्गानें हिंदुस्थानांत संचार झाल्यापासून व्हेनिशन व्यापाऱ्यांचा व्यापार ठार बुडाला, तेव्हां मुसलमानांशीं सख्य जोडून पोर्तुगीझांस शह देण्याचा त्यांनीं उपक्रम चालविला. ही गोष्ट पूर्वींच व्हावयाची; पण तुर्कांचें इजिप्टशीं युद्ध चाललें होतें, तें स. १५१७ त संपून इजिप्ट देश तुर्कांचे ताब्यांत गेला. तसेंच सिरिया आणि आरेबिया हेही देश तुर्कांचे ताब्यांत आले. तुर्कांचा सुलतान सलीम स. १५२०त मरण पावला, आणि त्याचा मुलगा सुलेमान तख्तनशीन झाला. हिंदुस्थानामुळें पोर्तुगीझांचें वजन कसें वाढलें हें त्यास पूर्णपणें कळत असून, त्यांचा प्रतिकार करण्यासाठीं सुवेझ येथें त्यानें एक मोठें आरमार तयार केलें. त्याजवर सुलेमान पाच्छा याची नेमणूक झाली. ह्या आरमारांत व्हेनिसचे क्रिस्ती खलाशी व तुर्क आणि इजिप्टचे खलाशी आणलेले होते.

**२. न्यनो डा कुन्हा (स. १५२९–१५३८).**—अशा बिकट प्रसंगीं हिंदुस्थानांत कोणी तरी अक्कलवान पुरुष असावा अशा हेतूनें पोर्तुगीझ राजा तिसरा जॉन ह्यानें न्यूनो डा कुन्हा ह्यास स. १५२८त गव्हर्नर नेमून इकडे पाठविलें. आल्बुकर्कनंतर इकडे आलेला विशेष पराक्रमी पुरुष हाच होय. त्यानें पूर्वेकडील समुद्रांत अनेक पराक्रम केले होते. स. १५२९त मोंबासा येथील राजास जिंकून त्यानें ओर्मझच्या राजाकडून खंडणी मिळविली होती. डा कुन्हा

स. १५२९त इकडे आला, व लगेच त्यानें सांपेयो ह्यास कैद करून पोर्तुगाल देशास परत पाठविलें. परत गेल्यावर कांहीं दिवस कैद भोगून पुढें तो हद्दपार झाला. डा कुन्हानें सर्व ठिकाणें, किल्ले, व वखारी तपासून पाहिल्या; आणि अधिकाऱ्यांच्या लुच्चेगिऱ्या हुडकून काढून त्यांस शासन केलें. ह्याशिवाय व्यापार व राज्य वाढविण्याचेही त्यानें पुष्कळ प्रयत्न केले. कारोमांडल किनाऱ्यानें सेंट टॉमेच्या पुढें पोर्तुगीझ व्यापार चालू नव्हता, पण डाकुन्हानें बंगालच्या मुसलमान अधिकाऱ्यांशीं संधान जुळवून बंगाल प्रांताशीं व्यापार सुरू केला. गोव्याप्रमाणें बंगालच्या किनाऱ्यावर आपलें एखादें कायमचें बंदर असावें अशी डा कुन्हाची इच्छा होती, पण ती सफळ झाली नाहीं. गुजराथच्या किनाऱ्यावर पोर्तुगीझांचें बंदर नव्हतें. त्यांचें अगदीं उत्तरेकडील ठिकाण चौल होतें. तुर्कस्तानांतून सुलेमानाचें आरमार गुजराथच्या किनाऱ्यावर आल्यास, त्यास तेथच्या मुसलमान राजाचा आश्रय मिळेल व मग पोर्तुगीझांस तें जड जाईल, ह्या हेतूनें डा कुन्हानें गुजराथेंत बंदर मिळविण्याची खटपट चालविली. इतक्यांत त्याला अनुकूल संधि आली. गुजराथचा सुलतान बहादूरशहा व दिल्लीचा मोगल बादशहा हुमायून यांचें युद्ध चाललें होतें; त्यांत बहादूरशहानें पोर्तुगीझांची मदत मागितली. त्याबद्दल वसई बेट त्यानें पोर्तुगीझांस देऊं केलें. तें ताब्यांत घेऊन तेथें पोर्तुगीझांनीं मजबूद किल्ला बांधिला, (१५३४). तेव्हांपासून वसई हें पोर्तुगीझांचें उत्तरेकडील मोठें ठाणें होऊन तें गोव्याप्रमाणेंच भरभराटीस आलें! तसेंच दमण, ठाणें, तारापूर, वांद्रा, माहीम, मुंबई वगैरे ठिकाणें त्यांनीं काबीज केलीं. स. १५३५त बहादूरशहानें पोर्तुगीझांच्या मदतीखातर त्यांस काठेवाडच्या दक्षिणचें दीवबेट दिलें. तेथें लगेच त्यांनीं एक अत्यंत मजबूत किल्ला बांधिला (१५३५). बहादूरशहा व डा कुन्हा यांचा तह झाला होता; पण एक

दिवशीं डा कुन्हास भेटून बहादूरशहा जहाजावरून परत येत असतां त्याचा खून झाला, व त्याचा पुतण्या तिसरा महंमदशहा ह्यानें तुर्कस्तानचा सुलतान सुलेमान याजशीं सख्य करून पोर्तुगीझांवर शस्त्र धरिलें. तेव्हां सुलेमानानें पाण्यांतून व महंमदशहानें जमिनीवरून दीव बेटास वेढा घातला. तत्पूर्वीच क़िल्ल्याचें काम पुरें झालें होतें; तें पोर्तुगीझांच्या फार उपयोगास आलें.

सिल्व्हेरा नांवाच्या पोर्तुगीझ अधिकाऱ्यानें दीवचा बचाव उत्कृष्ट रीतीनें केला. वेढा पुष्कळ महिने चालून शेवटीं मुसलमानांच्या आपसांतील भांडणामुळें तो उठला. एवंच दीव बेट मुसलमानांस मिळालें नाहीं. इकडे डाकुन्हाच्या जागेवर गार्शिया ड नोरोन्हा ह्याची नेमणूक झाली ( सन १५३८ ). डाकुन्हानें कडकपणा धारण केल्यामुळें त्यास अनेक शत्रु झाले, व त्याजबद्दल भलभलत्याच कंड्या राजाच्या कानीं गेल्या. त्यांवरून त्यास कैद करून परत पाठवावें असा हुकूम सुटला. त्याप्रमाणें परत जात असतां सन १५३९ त तो रस्त्यांतच मरण पावला. दीव बेट काबीज करणें ही त्याच्या कारभाराची मोठी गोष्ट होय. तो आल्बुकर्कसारखाच हुशार होता.

**३. जॉन कॅस्ट्रो व दीवचा पाडाव ( स. १५४६ ).**—गार्शिया नोरोन्हा सन १५४०त गोवा येथें मरण पावला. नंतर वास्को ड गामाचा दुसरा मुलगा स्टीफो ड गामा गव्हर्नर झाला. त्यानें तांबड्या समुद्रांत एक सफर केली. सन १५४२ त त्याच्या जागयावर अफॉन्झो ड सूझा ह्याची नेमणूक झाली. त्यानें विजापूरच्या आदिलशहाशीं तह करून गोव्याच्या आसपासचा मुलूख मिळविला. सन १५४५त डॉम जॉन ड कॅस्ट्रो ह्याची गव्हर्नरच्या जागीं नेमणूक झाली. हा गृहस्थ सभ्य व प्रामाणिक म्हणून इकडे पाठविलेला होता. अलीकडे हिंदुस्थानांत येणारे पोर्तुगीझ कामगार येन केन प्रकारेण स्वतःच्या

तुंबड्या भरीत असत. सरकारी कामांत लांचखाऊपणा व खासगी वर्तनांत जुवा व इतर व्यसनें ह्या कारणांनीं जिकडे तिकडे गोंधळ व अन्याय माजला होता. तो सर्व मिटविण्याकरितां, कॅस्ट्रो हा मोठ्या तयारीनें इकडे आला. कॅस्ट्रोनें अंतर्व्यवस्था सुधारण्याचाही बराच प्रयत्न केला. हिंदुस्थानांत नऊ वर्षें लष्करांत नोकरी केल्यावर आपल्या लोकांस वाटेल तितका खासगी व्यापार करण्याची परवानगी मिळेल, असें वचन पोर्तुगालच्या राजानें आरंभापासूनच त्यांस दिल्या-मुळें, त्या लालुचीनें पुष्कळ लोक इकडे येत. अर्थात् ह्या खासगी व्यापाराची मुभा म्हणजे जिवंत अन्यायाचा सुकाळ. अंमलदारांचे पगार वगैरे ठरवून वरील अन्याय कमी करण्याचा कॅस्ट्रोनें प्रयत्न केला. पण त्यास विशेष यश आलें नाहीं.

कॅस्ट्रो आला तेव्हां पोर्तुगीझ लोकांवर सर्व मुसलमानांनीं शस्त्र उचललें होतें. खंबायतचा सुलतान महंमूद व त्याचा मुख्य कामगार खोजा जाफर हे दीव परत घेण्याच्या उद्योगास लागले. खोजा जाफर हा मोठा अभिमानी व चतुर पुरुष होता. त्यानें बाहेरून पोर्तुगीझांशीं स्नेह राखून अंतस्थ रीतीनें दीव परत घेण्यासाठीं सर्व मुसलमानांची एक जूट केली. एका पोर्तुगीझ इसमास फितवून त्याजकरवीं दीवचें पिण्याचें सर्व पाणी त्यानें विषारून टाकण्याची तजवीज केली, परंतु हा बेत एका मुसलमान स्त्रीच्या मार्फत पोर्तुगीझांस कळून त्यांनी त्याचा आगाऊच बंदोबस्त करून ठेविला. मास्करीन्हा म्हणून दीवचा मुख्य अंमलदार होता. त्यानेंही लढण्याची सर्व तयारी केली. प्रत्येक बुरुजावर त्यानें आपल्या भरंवशाचा एकएक कामगार नेमून प्रत्येकाच्या हाताखालीं तीस मनुष्य देऊन ठेविले. खोजा जाफरनें प्रथम समुद्रां-तून दीववर हल्ला केला; पण त्याचीं पुढें पाठविलेलीं तीन जहाजें पोर्तुगीझांनीं पकडून फोडिलीं. त्यांत पुष्कळ अन्नसामुग्री त्यांस सांप-

डली. समोरच्या बाजूस जमिनीवर खोजा जाफरनें एक उंच तट बांधून त्यावरून किल्यावर मारा चालविला. ह्या माऱ्यानें किल्यांत पोर्तुगीझांची फार खराबी झाली. पण ते मोठ्या नेटानें लढत होते. बायकामुलें सुद्धां मरण्यास सिद्ध होऊन लढत होतीं. म्हणून मुसलमानांच्या तोफांनीं दिवसभर जो भाग तुटे, तो पुनः रात्रींत ते भरून काढीत. आपल्या माऱ्याचा परिणाम होत नाहीं असें पाहून जाफरनें दुसरा एक उंच तट बांधिला. त्यावरून तो दीववर मारा करीत होता. एके दिवशीं ह्या किल्यास पडलेलें एक भोंक तपाशीत असतां पोर्तुगीझ तोफांतला एक गोळा सहजगत्या त्याजकडे आला, व त्यायोगें तो शूर पुरुष ताबडतोब मरण पावला, ( ता. २६ जून, स. १५५६ ). जाफरचा मुलगा रूमीखान हाही बापासारखाच शूर होता. त्यानें पुढें वेढ्याचें काम हातीं घेतलें. दोहोंकडील इसम जिवावर उदार होऊन लढत होते. हजार हजार लोकांच्या टोळ्या घेऊन रूमीखान एक एक बुरुजावर जाई व तितके वेळां आंतले लोक त्वेषानें लढून त्यांस परत फिरवीत. पण अन्नसामुग्री संपून आंतल्या लोकांस भयंकर स्थिति प्राप्त झाली होती. तशाच स्थितींत लढत असतां अनेक वेळां किल्ला पडण्याचा प्रसंग आला. मुसलमानांनीं सुरुंग व तोफा ह्यांचा कहर करून सोडिला. पोर्तुगीझांचे मूळ ४०० लोक किल्यावर होते. त्यांपैकीं दोनशें अगोदरच मेले होते; व बाकीच्या दोनशांतील बहुतेक घायाळ झालेले होते. इकडे मुसलमानांचे पांच हजारांवर लोक पडले. पुढें ऐनप्रसंगीं पोर्तुगीझांस चारशें लोकांची मदत येऊन पोंचली; व कांहीं अन्नसामुग्रीचीं मुसलमानांचीं जहाजेंही त्यांच्या हातांत पडलीं. त्यामुळें पोर्तुगीझांस नवीन दम आला. ह्याप्रमाणें वेढा आठ महिने चालला. स. १५४६ च्या नोव्हेंबरांत डॉमकॅस्ट्रोनें मोठें आरमार तयार करून दीवच्या मदतीस पाठविलें. त्या आरमाराचा मुख्य डॉम-

लिमा हा फार क्रूर मनुष्य होता. त्याच्या हाताखालीं सुमारें शंभर जहाजें होतीं. वसई, दमण, सुरत, हंसोट वगैरे किनाऱ्यावरील मुलूख जाळून लुटून उद्ध्वस्त करीत लिमा दीव येथें आला. आरमाराबरोबर गव्हर्नर कॅस्ट्रोही होता. ही मदत येतांच पोर्तुगीझांनीं किल्याबाहेर येऊन निरनिराळ्या तुकड्यांनीं मैदानांत मुसलमानांवर हल्ला केला. तेव्हां मोठ्या निकराचा रणसंग्राम होऊन शेवटीं पोर्तुगीझांस जय प्राप्त झाला. असे रणसंग्राम लागोपाठ तीन चार झाले. दोनही पक्षांनीं आपापली शिकस्त केली. शेवटीं रूमीखान व त्याचे अनेक शूर साथीदार पडले, तेव्हां मुसलमान लोक दीव सोडून चालते झाले. त्यांच्या तोफा व पुष्कळ सामुग्री पोर्तुगीझांस मिळाली. खंबायतच्या राजास ही पराजयाची बातमी कळतांच त्याच्या ताब्यांत अठ्ठावीस पोर्तुगीझ कैदी होते, त्यांचा त्यानें शिरच्छेद केला. पुढें पोर्तुगीझांनीं खंबायत, घोघो वगैरे शहरें जाळून सुरत शहर लुटलें व निरपराधी रयतेची कत्तल करून आपल्या क्रूरपणाची शिकस्त करून दाखविली.

कॅस्ट्रोनें विजापूरच्या आदिलशहाशींही युद्ध सुरू केलें होतें. त्यांत आदिलशहाचा पराभव करून पोर्तुगीझांनीं दाभोळ बंदर काबीज केलें. नंतर दोघांचा तह ठरला ( स. १५४७ ). दीवच्या विजयाची बातमी युरोपास पोंचून राजाकडून कॅस्ट्रोस शाबासकी व व्हाइसरॉयचा हुद्दा मिळाला. इकडे येणारे कित्येक इसम नुसते गव्हर्नर असत; व कित्येक व्हाइसरॉय असत; व दोघांचे अधिकार भिन्न असत. कॅस्ट्रो स. १५४८त मरण पावला. आल्बुकर्कनंतर मोठा गव्हर्नर हाच झाला; व गोवा काबीज करून आल्बुकर्कनें आपली कीर्ति पोर्तुगीझ इतिहासांत कायम केली त्याचप्रमाणें दीव काबीज केल्याबद्दल कॅस्ट्रोची कीर्ति आहे.

**४. सन १५४८पासून १५८०पर्यंतचे कामगार.**—कॅस्ट्रो-नंतर गव्हर्नरची जागा गार्शिया ड सा ह्यास मिळाली. त्यानें गुजराथचा सुलतान तिसरा महंमदशहा ह्याजबरोबर तह करून दीवचा किल्ला कायमचा पोर्तुगीझांकडे घेतला. मात्र किल्ल्याच्या बाहेरचा सर्व मुलूख सुलतानाचा ठरला. गार्शिया ड सा स. १५४९त मरण पावला. नंतर वसईचा अधिकारी जॉर्ज काब्राल ह्यास गव्हर्नरची जागा थोडे दिवस मिळाली; पण पोर्तुगालहून अफान्झो ड नोरोन्हा हा व्हाइसरॉय म्हणून आला. त्यानें स. १५६४ पावेतों काम करून सीलोन बेटांत पोर्तुगीझ लोकांची सत्ता वाढविली. पुढें फ्रान्सिस्को बारेटो हा गव्हर्नर झाला. त्यानें सर्व पोर्तुगीझ किल्ले तपासून त्यांचा बंदोबस्त केला व पोर्तुगीझ नांवाचा दरारा कायम राखिला. ह्याच्या कारकीर्दीत प्रसिद्ध पोर्तुगीझ कवि कमोन्स ( Comoens ) ह्यानें गोव्यांतील पोर्तुगीझ अधिकाऱ्यांच्या उन्मत्तपणावर एक टीकात्मक कविता प्रसिद्ध केली, त्याबद्दल शिक्षा म्हणून त्या कवीस हद्दपार करून मकाव येथें पाठविलें. तिकडे युरोपांत राजा तिसरा जॉन मरण पावला; व त्याचा दुर्दैवी अल्पवयी नातू सबाश्चन गादीवर बसला. पण राज्याचा कारभार मयत राजाची राणी कॅथरीन पाहत असे. तिनें स. १५५८त कान्स्टांटिनो ड ब्रागांझा ह्यास व्हाइसरॉय नेमून गोव्यास पाठविलें. ह्यानें दमण काबीज करून तेथें एक मजबूत किल्ला बांधिला. तसेंच मलाका, ओर्मझ, सीलोन वगैरे ठिकाणीं गलबतें पाठवून आपल्या अंमलाची मजबुदी केली. सीलोनांत स्वतः जाऊन जाफनापट्टण नांवाचें ठिकाण घेतलें, तेंच पोर्तुगीझांचें सीलोनातलें मुख्य ठिकाण होतें. त्यानें हाताखालच्या अंमलदारांची गैरशिस्त वर्तणूक मोडण्याचीही बरीच खटपट केली. स. १५६१त फ्रान्सिस्को कूटिन्हो हा व्हाइसरॉय झाला. त्यानें तीन वर्षे कारभार केल्यावर ॲन्टो ड नोरोन्हा व्हाइसरॉय

झाला ( १५६४ ). इकडे सर्व मुसलमान राजे विजयनगरचें राज्य जिंकण्यांत गुंतल्यामुळें, पोर्तुगीझांचें चांगलें फावलें. त्यांनीं सीलोन बेट सर्व काबीज केलें व इतर लहान लहान ठिकाणीं आपली सत्ता कायम केली. मुसलमानांनीं तालिकोटच्या समरभूमीवर विजयनगरच्या नरसिंहरायास जिंकिलें ( १५६४ ), ही गोष्ट पोर्तुगीझ दुरून शांतपणें पाहत होते. अशा प्रसंगीं आल्बुकर्क असता, तर हिंदु राजांस मदत करून, त्यानें मुसलमानांस शिरजोर होऊं दिलें नसतें. हिंदु राजांचें संरक्षण करणें जरूर आहे असें आल्बुकर्क समजत असे. त्याच्या-प्रमाणें सर्व देशांत आपलें राज्य स्थापावयाची पुढील पोर्तुगीझ अंमलदारांची इच्छा असती, तर त्यांनीं मुसलमानांस प्रबळ होऊं दिलें नसतें. विजयनगरच्या राजानें पूर्वकिनाऱ्यावरील सेंट टॉमे नामक पोर्तुगीझ ठिकाणावर एकदां हल्ला केला होता, तेव्हांपासून त्याजबद्दल पोर्तुगीझांच्या मनांत स्नेहभाव नव्हता; म्हणून त्यांनीं त्यास मदत केली नाहीं.

स. १५६८त लुई आथेड ( Athaide ) हा व्हाईसरॉय झाला. तो येतांच तालिकोटच्या लढाईचा पहिला परिणाम त्यास सहन करावा लागला. म्हणजे विजापूरच्या आदिलशहानें गोव्यावर स्वारी केली, त्याजबरोबर एक लाख फौज व दोन हजारांवर हत्ती होते. ह्या प्रसंगीं पोर्तुगीझांविरुद्ध बहुतेक राजांनीं जूट करून त्यांस येथून हांकून देण्याचा विचार केला होता. स. १५७०त गोव्यास वेढा पडला, तेव्हां आंत फक्त ७०० लोक लढाईच्या कामाचे होते. अशा स्थितींत पाद्री व एतद्देशीय वगैरे लोक मदतीस घेऊन आथेडनें सर्व मिळून दोन हजारांची भरती केली. ह्या लोकांनीं दहा महिनेपावेतों आदिलशहास दाद दिली नाहीं. ह्यावरून पोर्तुगीझ लोकांच्या शौर्याचा व निश्चयाची साक्ष चांगली पटते. शेवटीं आदिलशहाची पुष्कळ खराबी होऊन

तो वेढा उठवून चालता झाला. ह्याच वेळेस मलाका, चौल, व च कालिकोट जवळील शाले ह्या ठिकाणीं पोर्तुगीझांनीं आपल्या शत्रूंस लढून मागें हटविलें. नंतर आथेडनें मलबार किनाऱ्यानें स्वारी करून सर्व शत्रूंचें पारिपत्य केलें; विशेषतः होनावरचा राजा गोव्याच्या वेढ्यांत आदिलशहास मिळाला होता, म्हणून होनावर शहर जाळून तेथें आथेडनें भयंकर कहर उसळून दिला. स. १५७१त आंटोनियो ड नोरोन्हा व्हाइसरॉय होऊन आला. हा पूर्वीच्या अधिकाऱ्यांप्रमाणें विशेष हुशार नव्हता. आफ्रिकेच्या किनाऱ्यापासून तों मलाकापर्यंतचा सर्व प्रदेश एका अधिकाऱ्याच्या आटोक्यांत राहण्यास अडचण पडूं लागल्यामुळें, पोर्तुगालच्या दरबाराकडून इकडील अधिकाराचे तीन टप्पे करण्यांत आले. एडनपासून सीलोनपर्यंतचा मधला मुख्य पट्टा गोव्याचे ताब्यांत राहून तेथच्या अधिकाऱ्यास व्हाइसरॉय ही पदवी; सीलोनपासून मलाकापर्यंतचा पूर्वेकडील भाग पृथक् अधिकाऱ्याचे हाताखालीं; व आफ्रिकेच्या सर्व पूर्वकिनाऱ्यावर तिसरा अधिकारी अशी व्यवस्था झाली. दुसऱ्याचें मुख्य ठिकाण मलाका व तिसऱ्याचें मोझांबिक होतें. मोझांबिकच्या अधिकाऱ्यानें आफ्रिकेच्या पूर्वेकडील पुष्कळ मुलखाची तपासणी करून नवीन शोध लाविला. स. १५७३त आंटोनियो बारेटो हा गोव्याचा अधिकारी झाला. पुढें स. १५७६ पासून १५७८ पावेतों डिओगो ड मेनेझीस हा गव्हर्नर होऊन स. १५७८ पासून १५८१ पावेतों डॉम आथेड ह्यानें दुसऱ्यांदां तें काम केलें. आथेड हा स. १५८१त गोव्यास मरण पावला. स. १५८०त युरोपांत पोर्तुगाल व स्पेन हे दोन देश कौटुंबिक संबंधानें एका राजाच्या अंमलाखालीं आले, तेव्हांपासून हिंदुस्थानांतील पोर्तुगीझ कारभारास निराळें वळण लागलें व त्यांचा येथील इतिहासाचा पहिला भाग संपला.

६. स. १५८० पासून १६१२ पावेतों:—ह्या संयुक्त देशांचा पहिला राजा दुसरा फिलिप होय. स. १५८८त इंग्लंडावर मोठें आरमार पाठवून एलिझाबेथ राणीशीं लढणारा राजा हाच होय. त्यानें हिंदुस्थानांतील सर्व पोर्तुगीझ अधिकाऱ्यांकडून आपल्या राज्यपदाच्या कबुलीची शपथ घेवविली. मास्करीन्हा यास त्यानें गोव्याचा व्हाइसरॉय नेमिलें. ह्यानेंच चौलचें संरक्षण केलें होतें. मास्करीन्हानें सन १५८१ पासून १५८४ पर्यंत गोव्याचा कारभार केला. ह्या व पुढील कारकिर्दींत हिंदुस्थानसंबंधीं महत्त्वाच्या गोष्टी फारच थोड्या घडल्या आहेत. दमण, दीव, वसई वगैरे किनाऱ्यावरील बंदरांचें संरक्षण करणें, सीलोन, मलाका वगैरेकडील वसाहतींस मदत करणें, असल्या कामांतच त्यांचा बहुतेक वेळ जाई. इतक्यांत डच व्यापारी पुढें सरसावल्यामुळें पोर्तुगीझांचा व्यापार मागें पडला. सारांश, युद्धाच्या भानगडींपेक्षां दुसरे ऐतिहासिक महत्त्वाचे प्रकार पुढें विशेष घडले नाहींत. इ. स. १५६४त अँटोनियो नोरोन्हा व्हाइसरॉय झाला, तेव्हांपासून एतद्देशीय लोकांस जुलमानें क्रिस्ती करण्याचा प्रकार चालू झाला. गोव्याहून जेझुइट पाद्री साष्टी बेटांत गेले. त्यानीं लष्कराची मदत घेऊन हिंदु लोकांच्या देवालयांचा विध्वंस केला. तेव्हां लोकही शस्त्रें घेऊन उठले. त्यांनीं क्रिस्ती देवालयांचा नाश केला. कित्येकांनीं क्रिस्ती उपदेशकांवर हल्ले करून त्यांचे प्राण घेतले. ह्याचा सूड घेण्याकारितां नोरोन्हानें साष्टीवर फौज पाठविली; व त्यांतील सर्व लोकांची कत्तल करून व घरेंदारें जाळून सर्व देवळें जमीनदोस्त केलीं. तेव्हां पोर्तुगीझ लोकांचा जिकडे तिकडे वचक बसला. त्यांनीं सर्व प्रांतांत आपलीं मंदिरें स्थापिलीं व प्रत्येक टेकडीवर आपला क्रूस उभारिला. सन १५८४त डॉम ड्युआर्ट ड मेनेझिस ह्याची व्हाइसरॉयच्या जागेवर नेमणूक झाली. ह्याची सर्व कारकीर्द लढण्यांतच गेली. तुर्क लोक आपला गेलेला

व्यापार परत घेण्यासाठीं प्रयत्न करीत होते. त्यांचे व पोर्तुगीझांचे अनेक झगडे झाले. मेनेझीसनें सन १५८८ पर्यंत कारभार केला. त्याच्या कारकिर्दींत इंग्लंड व स्पेन ह्यांचें वांकडें येऊन आरमारांचें युद्ध झालें. सन १५६८त एक पोर्तुगीझ जहाज उत्कृष्ट मालानें भरलेलें युरोपास जात असतां प्रसिद्ध इंग्रज खलाशी ड्रेक ह्याच्या सहज हातास लागलें. त्यामुळें पोर्तुगीझ जहाजांत विशेष दम नाहीं, व हिंदुस्थानांत पोर्तुगीझ लोकांचें प्राबल्य वाटलें होतें तितकें नाहीं, असें इंग्रजांस कळून आलें. तसेंच हिंदुस्थानांतील संपत्तीचाही त्यांस अंदाज कळून आला. अशाच प्रकारची चळवळ सन १५८९त झाली. त्या वेळेस एक जहाज इंग्रजांचे हातास लागलें. त्यांतील माल इंग्लंडांत नेऊन विकल्यावर दीड लाख पौंडाचें उत्पन्न आलें. शिवाय जहाजावर मौल्यवान जवाहीर होतें तें निराळेंच. अशा उदाहरणानेंच इंग्रजांच्या तोंडास पाणी सुटलें. डयुआर्टे सन १५८८त मरण पावला.

सन १५८९त डी सूजा कूटींनो हा गव्हर्नर झाला. त्यानें सन १५९१ पर्यंत कारभार केला. त्याच्यानंतर माथियास ड आल्बुकर्क हा १५९७ पर्यंत त्या कामावर होता. सन १५९७त फ्रान्सिस्को ड गामा हा व्हाइसरॉय झाला. हा सर्व लोकांशीं फार उद्दामपणानें वागत असे. शिवाय त्याच्या हातांत असलेल्या नोकऱ्या त्यानें आपल्या ओळखीच्या लोकांस दिल्या, त्यामुळें त्याच्या विरुद्ध फार गवगवा झाला. त्याच्या कारकिर्दींत डच व पोर्तुगीझ ह्यांजमध्यें मलाका नजीक एक लढाई झाली. तींत डच लोकांचा पराजय झाला. सन १६०० मध्यें सालढाना नांवाचा इसम पोर्तुगाल देशाहून व्हाइसरॉयच्या कामावर आला. तेव्हां ड गामा काम सोडून परत गेला. परत जातेवेळीं त्याची गोव्याचे लोकांनीं फारच मानखंडना केली. त्यास परत येण्यास पांच महिने लागले. त्या वेळीं हा प्रवास फार जलद झाला असें समजत.

सालढानाच्या कारकिर्दीतील मुख्य गोष्ट म्हटली म्हणजे चीन देशामध्यें क्रिस्तीधर्म सुरू करण्याकरितां मंडळी पाठविली ही होय. खैबर घांटांतून मध्यआशियाच्या रस्त्यानें ही मंडळी अनेक संकटें सोसून पेकीन येथें गेली. त्याच वेळेपासून चीन देशाची खरी माहिती युरोपियन लोकांस झाली. सालढाना नंतर सन १६०४त आल्फान्झो कॅस्ट्रो हा व्हाइसरॉय झाला. ह्या वेळीं डचलोक फार प्रबळ झाले होते. मलाक्कानजीक त्यांच्या व पोर्तुगीझ लोकांच्या समुद्रांत लढाया झाल्या, त्यांत पोर्तुगीझ लोकांचा पराजय झाला. कॅस्ट्रो हा मलाक्का येथें सन १६०६ त मरण पावला. नंतर गोव्याचा आर्चबिशप मेन्झिस ह्यानें दोन वर्षें गव्हर्नरचें काम केलें. त्याच्या वेळेस डच व पोर्तुगीझ ह्यांची मोझांबिक येथें लढाई झाली. १६०९ पासून मेंडोसा ह्यानें कांहीं वर्षें गव्हर्नरचें काम केलें. नंतर ताव्होरा नांवाचा इसम गव्हर्नर होऊन आला. ह्याच्या कारकिर्दींत पोर्तुगीझ व इंग्रज यांची सुरतच्या बंदरांत लढाई झाली. त्याची हकीगत इंग्रजांच्या प्रकरणांत येईल.

**६. स. १६१२–१६४० प०, उतरती कळा.**—सन १६१२ त अजव्हीडो व्हाइसरॉय झाला. ह्याच्या कारकिर्दींत मोगल बादशहाचें एक मक्केस जाणारें जहाज सुरतेच्या बंदरांत पोर्तुगीझ लोकांनीं पकडिलें. त्यामुळें बादशहानें दंमणास वेढा घालून पुष्कळ नासधूस केली. त्याचप्रमाणें त्यानें वसईस वेढा घातला. तेव्हां पोर्तुगीझांनीं बादशहाशीं तह केला, ( सन १६१५ ). इंग्रज व डच ह्यांस बादशहानें थारा देऊं नये अशी ह्या तहांत कबुलात होती. पण ती टिकली नाहीं.

ह्या वेळीं पोर्तुगीझ अंमलाची फार निकृष्ट दशा आली. त्यांस चहूंकडून शत्रु उत्पन्न झाले. त्यांची अंतर्व्यवस्थाही अगदीं बिघडली होती. व्यापाराचा माल खरेदी करण्याकरितां जो पैसा युरोपांतून येई तो हे

अधिकारी राज्याच्या कामास खर्चून टाकीत. इकडे बहुतेक अधिकारी सरकारचे कर्जदारी असत. तिजोरींत पैसा मुळींच नव्हता. मंदिरांतील सर्व संपत्ति सुद्धां सरकारी कामांत वापरली जाई. त्याच वेळेस लढाईचें तोंड ज्यास्ती आलें. तेव्हां सन १६१४त युरोपांतून हुकूम आला, कीं मोठमोठ्या हुद्यांच्या सर्व जागा लिलांव करून विकाव्या; व उत्पन्न होईल त्यांतून खर्च करावा. त्या हुकमाप्रमाणें जुने नोकर एकदम कमी करण्यांत येऊन, जो ज्यास्ती पैसा भरील त्यास त्या एकदम देण्यांत आल्या. किल्ल्यांवरील मुख्य अंमलदारांच्या जागाही याचप्रमाणें विकण्यांत येऊं लागल्या. सारांश, पोर्तुगीझ लोकांची भरभराट संपून गेली. सन १६१८ त जॉन कूटिनो हा व्हाइसरॉय होऊन आला. अजव्हीडो परत गेला. हा फार दुष्ट होता. परत गेल्यावर त्यास पोर्तुगीझ सरकारनें कैद करून अंधार कोठडींत ठेवून दिलें. कांहीं दिवसांनीं त्याची चौकशी झाली; पण चौकशीनंतर त्याची ज्यास्तच नाचक्की झाली. हिंदुस्थानांत त्यानें केलेला दुष्टपणा अतर्क्य आहे. सिलोनांतील जयप्राप्तींत त्यानें आयांकडून त्यांचीं मुलें जात्यांत घालवून दळिलीं. शिपायांकडून कांहीं मुलें भाल्याचे टोंकांवर नाचवून, त्यांचे हाल पाहून तो आनंद मानी. कित्येकांस समुद्रांत लोटून त्यांस मगरांच्या भक्ष्यस्थानीं तो पाठवी.

कूटिनोच्या वेळेस इराण व चीन येथें पुष्कळ व्यवहार घडले. स. १६१९–२२ पावेतों आल्बुकर्क ह्यानें गव्हर्नरचें काम केलें. पुढें स. १६२२–२७ पावेतों फ्रान्सिस्को ड गामा व्हाइसरॉयच्या कामावर होता. स. १६२१त तिसरा फिलिप मरण पावला; व चवथा फिलिप गादीवर बसला. ह्या वेळेपासून स्पेन देशासही उतरती कळा लागली. पोर्तुगीझांचें नशीब इतकें खालावलें, कीं अलीकडे पुष्कळ जहाजें, माणसें व माल तुफानांत बुडाला. गामानें सर्व गोष्टींचा तपास करून

खरी हकीगत युरोपांत कळविली. पण पुनः वर येण्याचा मार्ग कोणा-सच सांपडला नाहीं. धर्माधिकारी लोकांची संख्या गोव्यास व इतर ठिकाणीं गृहस्थ लोकांच्या दुप्पट असे. तेव्हां ह्यापुढें नवीन मठ बांधूं नयेत असा हुकूम सुटला. डच व इंग्रज तर सारखे पाठीस लागले होते. ओर्मझ बंदर त्यांच्या हातांतून गेलें; या ठिकाणीं त्यांची सर्वांत ज्यास्त प्राप्ति होती. अशा कठिण प्रसंगीं सुद्धां लोकांची खासगी व्यापाराची खोड चालूच होती. लिस्बनहून पोरक्या मुली इकडे पाठ-वीत. त्यांच्या नवऱ्यांस सरकारी नोकऱ्या देण्याचा ठराव असे. अम-कीच्या नवऱ्यास अमक्या ठिकाणच्या गव्हर्नरची जागा द्यावयाची अशी व्यवस्था ठरलेली असल्यामुळें, त्या जागेकरितां अनेकांच्या उड्या पडत. अशा साधनांनीं पोर्तुगीझ प्रजा वाढविण्याचा सरकारचा उद्देश होता.

स. १६२८त कूटिनो जाऊन कोचीनचा बिशप ब्रिटो ह्यानें कांहीं दिवस गव्हर्नरचें काम केलें. तो १६२९त मरण पावला. नंतर मायकेल नोरोन्हा हा त्या जाग्यावर आला. अलीकडे डच आणि इंग्रज हिंदुस्थानांत आल्यामुळें पोर्तुगीझ व्यापार अगदीं बसला, तो वाढविण्याच्या हेतूनें राजानें एक कंपनी स्थापन केली, त्यांत स्वतः त्यानें पुष्कळ रक्कम भरून शिवाय मोठमोठ्या लोकांकडून आग्रहानें रकमा घालविल्या. तसेंच हिंदुस्थानांतील गोवें वगैरे ठिकाणच्या लोकांनीं व्यापारांत रकमा भराव्या म्हणून हुकूम केले. पण इकडे त्या कंपनींत कोणींच भांडवल घातलें नाहीं, व कंपनी लवकरच बुडाली. नोरोन्हाच्या खटपटीनें इंग्रजांशीं पोर्तुगीझांचें बरेंच सख्य राहिलें; डच लोकांशीं मात्र तितकें राहिलें नाहीं. नोरोन्हा बराच हुशार होता. परक्या शत्रूंपेक्षां आपल्या लोकां-कडूनच आपला नाश होत आहे हें पूर्ण समजून त्याप्रमाणें तो आपल्या राजास लिहून पाठवीत असे. विशेषतः धर्मखात्याच्या जेझुइट व इतर

लोकांकडून त्यास फार त्रास झाला. ते त्याचा हुकूम मानीत नसत. ते सरकारी पैसा उधळीत व शत्रूंशीं अंतस्थ कारस्थानें करीत; व पोर्तुगालच्या राजाचे आपण अंकित नाहीं असें उघडपणें सांगत. येथें आल्यावर पुष्कळ पोर्तुगीझ लोक साधु होऊन राहत, म्हणजे वाटेल तीं कृष्ण कृत्यें त्यांस करतां येत. सन १६३३त फ्रेंच लोक इकडे व्यापाराकरितां आले, त्यामुळें पोर्तुगीझ सत्तेस पुष्कळ धक्का बसला. ह्याच सुमारास मोंगल बादशहा शहाजहान ह्यानें त्यांजवर शस्त्र धरिलें. बादशहा आदिलशहाशीं लढत होता, त्यांत पोर्तुगीझांनीं आदिलशहास मदत केली; त्याबद्दल बादशहास राग येऊन त्यानें मोठी फौज पाठवून बंगाल प्रांतांतील सर्व पोर्तुगीझांस हांकून दिलें.

स. १६३५त इंग्रजांचें लंडन नांवाचें जहाज भाड्यानें घेऊन पोर्तुगीझांनीं चीन देशास सफर केली. उद्देश कीं, इंग्रजांच्या नांवाखालीं व्यापार चांगला होईल. पण चीन देशांत अनायासें इंग्रजांनींच आपल्या वखारी घातल्या, त्यायोगें वरील उपायानें उलट इंग्रजांस मदत केल्यासारखेंच झालें.

स. १६३५ त नोरोन्हा काम सोडून गेला व त्याच्याजागीं पेड्रो ड सिल्व्हा याची नेमणूक झाली. ह्या वेळेस तिजोरींत पैसा नसल्यामुळें राज्यावर मोठें संकट आलें होतें.

अलीकडे सर्व व्यापार डच लोकांच्या हातांत गेला होता; व अनेक प्रकारच्या अडचणी आल्या असतां सिल्व्हा हा त्यांतून पार पडण्यास योग्य नव्हता. कारण तो अतिशय गरीब व साधा होता. त्याच्या हातून कांहीं बंदोबस्त न होतां डच व इंग्रज यांची सत्ता वाढतच गेली, व सिल्व्हा स. १६३९ त मरण पावला, तेव्हां जॉन मेंझिस हा लिस्बनहून गव्हर्नरच्या जागेवर आला.

स. १६४० च्या डिसेंबरांत पोर्तुगीझ लोकांनीं स्पेनच्या विरुद्ध बंड करून फिरून स्वातंत्र्य मिळविलें. ब्रॅगॅन्झाचा ड्यूक होता तो चवथा जॉन ह्या नांवानें पोर्तुगालचा राजा झाला. पोर्तुगाल देशास स्वतंत्रता मिळाल्यावर तेथील राजानें डच लोकांशीं सख्य करून आपलें वर्चस्व राखण्याचा प्रयत्न केला. पण त्यांत त्यास यश न येतां पूर्वीचें सर्व वैभव गेलें. सीलोन, मलाका, मकाव हीं ठिकाणेंही हातांतून गेलीं. ह्यापुढें पोर्तुगीझांची निराळी हकीगत देण्याचें प्रयोजन नाहीं. जरुरीपुरती इंग्रजांच्या प्रकरणांत येईल.

---

## प्रकरण सहावें.

### पोर्तुगीझ राज्याची गुणदोषचर्चा.

१. पोर्तुगीझ कारभाराचीं धोरणें. २. व्यापार वाढविण्याच्या युक्त्या, आरबांचा पाडाव. ३. पोर्तुगीझ व्यापाराची किफायत. ४. पोर्तुगीझांचा ऐषआराम. ५. पोर्तुगीझ लोकांचें क्रौर्य. ६. धर्ममतसंशोधकपद्धति (इन्क्विझिशन). ७. क्रिस्तीधर्मप्रसाराचे प्रयत्न. ८. पोर्तुगीझांच्या चुकांचा इतरांस झालेला फायदा.

**१. पोर्तुगीझ कारभाराचीं धोरणें.**—हिंदुस्थानांत पोर्तुगीझ राज्याची स्थापना काय कारणानें होत गेली हें चवथ्या प्रकरणांत सांगून, पांचव्या प्रकरणांत इकडे आलेले पोर्तुगीझ अंमलदार व त्यांनीं केलेलीं ठळक ठळक कृत्यें ह्यांचें वर्णन दिलें आहे. हें वर्णन केवळ युद्धात्मक असल्यामुळें बरेंच कंटाळवाणें वाटेल, तरी पण पुढील संदर्भ कळण्यासाठीं त्याची जरूर असून, त्याजवर टीकात्मक विवेचन ह्या प्रकरणांत करावयाचें आहे.

आरंभीं पोर्तुगीझ लोकांनीं अनेक संकटें सोशिलीं; व अनेक विजय संपादन केले. त्यायोगानें त्यांचा व्यापार वाढून त्यांस अतिशय किफायत होऊं लागली. जहाजांचा नियमित प्रवास, कोठें काय जिन्नस मिळतो ह्याचा निश्चय, व पोर्तुगीझ शस्त्रांची अप्रतिहत शक्ति ह्या कारणांनीं थोड्या अवकाशांत लिस्बन शहर व पोर्तुगाल देश अतिशय सधन झाला. स. १५९५त डच लोकांनी इकडे व्यापार सुरू केला तोंपावेतों ही पोर्तुगालची अनन्यविभक्त भरभराट टिकली. व्यापाराकडे व पैशाकडे राष्ट्राचें लक्ष लागलें, तेव्हां राज्यकारभाराकडे दुर्लक्ष होऊं लागलें. धनलोभाच्या गुंगींत राज्यविस्ताराचे मनोरथ ढांसळून गेले.

पोर्तुगालच्या ताब्यांत आशियाचा व्यापार गेला त्याचें कारण त्या देशाचें आरमार होय. सन १४९७पासून १६१२चे दरम्यान हिंदुस्थानच्या व्यापाराकरितां एकंदर ८०६ गलबतें वापरण्यांत आलीं. त्यांपैकीं १५८० पासून १६१२ पावेतों १८६ आलीं. एकंदर जहाजांपैकीं ४२९ युरोपांत परत गेलीं; २८९ इकडे निरनिराळ्या ठिकाणीं राहिलीं; व ९६ तुटून व बुडून नाहींशीं झालीं. त्यांचा आकार सरासरीनें १०० पासून ५५० टन पावेतों असे. त्यांजवर तोफा असत. तोफांचा उपयोग युद्धाचे कामीं व गलबतांत वजन म्हणून होत असे. पोर्तुगालचे कारागीर आपलें कसब दाखविण्याकरितां अवजड तारवें बांधीत. पण तीं इकडच्या सफरींत टिकत नसत. १५९१ पावेतों बारा वर्षांत असलीं बावीस राक्षसी जहाजें बुडून नाहींशीं झालीं. शिवाय गोवा आणि दमण ह्या ठिकाणच्या उत्तम सागाचीं गलबतें ते लोक बांधीत असत. त्यांतील कॉन्स्टांटिना नांवाचें एक जहाज १५५०त बांधिलें, त्यानें आफ्रिकेस वळसा घालून युरोपास सतरा खेपा केल्या; व तें पंचवीस वर्षें टिकलें.

एवढ्याशा आरमारानें १९००० मैलांचा किनारा पोर्तुगीझ लोक कसा ताब्यांत ठेवीत हा एक मोठा प्रश्न आहे. ह्याचें उत्तर एवढेंच, कीं ते सोयीस वाटेल अशाच ठिकाणावर, व सोयीस वाटेल तेव्हांच, आपल्या सगळ्या आरमारानिशीं हल्ला करीत. जय झाला तर त्या ठिकाणाचा कबजा घेऊन तेथें फौज ठेवीत; पराजय झाला तर क्रूरपणानें दहशत बसवून ते लगेच समुद्रांत पळून जाऊन क्षितिजाखालीं नाहींसे होत. आशियाच्या किनाऱ्यावरील लोकांस अचंबा वाटे, कीं हा शत्रु समुद्रांतून गुप्तपणें येतो केव्हां, व नाहींसा होतो केव्हां. त्याच्या संचाराचा त्यांस अंदाज करितां येत नसे. असा भयंकर सूड घेणारा व शूर शत्रु आशियांतील लोकांस पूर्वी कधीं ठाऊक नव्हता. किनाऱ्याकिनाऱ्यानेंच त्यांनीं आपलीं ठाणीं बसविल्यामुळें पोर्तुगालचा ऱ्हास झाल्यावरही राज्याचें संरक्षण करण्यास वरील थोडीशी तयारी बस्स होती. जोंपर्यंत त्यांच्याच तोडीचा दुसऱ्या आरमाराचा इकडे संचार झाला नाहीं तोंपर्यंत त्यांची सरशी होती. परंतु दुसरीं युरोपियन राष्ट्रें इकडे येऊं लागतांच, पोर्तुगीझ सत्ता लयास गेली. तथापि एवढ्यावरून पोर्तुगीझांचें शौर्य व कसब कमी होतें असें समजावयाचें नाहीं. सन १५१४ त इमॅन्युएल राजानें तांबडासमुद्र व इराणचें आखात येथील बंदरें, त्यांतील अंतरें, व वरव्याच्या जागा ह्यांची तपासणी करण्यास हुकूम दिला. तेव्हांपासून सामुद्रिक शोध सुरू झाले; व पुढील शंभर वर्षात पोर्तुगीझ लोकांनीं भूगोलिक व सामुद्रिक स्थितीविषयीं अतिशय माहिती जमा केली. ह्या माहितीचा त्यांस युद्धाचे कामीं फारच उपयोग झाला. तांबड्या समुद्राचें नाकें, सीलोनचा कांठ व मलाकाची सामुद्रधुनी ह्या तीन ठिकाणीं मजबुती केल्यानें सर्व किनाऱ्यावर त्यांस देखरेख ठेवतां येऊं लागली. एडन ताब्यांत येईना तेव्हां त्यांनीं दीव काबीज केलें. ह्या दीवचाही त्यांस उत्कृष्ट उपयोग झाला.

कारण तांबडासमुद्र व इराणचें आखात ह्यांतून कोणतेंही गलबत हिंदुस्थानाकडे येऊं लागलें म्हणजे त्याजवर दीव येथून शह ठेवितां येत असे. ह्याप्रमाणें दीव, सीलोन आणि मलाका ह्या तीन ठिकाणांच्या कबजानें मसाल्याचा सर्व व्यापार त्यांच्या ताब्यांत आला. एवढी कमाई करितांना पोर्तुगीझ वीरांनीं अप्रतिम शौर्य दाखविलें असून त्यांच्या अनेक शूर पुरुषांची युद्धकरामत कोणत्याही इतिहासांत शोभण्यासारखी आहे.

पण त्यांची भिस्त केवळ शौर्यावरच नव्हती. किनाऱ्यावरील राजांचीं भांडणें व इतर व्यवहार चालत, त्यांत हात घालून कोणास मदत, कोणाशीं युद्ध किंवा तह वगैरे करून ते आपला कार्यभाग साधीत. ही गोष्ट मागील हकीगतीवरून सहज कळणार आहे. दुसऱ्याचे भांडणांत शिरून आपला फायदा करून घेण्याची पद्धति पुढें दुसऱ्या युरोपियनांनींही उचललेली आहे. एतद्देशीय लोकांची फौज तयार करून व एतद्देशीय राजांच्या भांडणांचा फायदा घेऊन उद्योग केला असतां हिंदुस्थानांत राज्य स्थापन करितां येईल, ही कल्पना डुप्ले यास सुचली असें इतिहासकार लिहितात. पण डुप्लेच्या पूर्वीं दोनशें वर्षें हा प्रयोग पोर्तुगीझ लोकांनीं प्रत्यक्ष करून पाहिला होता. वास्तविक हा प्रयोग पहिल्या प्रथम आल्बुकर्कनेंच केला असें म्हणतां येईल. पण ही गुरुकिल्ली शोधून काढण्याचें कारणच नव्हतें. युरोपियन लोकांनीं आशियाखंडांत पाऊल ठेवल्याबरोबर हा प्रकार अपरिहार्य होता. हिंदुस्थानांत एकछत्री अंमल असा मोगलांचा झाला. मोगलांचे पूर्वीं पन्नास वर्षें पोर्तुगीझ लोक हिंदुस्थानांत आले, त्या वेळीं ह्या देशांत जिकडे तिकडे अंदाधुंदी असल्यामुळें, त्यांजशीं टक्कर देण्यास सामर्थ्यवान असा येथें कोणीच सत्ताधारी नव्हता. म्हणून पोर्तुगीझांचें चांगलें साधलें. पुढें मोगलांचें राज्य दोनशें वर्षें चालून तें मोडकळीस येतांच

इंग्रज लोक राज्यप्राप्तीच्या उद्योगास लागले; तेव्हां पोर्तुगीझांप्रमाणें त्यांचाही जयच होत गेला. कोणत्याही राष्ट्रास स्थायिक राज्यव्यवस्थेची केवढी आवश्यकता आहे हें त्यावरून कळून येतें.

**२. व्यापार वाढविण्याच्या युक्त्या,–आरबांचा पाडाव.**—पोर्तुगीझ लोक हिंदुस्थानांत आले, तो वेळ त्यांस अतिशय फायदेशीर होता. त्या वेळीं मोगलांचें प्रबळ राज्य हिंदुस्थानांत स्थापन झालें नव्हतें; व जिकडे तिकडे अस्वस्थता व दांडगाई सुरू होती. (मुसलमानी रियासत पहा). तसेंच ज्या मलबार किनाऱ्यावर ते उतरले, ती जागाही त्यांस फार सोयीची होती. तो प्रदेश तुटक असल्यामुळें हिंदुस्थानांतील इतर भागांचें त्यांस साह्य नव्हतें व त्यांत काय चाललें आहे याची कोणास परवाही नव्हती. हजारों वर्षें परकीय व्यापाऱ्यांची हालचाल व देवघेव तेथें चालू असल्यामुळें, हे नवीन आलेले पोर्तुगीझ व्यापारी येथें राज्य कमावण्याच्या व स्वधर्मस्थापनेच्या उद्योगास लागतील असें तेथील लोकांस वाटलें नाहीं. क्रिस्ती, ज्यू, मुसलमान वगैरे अनेक परकीय व्यापाऱ्यांस आपल्या येथें नांदूं दिल्यापासून आपला फायदाच आहे असें त्यांस वाटे. हा समज पोर्तुगीझांच्या फार उपयोगी पडला. मलबार किनाऱ्यावरील सर्व राजे परकीयांस ममतेनें वागवीत असत. त्यांच्या धर्माचारांत हात न घालतां उलट ते त्यांस पूर्णपणें पाळूं देत. क्रिस्ती शकाच्या तिसऱ्या शतकांत दोन रोमन वकील मलबारांत ठेवून दिलेले होते.

सेंट टॉमस नांवाचा एक क्रिस्ती साधु सर्व हिंदुस्थानभर क्रिस्तीधर्म शिकवीत फिरत होता, व शेवटीं इ० स० ६८ त मद्रासेजवळ त्याचा वध झाला. पण त्याचे अनुयायी पूर्व व पश्चिम किनाऱ्यांवर पुष्कळ झालेले होते. याच क्रिस्ती लोकांस राजकीय हक्कांचे लेख करून दिलेले होते. मलबारांतील नायर लोकांच्या बरोबरीनें या

सेंट टॉमस क्रिस्त्यांस मान मिळत असे; व लष्करांतही त्यांचे लोक असत. विजयनगरच्या नोकरींत त्यांचा मोठा भरणा होता. सन १४४२ त विजयनगरच्या राजाचा मुख्य प्रधान ह्यांपैकींच एक क्रिस्ती होता. क्रिस्त्यांप्रमाणेंच मलबारांत मुसलमानांचेंही वजन विशेष होतें हें मागें सांगितलेंच आहे.

ह्या कारणांमुळें पोर्तुगीझ लोकांचा मलबारांत सहज प्रवेश झाला, व त्यांची व्यापारांत मोठी भरभराट झाली. पहिल्या खेपेसच त्यांनीं जो माल युरोपांत आणिला, त्याचें उत्पन्न खर्चाच्या साठपट ज्यास्त आलें. त्यावरून पोर्तुगालचा राजा व लोक ह्यांचें एवढें मोठें नशीब उघडल्याबद्दल युरोपचीं सर्व राष्ट्रें चकित झालीं. पोर्तुगीझ सरकारानें हा व्यापार आपल्याच ताब्यांत ठेविला खरा, तथापि कांहीं शरतीं-वर वाटेल त्या क्रिस्ती राष्ट्रास लिस्बन येथें आपलीं गलबतें पाठवून व्यापार करण्याची सवलत देत असत. ह्या सवलतीचा फायदा पहिल्या पन्नास वर्षांत इंग्रज व्यापाऱ्यांनीं पुष्कळ करून घेतला. पोर्तुगालच्या राजानें दोन चार वेळ हिंदुस्थानास आरमारें पाठवून दिल्यावर त्याची अशी खात्री झाली, कीं मलबार किनाऱ्यावरील पांच सहा बंदरांत माल भरून युरोपांत आणल्यास आपला व्यापार शांतपणें चालेल. परंतु असें न करितां मुख्य बंदर जें कालिकोट तेथेंच सर्व व्यापार करावयाचा असेल, तर आरब लोकांवर शस्त्र धरून त्यांचें प्राबल्य नाहींसें केलें पाहिजे. ह्यांपैकीं दुसरा मार्ग इमॅन्युअल राजानें स्वीका-रिला. पोर्तुगीझ सरदार काब्राल ह्यानें कोचीन येथें पहिली वखार स्थापन केली. तिच्या संरक्षणार्थ वास्को ड गामाच्या हाताखालीं राजानें एक आरमार पाठविलें. वास्को ड गामाची पहिली सफर फक्त नवीन प्रदेश शोधून काढण्यापुरती होती. पण ह्या दुसऱ्या सफरींत त्याला मलबारकिनाऱ्यावर आपल्या व्यापाराची कायमची स्थापना करावयाची

होती. हीं दोनहीं कामें त्यानें पूर्णपणें तडीस नेलीं. इ. स. १५०२ त ह्यानें कालिकोटचा पाडाव करून आरबांचें एक आरमार नाहींसें केलें; व कोचीन, काननूर, कोलम आणि भटकळ ह्या चार बंदरांत व्यापार सुरू करून, त्यांपैकीं दोन ठिकाणीं आपल्या वखारी ठेविल्या. त्या वखारींच्या संरक्षणाकारितां कांहीं जहाजें त्यानें ठेवून दिलीं. काननूरच्या वखारींत त्यानें कांहीं तोफा व दारूगोळा ठेवून दिला होता. परंतु हा सर्व विजयाचा प्रकार त्याच्या दुष्ट व क्रूर कृत्यांनीं संपूर्ण झांकून गेला आहे. पुढील दोन तीन वर्षांत पोर्तुगीझ लोकांनीं उघडपणें युद्धाची तयारी करून आरबांचा नाश केला व मलबार किनाऱ्यावर आपला बंदोबस्त केला.

एवढ्या अल्पावधींत एखाद्या राष्ट्रास एवढा प्रचंड विजय प्राप्त झाल्याचें इतिहासांत फारसें उदाहरण नाहीं. नवीन देश शोधून काढल्याबद्दल जो आनंद झाला त्याच्या भरांत पोर्तुगीझ राष्ट्राची विलक्षण शक्ति जगाच्या निदर्शनास आली. ह्या योगानें मुसलमानांचाच व्यापार बुडाला असें नाहीं, तर व्हेनिस, जिनोआ वगैरे भूमध्यसमुद्रावरील राष्ट्राचाही व्यापार बुडाला. हिंदुस्थानांत पोर्तुगीझांचें राज्य कायम झालें, ही एक मोठीच नवीन जबाबदारी इमॅन्युएल राजाच्या अंगावर येऊन पडली. हिंदुस्थानांतील राज्य कायमचें राखावयाचें असेल तर तेथील राज्यव्यवस्था दरएक गव्हर्नराच्या मर्जीप्रमाणें फिरवून उपयोगी नाहीं, ती कायमचीच ठरविली पाहिजे, असें राजास कळून आल्यावरून त्यानें आलमीडा ह्यास गव्हर्नर नेमून पाठविलें व ( १ ) आफ्रिकेच्या किनाऱ्यावर आपलीं मजबूत ठाणीं ठेवून तेथें आपला पाया कायम करावा, ( २ ) मलबारकिनाऱ्यावरील बंदरें आपल्या ताब्यांत आणून तेथें आपल्या मजबूत वखारी ठेवाव्या, व ( ३ ) आरबांची समुद्रावरील सत्ता तांबड्यासमुद्रांतच मोडून

टाकावी, अशीं तीन कामें त्यास सांगण्यांत आलीं. हिंदुस्थानच्या व्यापाराकरितां आजपर्यंत जे प्रयत्न युरोपियन राष्ट्रांनीं केले, त्यांत तांबडासमुद्र व त्याच्या दोनही कांठांवरील प्रदेश येथें मुसलमानांचीच सरशी राहिली. पण भूमध्यसमुद्रांत स्पेन व पोर्तुगाल यांस अखेरीस यश आलें. पुढें हा झगडा आरबीसमुद्रांत व्हावयाचा होता. ह्या झगड्यांत आपला टिकाव लागावयाचा नाहीं असें पोप व कित्येक क्रिस्ती राष्ट्रांस वाटत होतें. पण इमॅन्युएल राजाला मात्र तसें वाटलें नाहीं. त्यानें धिटाईनें आपले प्रयत्न चालविले व अखेरीस त्यास यश आलें. आलमीडा व त्याचा पराक्रमी मुलगा ह्यांनीं आरबीसमुद्रावर मुसलमानांचा चांगलाच पराभव केला व पुढें शंभर वर्षेंपावेतों तो समुद्र पोर्तुगीझांच्याच ताब्यांत होता. मुसलमानही इजिप्ट जिंकण्याच्या कामास लागल्यामुळें, त्यांस आरबीसमुद्रावर येण्यास फावलें नाहीं.

एवढ्यानेंच इमॅन्युएल राजाचें समाधान झालें नाहीं. ह्या कामांत त्यानें विलक्षण धूर्तता दाखविली. सुदैवानें त्याची कारकीर्द वरीच वर्षें टिकली. इ. स. १५०० पासून १५०५ पर्यंत पहिल्या पांच वर्षांत मलबार किनाऱ्यावरील व्यापार त्याच्या ताब्यांत आला; पुढील पांच वर्षांत आरबीसमुद्रावर त्याची सत्ता कायम झाली; व त्यापुढील पांच वर्षांत आल्बुकर्कच्या हस्तें पश्चिम किनाऱ्यावर त्याचें राज्य स्थापन झालें.

आल्बुकर्क ह्यानें स. १५०३–४ त पहिली सफर हिंदुस्थानांत केली, व येथील स्थितीचें सूक्ष्म निरीक्षण करून परत गेल्यावर सर्व हकीगत राजास सांगितली. पुनः स. १५०७त तो तांबड्या समुद्राचें नाकें मुसलमानांचे ताब्यांतून घेण्यासाठीं एका आरमारावर इकडे आला. प्रथम त्यानें सोकोट्रा काबीज केलें. तेथें मुख्य वस्ती मुसलमानांची असून हिंदुस्थानांतल्याप्रमाणें थोडेसे क्रिस्तीही तेथें होते. बेट काबीज

केल्यावर मुसलमानांच्या सर्व जमिनी घेऊन त्यानें क्रिस्ती रहिवाशांस दिल्या; व त्यांस रोमन कॅथोलिक पंथाची दीक्षा दिली. पुढें ओर्मझ येथें आपला शह बसवून तो मलबार किनाऱ्यावर आला. तेथें स. १५०९त आलमीडाकडून त्यास गव्हर्नरची जागा मिळाली. हा कारभार त्यानें सहा वर्षे केला. ह्या सहा वर्षांत मलबार किनाऱ्यावर पोर्तुगीझ सत्ता कायमची स्थापन झाली. वास्तविक आल्बुकर्कचा झगडा फक्त मलबार किनाऱ्यावरील प्रांताकरितां नव्हता, तर सर्व मुसलमानांशीं होता. क्रिस्ती व मुसलमान ह्या दोन धर्मांमध्यें पूर्वी जरुसलेमबद्दल जो झगडा झाला, तशाच प्रकारचा हा झगडा त्याच दोन धर्मांमध्यें व्यापारप्राप्तीबद्दल होता. ह्या झगड्याची कल्पना आल्बुकर्कच्या मनांत इतकी बिंबली होती कीं, इजिप्टच्या सुलतानाचा प्रदेश नापीक व्हावा म्हणून नील नदीचा प्रवाह फिरवून तांबड्या समुद्रांत आणावयाचा, व मक्का येथील महंमदाची कबर खोदून मुसलमानांचा पाया नाहींसा करावयाचा, अशा विलक्षण खुळ्या कल्पनाही त्याच्या मनांत घोळत होत्या. परंतु हिंदुस्थानच्या कारभारासंबंधीं त्याच्या कल्पना योग्य व शक्य होत्या. तांबडा समुद्र व इराणी अखात ह्यांवरील व्यापाराचीं नाकीं पोर्तुगालच्या ताब्यांत आणणें, मुसलमानांचा मलबारकिनाऱ्यावरील व पूर्वसमुद्रांतील व्यापार बंद करणें ह्या मुख्य गोष्टी त्यास करावयाच्या होत्या. गोवा घेऊन त्यानें आरबी समुद्रांतील मुसलमानांचा संचार बंद केला; तसेंच ओर्मझ व मलाका काबीज केल्यानें मुसलमानांस इकडे येण्यास वावच राहिला नाहीं. पोर्तुगालसारख्या सुमारें दहा लाख वस्तीच्या लहानशा क्रिस्ती राष्ट्रानें आफ्रिकेपासून मलाकापावेतों सात आठ हजार कोस लांबीचा व आफ्रिकेच्या दक्षिण टोंकापासून तांबड्या समुद्रापर्यंत दोन हजार

कोस रुंदीचा किनारा आपल्या ताब्यांत घ्यावा व शंभर वर्षे सर्व मुसलमानांशीं टक्कर मारावी हें लहान कृत्य नव्हे.

हा झगडा दोन धर्मांचा होता. आल्बुकर्कच्या मनांत तर मुसलमानी धर्म नाहींसा करून कॅथोलिक धर्म वाढवावयाचा ही गोष्ट एकसारखी घोळत होती. मुसलमानांच्या मनांतही हाच प्रकार होता. हिंदुस्थानांतील मुसलमान, इजिप्टमधील मुसलमान व शेवटीं सर्व तुर्क लोक ह्या मोठ्या झगड्यांत सामील झाले होते. आल्बुकर्क मरण पावल्यावर कित्येक वर्षेंपर्यंत तुर्क लोकांनीं पोर्तुगीझांचा चांगलाच समाचार घेतला. दीव, मस्कत, मलाका, वगैरे ठिकाणीं पूर्वेकडील समुद्रांत तुर्क आरमारें एकसारखीं पोर्तुगीझांशीं लढत होतीं. ह्यांत व्हेनिशन लोकांची मदत आरबांस होती; कारण आरबांचा कायरो येथील व्यापार बंद पडतांच व्हेनिशन लोकांचें नुकसान होऊन मुसलमानांच्या साह्यानें ते पोर्तुगीझांस शह देणार होते. स्वार्थाची गोष्ट आली म्हणजे स्वजाति व स्वधर्म कसा बाजूस राहतो, ह्याचें हें एक उदाहरण आहे. स. १५८०त स्पेन व पोर्तुगाल हे देश एकत्र झाले, तेव्हांच क्रिस्ती लोकांची थोडीशी सरशी झाली. सारांश, हा झगडा शंभर वर्षांवर चालू होता. युरोपांत जो क्रिस्तीमुसलमानांचा झगडा चालू होता, त्याचीच ही हिंदीमहासागरांतली आवृत्ति होती. ‘माझ्याजवळ मागा म्हणजे मी तुम्हांस सर्व भिन्नधर्मी लोक व पृथ्वीवरील दूरदूरचे प्रदेश तुमच्या ताब्यांत देईन,’ असे जे बायबलांत शब्द आहेत ते आतां खरे झाले असें सोळाव्या शतकांतील लोकांस वाटलें. हिंदुस्थानांत मुसलमानांचें राज्य स्थापन झालें, तेव्हां ते लोक आपला धर्म येथें स्थापन करण्याकरितां आले व त्यांनीं येथें नानाप्रकारचे जुलूम केले हें मुसलमानांच्या इतिहासांत आपणांस ठाऊक आहे. पण क्रिस्ती लोक तितके कडवे नाहींत; व धर्माच्या कामांत ते लोकांवर जुलूम

करणारे नाहींत असें कोणास वाटत असेल, तर त्या वेळचा इतिहास आपणांस समजला नाहीं असें म्हणावें लागेल. धर्माचा पडदा मध्यें ठेवून व्यापार व संपत्ति मिळविण्याचा हेतु क्रिस्ती राष्ट्रांच्या मनांत पार पाडावयाचा होता. इमॅनुएल राजानें स. १५०० त काब्रालच्या आरमाराबरोबर कित्येक पाद्री इकडे पाठविले व त्यांस खालील ताकीद दिली. मुसलमानांवर व परधर्मीयांवर तलवारीचा हल्ला करण्यापूर्वी, ह्या पाद्र्यांनीं आपली धर्माची गोळी त्यांजवर प्रथम चालवून पाहवी, म्हणजे त्यांनीं त्यांस बायबलाचा उपदेश करून, त्यांस क्रिस्तीधर्म स्वीकारण्यास सांगावें; व ही गोष्ट ते नाकबूल करतील तर, व व्यापाराची घडामोड करण्यास उत्सुक नसतील, तरच त्यांजवर तलवार व बंदुकीची गोळी यांचा प्रयोग करून त्यांचा पाडाव करावा. धर्माचें व सुधारणेचें नांव पुढें करून युरोपियन राष्ट्रें सर्व पृथ्वीवर दिग्विजय गाजवीत आहेत, पण त्याच्या मुळाशीं केवळ स्वार्थ आहे हें हंटरसारखे इतिहासकारही कबूल करितात.

सर्व व्यापार आपल्याच ताब्यांत ठेवण्याची पोर्तुगीझ लोकांची पद्धत खालीं लिहिल्याप्रमाणें होती. एकाद्या राजास किंवा अधिकाऱ्यास जिंकल्यावर त्यानें पोर्तुगालच्या राजास शरण जाऊन वखार व किल्ला बांधण्यास जागा द्यावी, व सालिना खंडणी देऊन शिवाय फौजेचा खर्च द्यावा, अशा प्रकारचे तह जिंकलेल्या राजापासून पोर्तुगीझ अधिकारी सामान्यतः करून घेत असत. तांबडया समुद्रापासून तों मोलक्कापर्यंतच्या किनाऱ्यावरील सर्व अधिकाऱ्यांशीं अशा प्रकारचे तह त्यांनीं केलेले आहेत. ह्या तहाचा परिणाम असा होई, कीं बंदरांत येणाऱ्या पोर्तुगीझ जहाजांवर करांची माफी असे; व तथील जकातीचा वसूल पोर्तुगालच्या राजाकरितां घेण्यांत येई. हा सामान्य प्रकार होता, तरी प्रसंगोपात ह्यास अपवादही अनेक असत. कालिकोटचा सामुरी

प्रबळ असल्यामुळें त्यास ताब्यांत आणण्यास पुष्कळ वेळ लागला. कोचीनच्या राजास आरंभीं गोड गोड वचनें देऊन शेवटीं त्यांनीं त्यास तोंडघशीं पाडिलें. कोलम येथें तर त्यांस मुळींच प्रयास पडले नाहींत. इराणच्या अखातांतील ओर्मझ असेंच त्यांच्या ताब्यांत आलें. एडनवरही थोडा बहुत शह बसला; व हें स्थळ अनेक वेळां पोर्तुगीझ व मुसलमान ह्यांच्याकडून एकमेकांकडे गेलें. ह्याप्रमाणें पश्चिमेकडे मुसलमानांचें थोडेंबहुत प्राबल्य होतें. पण पूर्वेकडे पोर्तुगीझ व्यापार चांगला चालला. मलबारकिनाऱ्यावरील सर्व मिरीं व सुंठ त्यांस मिळूं लागलीं. सिलोनची दालचिनी व पूर्वेकडील द्वीपकल्पांतील लवंग व जायपत्री हे जिन्नस त्यांच्या ताब्यांत आले. सन १५६४त मोलक्काचा सर्व प्रांत पोर्तुगीझ राज्याखालीं आला.

पोर्तुगीझांनीं इकडील राजांशीं केलेले तह पुढें इंग्रज ईस्ट इं. कंपनीस बरेच नडले; कारण पोर्तुगीझांस दुखावल्याशिवाय कंपनीस आपले व्यवहार तडीस नेतां येईनात. पोर्तुगीझांची सगळी भिस्त आरमारावर असल्यामुळें, इकडील राजांनीं लढाऊ जहाजें व दारूगोळा बाळगूं नये असें त्यांच्या तहांत नेहमीं एक कलम असे.

३. **पोर्तुगीझ व्यापाराची किफायत.**—हिंदुस्थानांत राज्य स्थापन करून तें राखण्याच्या उद्योगास लागणारा खर्च भागविण्याचें सामर्थ्य पोर्तुगीझ राष्ट्रास नव्हतें. पण व्यापारांत त्यास विलक्षण किफायत होत असल्यामुळें त्यास अशीं कामें करतां आलीं. ह्या किफायतीचा अंदाज करणें कठीण आहे. आरमाराचा खर्च तरी केवढा होता पहा. शंभर वर्षें ८०६ गलबतें या कामांत खपत होतीं. एक गलबत बांधण्याचा व त्यावरील कप्तान व खलाशी ह्यांचा एका सफरीचा खर्च सुमारें ४०७६ पौंड म्हणजे पंनास हजार रुपये असे. वरील संख्येंत हिंदुस्थानांत बांधिलेल्या व शत्रूंपासून काबीज केलेल्या गलबतांचा समावेश

नाहीं. तीं धरल्यास पोर्तुगीझ व्यापाराच्या ह्या शंभर वर्षांत एक हजार गलबतें खपत होतीं असें म्हणतां येईल. दरसाल वीस गलबतें भरून माल पोर्तुगाल देशास येत असे. वास्को ड गामाच्या पहिल्याच सफरीचें उत्पन्न खर्चाच्या साठपट आलें असें लिहिलेलें आहे. काब्रालनें स. १५०१ त मसाले, सुगंधी द्रव्यें, चिनी भांडीं, मोतीं व जडजवाहीर वगैरे माल भरून आणिला. अशा प्रकारचा मौल्यवान माल दरखेपेस किती येत असे ह्याची गणतीच नाहीं. त्याचें थोडेंबहुत वर्णन दर-सफरींत आलें आहे. ह्याशिवाय बंदरोबंदरीं व्यापार चाले तो वेगळाच. ह्या व्यापारांत किफायतीचा मुख्य जिन्नस अफू असे. एका गलबतांतून युरोपांत जो माल जाई, त्याचें उत्पन्न सरासरी अदमासानें एक लक्ष पौंड म्हणजे पंधरा लक्ष रुपये असे. ह्यांत मोतीं किंवा जवाहीर धरलेलें नाहीं; कारण अस्सल यादीशिवाय जडजवाहिराची किंमत गणतां येणें शक्य नाहीं. तसेंच गोव्यापासून चीनजपानपावेतों माल नेण्याचें एका गलबताचें भाडेंच २२॥ हजार पौंड म्हणजे सव्वादोन लक्ष रुपये होई; व गोव्यापासून मोझांबीक पावेतों ५४ हजार रुपये होई. ह्या शिवाय खासगी व्यापाराचें उत्पन्न येई तें निराळेंच. चांचेपणाचें उत्पन्न व परकीयांचीं पकडलेलीं गलबतें व माल लिलांवानें विकल्याचें उत्पन्न सांगतां येण्याजोगें नाहीं. पण एका कप्तानानें दोन वर्षांच्या अवधींत अशा धंद्यावर ११ लक्ष रुपयांची कमाई केल्याचा दाखला आहे. किनाऱ्यावरच्या रजवाड्यांकडील खंडण्या, व गोवा, दीव आणि मलाका येथील जकातीचें उत्पन्न दरसाल १२ लक्ष रुपये असे. खंडणी, जकात व सरकारी जहाजांनीं मिळविलेली लूट ह्यांत पोर्तुगालच्या राजाचा सालिना हिस्सा २२॥ लक्ष रुपये असे; ह्यापेक्षां तो ज्यास्त असला पाहिजे होता, पण अधिकारी मध्यें लबाडी करीत. शिवाय पोर्तुगालच्या राजास हिंदुस्थानांतून दरसाल सुमारें साडेपंधरा

लक्ष रुपये वसूल येत असे.[1] ह्यापेक्षां ज्यास्त रक्कम पोर्तुगीझ सरकारास मिळाली असती, पण अनेकांच्या हातून तो व्यवहार घडावयाचा असल्यामुळें, त्यांत प्रत्येकाचा हिस्सा असे. शिवाय आपल्या लोकांनीं व्यापार वगैरे करून फायदा करावा अशी पोर्तुगीझ सरकारचीही इच्छा होती परंतु अशा व्यापारांत अनेक संकटें असल्यामुळें सरकारच्या मदतीशिवाय एखाद्या नवीन ठिकाणीं खासगी व्यापार सुरू करणें शक्य नव्हतें. मसाल्याच्या व्यापाराचा मक्ता, दरसाल साडेचार लक्ष रुपये घेण्याच्या करारानें व इतर व्यापार १९ लक्ष घेण्याच्या करारानें, पोर्तुगालच्या राजानें व्यापाऱ्यांस दिलेला होता. ह्या रकमा वरील २२॥ लक्षांत मिळविल्या असतां राजाची सालिना प्राप्ति ४२ लक्ष होत असे. इतका फायदा होई तो सर्व लष्कराकडे खर्च होई. शिवाय खासगी व्यापारास सरकारांतून उत्तेजन मिळाल्यामुळें, त्यांजवर सरकारची देखरेख न राहतां, स्वतःच्या फायद्याकरितां ते सरकारचें व लोकांचें वाटेल तें नुकसान करीत असत. सरकाराकरितां बंदरोबंदरीं माल खरेदी करणें तो ते लोक वाटेल तितका महाग घेत, व स्वतःचा माल मात्र लोकांवर जुलूम करून स्वस्त घेत. 'जोंपर्यंत कप्तान व इतर अधिकारी यांस खासगी व्यापार करण्याची मुभा आहे, तोंपर्यंत तुमच्या फायद्याकडे कोणीच लक्ष देणार नाहीं,' अशा आशयाची पत्रें इकडून पोर्तुगालच्या राजास वारंवार जात असत. कोणत्याही दरबारांत पोर्तुगीझ वकील ठेविला असतां तो सदा आपली पिशवी भरण्याचे नादांत असल्यामुळें पोर्तुगीझ सरकारचें वजन राहत नसे. गलबतांचे अधिकारी प्रथम आपला माल विकून मग सरकारी मालाची व्यवस्था करीत.

---

१ टीप.—ह्या पुस्तकांतील आंकडे दहा रुपयांस एक पौंड ह्या भावानें भरले आहेत.

सन १६३०त एका कप्तानानें मलबारांतून बंगाल्यांत सफर केली, तींत त्याचें स्वतःचें उत्पन्न २४,५०० रु० व सरकारचें उत्पन्न फक्त ७८० रुपये झालें. अशीं उदाहरणें पुष्कळ आहेत. सहज एकाद्या सफरींत नशिबानें कोणास इतका फायदा होई कीं त्याचें जन्माचें दारिद्र्य जाई. केव्हां केव्हां कसुरीबद्दल कोणाचा पगार अटकावला गेल्यास, तो पुढील सफरींत आपलें नुकसान इतकें भरून काढी, कीं पगार अटकाविल्याबद्दल त्यास खंती वाटत नसे. एकाद्या भांडग्या नातेवाइकानें अगर राखेनें मागणी केली असतां, त्यांचें तोंड बंद करण्यास पोर्तुगालच्या राजास असली एकादी सफर पुरे होत असे. अशा गोष्टींनीं राज्याचा लवकर नाश झाला. व्यापारांत फायदा होतो, लढाईंत विनाकारण खर्च होऊन जीव जाण्याचा संभव आहे, असे विचार प्रत्येकाच्या मनांत आल्यामुळें, शत्रु आला असतां राज्याचा बंदोबस्त करण्यास कोणी तयार नसे. अशा स्थितींत आरंभाचा भपका संपल्यावर गव्हर्नरचेंही काम करण्यास कोणी मनुष्य धजत नसे. खासगी व्यापार बंद करण्याचे पोर्तुगीझ सरकारनें थोडे प्रयत्न केले असें नाहीं, पण वाळूच्या बांधाचें एक भोंक बंद करावें, तों दुसरें पडतें तशांतला प्रकार झाला. प्रत्यक्ष लिस्बन येथील इंडियन कचेरींत जो अन्याय चाले तो सुद्धां पोर्तुगीझ सरकारास बंद होईना, मग हिंदुस्थानांतला कोठून होणार ?

स्पेन व पोर्तुगाल हे दोन देश एकत्र झाल्यापासून किंवा स. १५४८त डॉम कॅस्ट्रो मरण पावला तेव्हांपासून हिंदुस्थानच्या पोर्तुगीझ लोकांची भरभराट खुंटली. आल्बुकर्कसारखा धोरणी व पराक्रमी पुरुष इकडे कोणी आला नाहीं; किंवा त्याच्या भव्य कल्पना अंमलांत आणून त्यानें घातलेल्या पायावर मोठी इमारत उभारण्याचें कामही कोणीं केलें नाहीं. स. १५९५ पर्यंत व्यापारामध्यें त्यांची सरशी होती. पण स. १५९५त

डचलोक मध्यें आले; व पोपानें जी मर्यादा पोर्तुगीझांस घालून दिली होती, ती त्यांनीं मोडिली तेव्हांपासून व्यापारांतही ते लोक खालावले.

पोर्तुगीझांचा व्यापार मोडण्याचीं कारणें अनेक झालीं. पहिलें, स्पेन आणि पोर्तुगाल हीं दोन राष्ट्रें स. १५८०त एका राजाच्या ताब्यांत गेलीं, तरी दोहोंचा कारभार अगदीं पृथक्पणें चालावा असें ठरलें होतें. स. १६०४त इंग्लंड व फ्रान्स ह्यांचा तह झाल्यावर हॉलंड व स्पेन ह्यांचें युद्ध चालू झालें, त्यांत हिंदुस्थानांतील व्यापाराची पोर्तुगालची सर्व किफायत स्पेनकडून खर्च होऊं लागली; व मालाची खरेदी करण्यास पैसा उरेनासा झाला. दुसरें डच आणि इंग्रज पूर्वेकडील समुद्रांत संचार करूं लागल्यामुळें पोर्तुगीझांचें नुकसान होऊं लागलें. तें बंद करण्यासाठीं इंग्रज व डच ह्यांजप्रमाणें पोर्तुगीझांनींही कंपनी स्थापण्याचा स. १६३०त प्रयत्न केला; पण तो सिद्धीस गेला नाहीं. स. १६३५त पुनः एक असाच प्रयत्न विफल झाला. ह्याप्रमाणें सरकारचे प्रयत्न विफल होऊं लागले, म्हणून खासगी व्यापार तरी वाढावा ह्या हेतूनें दालचिनीशिवाय इतर जिनसांचा व्यापार पाहिजे त्यानें करावा असा हुकूम स. १६४२त पोर्तुगीझ सरकारानें काढिला; व धर्मसंबंधांत व्यापारी लोकांवर जुलूम झाला तर, त्यांची मिळकत जप्त करूं नये असाही हुकूम फरमाविण्यांत आला. पण ह्या युक्त्यांचा कांहीं एक उपयोग झाला नाहीं. स. १६५३तील एका लेखावरून गोव्यास जकातीचें उत्पन्न मुळींच नव्हतें असें दिसतें.

पुढें स. १६९९त गोव्यास एक कंपनी स्थापण्यांत आली; पण स. १७०१त मोंबासा पोर्तुगीझ लोकांच्या ताब्यांतून गेल्यामुळें, ती मोडली. असेच आणखी कांहीं प्रयत्न झाले. काउंट एगा हा इ. स. १७५६ पासून स. १७६७ पर्यंत पोर्तुगीझ व्हाइसरॉय होता, त्यानें ह्या व्यापाराचें नुकसान भरून काढण्याचे अनेक प्रयत्न केले.

४. **पोर्तुगीझ लोकांचा ऐषआराम.**—पोर्तुगीझांचें हिंदुस्थानांतील वैभव क्षणभंगुर होण्यास अनेक कारणें घडून आलीं. तीं समजून घेण्यासारखीं आहेत. त्यांत गोव्यास व इतर ठिकाणीं त्यांची राहणी व व्यवस्था कशी होती हें पाहिलें पाहिजे.

पोर्तुगीझ लोकांच्या वेळचें गोव्याचें वैभव हल्लीं नाहींसें झालें आहे. हल्लींचें शहर हें नवीन आहे. त्यासच पणजी असें म्हणतात. ह्या नव्या शहरांत गव्हर्नराची वस्ती स. १७५९त झाली. जुन्या शहराचें बंदर नदीच्या गाळानें भरून गेल्यामुळें हें नवें वसविण्यांत आलें. त्या जुन्या गोव्याचें वैभव पोर्तुगीझांच्या ऐन अमदानींत अप्रतिम होतें. एलिझाबेथ राणीच्या वेळेस लंडनच्या व्यापाऱ्यांस तें 'सोन्याचें गोवा' ह्या नांवानें माहीत होतें. "ज्यानें गोवा पाहिलें, त्यानें लिस्बन पाहण्याची जरूर नाहीं," अशी पोर्तुगीझ भाषेंत म्हण आहे. व्यापारानें तें धनाढ्य झालें असून शिवाय लष्करी भपका व धर्माधिकाऱ्यांचा डामडौल तेथें अतोनात माजला होता. लोक आपलीं सर्व कामें गुलामांकडून करून घेत. तसेंच घरंदाज पोर्तुगीझानें कोणताही धंदा करणें प्रतिष्ठित समजलें जात नसे, त्यांच्या बायकांनींही घरांतली कामें करणें प्रशस्त नसे. लष्कर, धर्मखातें व सरकारी नोकरी व थोडाबहुत समुद्रावरील व्यापार, ह्यांशिवाय इतर कोणताही धंदा पोर्तुगीझ लोक स्वतः करीत नसत. लष्करी डामडौलाच्या भरांत त्या लोकांस अनेक उपयुक्त धंद्यांचा तिरस्कार वाटूं लागल्यामुळें, ते आळशी व व्यसनाधीन झाले. आळशी पुरुषांच्या झुंडी रस्त्यांतून व जुगारीच्या अड्ड्यांत हिंडतांना दिसत. आळशी बायकांचे समाज पडद्यांत बसून खुशालचंद बनले होते. जुगाराच्या अड्ड्यांपासून सरकारास कर मिळत असून तेथें सर्वप्रकारची चैन चाले. नाच, गाणें, जादुगिरी,

नट, खुषमस्करे इत्यादिकांचा तेथें सुकाळ असे. बायकांस पुरुषांत जाण्याची मनाई असल्यामुळें, त्या पडद्यांत बसून, गाणें, खेळणें, भांडणें, गप्पा मारणें, खुषमस्कऱ्यांची व गुलामांची थट्टा करणें इत्यादि प्रकारच्या चैनींत कालक्रमणा करीत, व उष्णतेच्या दुःसह प्रखरपणामुळें केवळ अर्धनग्न राहत असत. अर्थात् युरोपियन जनानखानाच तेथें निर्माण झाला. त्या स्त्रिया कपटविद्येंत निष्णात झाल्या. नवऱ्यांशीं कपट लढवून अगर त्यांस गुंगीचें औषध पाजून आपला प्रीतिव्यवहार यथेच्छ चालविण्यांत त्या स्त्रियांची मजल इतकी वाढली कीं, 'गोवेकरीण' हा शब्द अद्यापि उच्चारिला तरी त्यांत विषयलंपट, आळशी, दुर्व्यसनी वगैरे प्रकारचा बीभत्स अर्थ गर्भित होतो. प्रार्थनेकरितां मंदिरांत वगैरे जाणें झाल्यास ह्या बाया मोठा थाट करीत असत. त्यांचा पोषाख भरगच्चीचा असून, मोत्यें, हिरे, माणकें वगैरेनीं मढविलेला असे. डोक्यांत, दंडांत, हातांत आणि कमरेंत नाना प्रकारचे मोलवान दागिने असत; व डोक्यावरून पायांपर्यंत त्या अत्यंत पातळ वस्त्राचा बुरखा घेत. अशा थाटानें त्या भरगच्चीच्या म्यान्यांत बसून व बरोबर पाहरा घेऊन मंदिरांत जात. पायांत मोजे न घालतां मोत्यांनीं मढविलेले सपाट ( स्लिपर्स ) घालीत; त्याची मागची टांच सुमारें सहा इंच तरी उंच असे. त्या गालांस रंग लावीत असत. मंदिरांत पोंचल्यावर एक-दोन नोकर त्यांस धरून आंत नेत, कारण उंच टांचामुळें त्यांस मुळीं चालतांच येत नसे. ह्याप्रमाणें मंदिरांतलीं दहा चाळीस पावलें चालण्यास त्यांस निदान पंधरा मिनिटें तरी लागत; अशा मंदगतीनें चालणें हें मोठ्या सभ्यपणाचें लक्षण समजत.

पुरुषांचा थाटही कांहीं विलक्षण असे. त्यांच्या गळ्यांत रुद्राक्षांच्या वगैरे माळा असत. सुंदर पोषाख केलेल्या गुलामांचा तांडा छत्री, हत्यारें वगैरे घेऊन त्यांचे बरोबर चाले. सोन्याचांदीनें मढविलेले खोगीर, चांदीच्या

हिरेजडित लगामी, घंटा, चित्रविचित्र रंगीत रिकिबी असा त्यांच्या घोड्यांचा साज असे. गरीब लोकही नाना युक्त्या करून श्रीमंतांचा थाट करण्यास झटत असत. असे गरीब एकत्र राहत असल्यास सर्वांस मिळून एकच उंची पोषाख असे; हा पोषाख ते प्रसंग पडेल तसा आळीपाळीनें वापरीत, व रस्त्यांतून जातांना छत्री धरण्यापुरता एखादा नोकर मजुरी देऊन तरी ठेवीत.

असा ऐषआराम वाढल्यामुळें, गोव्यास उतरती कळा लागल्यावर, तेथील लोकांचें जे हाल होऊं लागले ते लिहितां येत नाहींत. टॅव्हर्नियर स. १६४८ त लिहितो कीं, " पूर्वीचीं श्रीमंत कुटुंबें हल्लीं भिक्षा मागूं लागलीं आहेत, तरी त्यांनीं आपला थाट टाकून दिलेला नाहीं. पोर्तुगीझ बाया पालखींत बसून भिक्षा मागण्यास जातात; व बरोबरचे नोकर आंत जाऊन भिक्षा गोळा करितात. " ज्या ज्या ठिकाणीं पोर्तुगीझांनीं राज्य कमाविलें, तेथें सर्वत्र असाच थाट उत्पन्न झाला; व त्याचा परिणामही तोच झाला. एकंदरींत पोर्तुगीझ राष्ट्र लहान असल्यामुळें तिकडून इकडे पुरेसे लोक येत नसत. पहिल्या शेंदोनशें वर्षांत फार तर आठ हजार पोर्तुगीझ लोक इकडे आले असतील. एवढ्याशा लोकांनीं इकडे राहून आपला राष्ट्रीय बाणा कायम ठेवणें शक्य नव्हतें. एतद्देशीय लोकांस फौजेंत ठेवण्याची जरूर त्यांस पहिल्यापासूनच भासूं लागली. ह्या लोकांस ते थोडीबहुत कवाईत शिकवून तयार करीत. आरंभींच्या मोठमोठ्या लढायांत एतद्देशीय फौज हजार दोन हजारांपेक्षां ज्यास्त कधींच नव्हती. हळूहळू ही संख्या त्यांनीं वाढविली. घोडेस्वारांत युरोपियन लोक असत, व पायदळ बहुतेक इकडचें असे. त्या वेळीं गुलामांची किंमत फार कमी पडे. बंगाल्यांत एका पुरुषास ७ रुपये ( १४ शिलिंग ) पडत; व स्त्री तरुण व सुंदर असल्यास ह्याच्या दुप्पट किंमत पडे. मानवी

प्राण्याची किंमत इतकी हलकी असावी काय ! ! न्यूनो डा कुन्हा ह्यानें सन १५३०त एडनवर स्वारी केली, तेव्हां त्याजबरोबर ४०० जहाजें असून, तीं बहुतेक लहान व इकडे तयार झालेलीं होतीं, व ३६०० पोर्तुगीझ शिपाई, १४६० पोर्तुगीझ खलाशी, २००० एतद्देशीय शिपाई व ५००० एतद्देशीय खलाशी व ८००० गुलाम एवढी फौज त्यांत होती. एवढी मोठी पोर्तुगीझ फौज कधींच बाहेर पडली नव्हती. पोर्तुगीझ लोक पायदळांत नोकरी करण्यास नाखूष असत. म्हणून आपल्या भरंवशाची लोकसंख्या वाढविण्याकरितां अल्बुकर्कनें युरोपियन पुरुषांचीं एतद्देशीय स्त्रियांबरोबर लग्नें लावण्याची युक्ति काढिली. अशीं लग्नें लावणारांस बक्षिस मिळे व पुरुषांस नोकरी मिळे. अशा रीतीनें हाफ्-कास्ट म्हणजे अर्धबाटगी प्रजा पुष्कळ वाढली. परंतु त्यामुळें उत्पन्नापेक्षां खर्च ज्यास्त वाढला. तरी ही व्यवस्था कायम ठेवण्याबद्दल धर्माधिकाऱ्यांचा फार आग्रह असे. हे अर्धबाटगे लोक विनाकारण घमेंडखोर व आळशी असत व त्यांस नोकऱ्या देऊन पोषण्याचा खर्च सरकारावर पडे. पुढें पुढें सरकारांत पैशाची तूट पडूं लागली; व पोर्तुगीझ लोक व त्यांची बाटगी प्रजा म्हणजे एक बंडखोर लष्करच होऊन बसलें. ते आपल्या बंदुकी राजे लोकांस विकीत; व पोट भरण्याकरितां वाटेल तें नीच कृत्य करीत. "हे लोक रात्रंदिवस दाराशीं येऊन भिक्षा मागतात; एवढेंच असतें तर हरकत नव्हती, पण हे आमच्या दाराशीं न येतां मुसलमानांच्या दाराशीं जाऊन भिक्षा मागतात; तर कसेंही करून अशा लोकांस लष्करी नोकर समजून पगार चालू करावा." अशी शिफारस सन १५४८त गोव्याच्या सरकाराकडून पोर्तुगालच्या राजाकडे गेली होती. पण त्यांच्या हातांत पैसा पडल्याबरोबर तो ते लगेच जुगारांत उडवून टाकीत. लष्करांतील अंमलदार पोर्तुगीझ असत. पण एतद्देशीय ख्रिस्ती लोकांसही लष्करांत

मोठ्या जागा मिळत. त्या वेळीं कवाईत व शस्त्रास्त्रें ह्या बाबतींत एतद्देशीय लोक युरोपियनांपेक्षां कमी नव्हते.

हा सर्व प्रकार सन १५८०च्या पूर्वीचा आहे. त्या वर्षी स्पेन आणि पोर्तुगाल हीं दोन राज्यें एकत्र झालीं. त्याचा परिणाम पोर्तुगीझ राज्याला बाधक झाला. स्पेनच्या युरोपांतील भानगडींमुळें हिंदुस्थानांतील पोर्तुगीझ राज्याची व्यवस्था नीट राहिली नाहीं. आफ्रिकेंतून गुलाम आणून देशांत भरण्याचा प्रचार सुरू झाल्यामुळें सर्व प्रकारची भिस्त ह्या गुलामांवर राहूं लागली. पोर्तुगीझ लोक स्वतः कोणतेंही काम करण्यास नालायक झाले, आणि राज्याच्या बंदोबस्ताचा सर्व बोजा एतद्देशीय शिपायांवर येऊन पडला. लिस्बन आणि गोवा येथील लष्करीखात्यांतील अंमलदार सतरा हजार फौजेचा खर्च कागदोपत्रीं दाखवून, प्रत्यक्ष फौज चार हजारच नोकरींत ठेवीत. अशी अव्यवस्था सुरू होती. तेव्हां अर्थात् एतद्देशीय शिपायांच्या हातांत सर्व सत्ता गेली. ती त्यांच्या हातून काढून घेण्याला महा प्रयास पडूं लागले.

८. **पोर्तुगीझ लोकांचे क्रौर्य.**—परधर्मीयांशीं वाटेल तो क्रूरपणा करण्यास पोर्तुगीझ लोकांच्या मनास मुळींच शंका वाटत नसे. 'आम्ही तुमच्याशीं क्रूरपणानें वागणार नाहीं, असा तुमचा आमचा ठराव कोठें झाला आहे !' अशा प्रकारची सबब ते सांगत. असा क्रूरपणा करण्यास त्यांस कोणतींही कारणें असलीं तरी तो न्यायाचा होईल काय ? पण ते म्हणत, पोर्तुगीझ राष्ट्र लहान, त्यांच्यापाशीं लोक थोडे, मग त्यांनीं क्रूरपणानें आपला शह लोकांवर बसवूं नये तर काय करावें ? वास्को ड गामाच्या दुसऱ्या सफरीपासून लोकांशीं क्रूरपणा दाखविणें हें त्यांच्या राज्यपद्धतीचें एक अंगच होऊन बसलें. दीवच्या लढाईनंतर आलमीडानें हातीं सांपडलेले कैदी हालहाल करून ठार मारिले. दुसऱ्या एका अधिकाऱ्यानें

एका आरब गलबतावरील खलाशांस शिडांमध्यें शिवून समुद्रांत बुडविलें. त्या लोकांजवळ पोर्तुगीझांचा पास होता, व पोर्तुगीझ गलबत भेटल्यावर त्यांनीं स्वसंरक्षणार्थ हातही उचलिला नाहीं. आलमीडानें कानन्रूच्या बंदरांत सांपडलेले कैदी तोफेच्या तोंडांतून जमिनीवर उडवून दिले. दुसऱ्या एका प्रसंगीं बायकांचे दागिने काढून घेण्याकरितां पोर्तुगीझ शिपायांनीं त्यांचे हात व कान कापून घेतले. असे प्रकार कधीं काळीं झाले असें नाहीं. आशियांतील लोकांशीं वागण्याची ह्या पोर्तुगीझांची नेहमींचीच ती पद्धत होती. प्रत्येक प्रसंगाचें वर्णन करीत बसण्यांत पुनरुक्तीच होणार आहे. सूड घेण्याच्या इच्छेनें हीं घोर कृत्यें केलेलीं नसून, तीं केवळ राज्यपद्धतीला जरूर आहेत असें पोर्तुगीझ अंमलदारांस वाटे. आल्बुकर्क असें म्हणे कीं, परधर्मी लोकांस दया माया न दाखविणें हेंच येशु क्रिस्तास प्रिय असून अंतीं त्यांजवर उपकार करण्यासारखेंच आहे. कैदी लोकांचें नाक कान कापणें, जीव जाण्याकरितां पाण्यांत उडी घेतलेल्या गरीब लोकांच्या पाठीमागें धांवत जाऊन पाण्यांत त्यांचे तुकडे करणें, आणि ताब्यांत आलेल्या शहरांतील बायकामुलांची कत्तल करणें, असलीं कृत्यें करणारा आल्बुकर्क केवळ दयेचा पुतळा असा लोकांस वाटे; कारण त्याच्या पश्चात् झालेले अधिकारी जो क्रूरपणा करीत तो शब्दांनीं वर्णन करण्यासारखा नाहीं. अशा अधिकाऱ्यांच्या जाचांतून, देवा, आपणास सोडीव, अशी करुणा भाकण्याकरितां आल्बुकर्कच्या थडग्यापुढें हिंदु व मुसलमान दोनही धर्मांचे लोक जात असत. पोर्तुगीझ लोकांस राज्य कमवावयाचें होतें. त्या कामास लागणारी फौज व पैसा त्यांजपाशीं नव्हता. तेव्हां आपली उणीव भरून काढण्याकरितां अशा क्रूरपणाचें त्यांस साह्य घ्यावें लागे.

६. **धर्ममतसंशोधकपद्धति.**—स्पेन व पोर्तुगाल देशांत भयंकर धर्मच्छल चालू होता. लोकांचीं धर्माविषयीं मतें काय आहेत याचा तपास करून त्यांस शासन करण्याकरितां एक पृथक् मंडळीच नेमलेली होती, तीस Inguisitiou: असें म्हणत. सोळाव्या शतकांत सर्व युरोपभर धर्मसुधारणा सुरू होऊन रोमनकॅथोलिकपंथ मागें पडूं लागला, तेव्हां राजे व धर्माधिकारी रोमन कॅथोलिकपंथाचे असल्यामुळें नवीन पंथाचा उच्छेद करण्यासाठीं हें न्यायमंडल स्थापन केलेलें होतें. वास्तविक याचा मूळ उद्देश विधर्मी लोकांस शासन करण्याचा होता. पण त्याचा प्रयोग युरोपांत भिन्न पंथांच्या लोकांवर झाला. हीच शासनमंडलाची संस्था पोर्तुगीझ लोकांनीं हिंदुस्थानांतील आपल्या राज्यांत सुरू केल्यामुळें, येथें किती घोर अनर्थ उद्भवले हें समजण्यासाठीं युरोपांत या मंडलाचें वर्तन कसें असे, तें थोडक्यांत सांगितलें पाहिजे. ह्या अपूर्व न्यायपीठावर कोणाचेंही अपील चालत नसे. त्यांचे हेर गुप्तपणें प्रत्येक कुटुंबांत राहून कोणाचीं काय मतें आहेत याची बातमी काढीत; व ती बातमी मिळविल्यावर न्यायाधीश मंडळी लोकांस त्यांच्या मतांबद्दल शासन करीत. प्रत्यक्ष कृत्यांबद्दल शासन करायचें, मतांबद्दल शासन करायचें नाहीं, हा कायद्यांचा मुख्य उद्देश या मंडलानें दूरच ठेविला होता. केवळ संशयावरून कोणासही पकडून, तो आपला धर्म स्वीकारण्याचें कबूल करीपर्यंत, त्यास ते नानातऱ्हेच्या यातना करीत व केव्हां केव्हां जिवंतही जाळीत. दोन साक्षीदार मिळाले कीं अंधारकोठडी, उपासमार, वगैरे शिक्षा करण्यास हरकत नसे. यातना सोसल्यावर मनुष्य कबुली देण्यास तयार झाला तर त्याची सर्व मालमत्ता हिरावून घेऊन व अंगांत कफनी चढवून त्यास सोडून देत. अंधारकोठडीचा परिणाम त्याजवर न झाल्यास, त्यास अग्निकुंडांत टाकीत. एकच साक्षीदार मिळाल्यास त्याच्या पायांत खिळ्याचे खोडे घालीत.

या खोड्यांचा प्रयोग मध्यरात्रीं अंधारकोठडींत चालत असे. आरोपीस वकील देत नसत, किंवा साक्षींची साक्ष त्याच्या देखत घेत नसत. स्त्री असो, पुरुष असो किंवा कुमारिका असो, आरोपीला नग्न करून लांकडी माचावर निजवून पाणी, अग्नि, खिळे व नानातऱ्हेचीं यंत्रें इत्यादिकांनीं त्याच्या शिरा ताणवतील तितक्या ताणणें, हाडें ठेंचणें व जीव न जाईल अशा बेतानें शरीरास यातना देणें, असले प्रकार चालत. सतत पंधरा वर्षें अशा यातना देऊन शेवटीं अग्निकुंडांत त्यांची आहुती दिल्याचीं उदाहरणें आहेत. कित्येक प्रसंगीं शिक्षा झालेल्या अनेक कैद्यांस तसेच पुष्कळ दिवस ठेवून मग एकदम त्यांची धिंड काढून अग्निकुंडांत अर्पण करीत. अशा प्रसंगीं, राजा, सरदार व धर्माधिकारी वगैरे लोक हा देखावा पाहण्यास हजर असत. कित्येक वेळां आरोपीची जीभ तोंड उघडतां मिटतां येऊं नये अशा रीतीनें बांधून, त्यांजपुढें उत्तम पक्वान्नें खाण्यासाठीं आणून ठेवीत व त्यांचे हाल पाहून जमलेले अधिकारी आनंद मानीत. स्पेन देशांतील या मंडळाचा पहिला अध्यक्ष टार्किमाडा या एकट्यानें आपल्या अठरा वर्षांच्या कारकिर्दीत ११४०१ लोकांस नाना प्रकारच्या शिक्षा देऊन इतक्या कुटुंबांची वाताहत केली, असा इतिहासांत दाखला सांपडतो. हीच पद्धत हिंदुस्थानांतील लोकांस बाटविण्याकरितां पोर्तुगीझ लोकांनीं आपल्या राज्यांत सुरू केली होती.

**७. क्रिस्तीधर्मप्रसाराचे प्रयत्न.**—वास्को ड गामा हिंदुस्थानांत आला त्या वेळीं हिंदुस्थानांतील लोकांस आपण क्रिस्ती बनवूं अशी पोर्तुगीझ लोकांस मोठी उमेद होती. हिंदुस्थानचे लोक बहुतेक क्रिस्तीच आहेत अशी त्यांची आरंभीं समज होती. मलबार किनाऱ्यावर नेस्टोरिअन क्रिस्ती फार वर्षांपूर्वीं येऊन राहिले होते. ( पहा पृ० ७९ ). पुढें पोर्तुगीझ आले, तेव्हां त्यांनीं येथील सर्व क्रिस्ती लोकांस कॅथोलिक धर्माची

दीक्षा देण्याचा निश्चय केला. सन १५४२त सर फ्रॅन्सिस झेविअर इकडे आला, त्यानें जेझुइट पंथाची स्थापना केली. सन १५६०त इन्किझिशन म्हणजे धर्ममतसंशोधनपद्धति गोवें येथें अमलांत आली, त्यामुळें नानातऱ्हेचा क्रूरपणा व जुलूम सुरू झाला. त्यांत त्यांनीं आरंभीं जे सेंट टॉमस व नेस्टोरिअन क्रिश्चन इकडे होते ते सर्व नाहींसे करून टाकिले.

पोर्तुगीझ लोकांनीं मुंबई, वसई वगैरे ठिकाणें काबीज केलीं, तेव्हां इकडील पुष्कळ लोकांस त्यांनीं बाटवून क्रिस्ती केलें. विशेषत: ब्राह्मण, परभू वगैरे वरच्या जातीचे लोकांवर त्यांनीं कहर केला. ह्या धर्मच्छलाचीं कारणें अनेक होतीं. क्रिस्तीधर्माची हिंदुस्थानांत स्थापना करावयाची हा त्यांचा एक मोठा हेतु होता. ह्या गोष्टीचा मूळ उत्पादक राजपुत्र हेन्री होय. वास्को ड गामा ह्यानें आपल्या पहिल्या व दुसऱ्या सफरींत कांहीं पाद्री बरोबर आणिले होते. पण स. १५०१त काब्राल इकडे आला, तेव्हां त्यानें आठ पाद्री इकडे आणिले. त्यांजकरवीं हिंदुस्थानांतील लोकांस एकदम बाटविण्याचा त्याचा विचार होता. हे पाद्री फ्रॅन्सिस्कन पंथाचे होते. त्यांचा मुख्य कोइम्ब्रा, स्यूटाचा बिशप, हा होता. ह्यांपैकीं सात असामी लवकरच मरण पावले. त्यानंतर आल्बुकर्कबरोबर पांच पाद्री इकडे आले. स.१५०३त कोचीनचा किल्ला बांधला तेव्हां व पुढें गोवें काबीज केलें तेव्हांपासून धर्मप्रसाराचें काम जारीनें सुरू झालें. गोव्यांतील मशिदींचीं त्यांनीं मंदिरें बनविलीं. स. १५१७त लोरो नांवाचा पाद्री इकडे आला. त्यानें एक नवीन मंदीर बांधिलें. स. १५३४त गोवा येथें बिशप नांवाचा मुख्य अधिकारी पोपानें नेमिला; त्यापूर्वीं मदीरा बेटांतील बिशपाच्या हाताखालीं हिंदुस्थानांतील मंडळी होती. गोव्यास बिशपाची नेमणूक झाल्यावर केप आफ् गुडहोपापासून चीनपर्यंतचा

विस्तृत प्रदेश त्याच्या ताब्यांत आला. ह्यामुळें त्याचें महत्त्व फारच वाढलें. म्हणून स. १५५७त सबॅशन राजानें गोवा येथें आर्चबिशपाची नेमणूक केली, व त्याच्या हाताखालीं तीन बिशप गोवा, मलाका व कोचीन येथें नेमण्यांत आले. स. १६०६त ह्या आर्चबिशपानें पूर्वेकडील प्रायमेट असा किताब धारण केला ह्यांशिवाय पुढें आणखी पुष्कळ फेरफार झाले, ते येथें सांगण्याची आवश्यकता नाहीं.

भूगोलशास्त्र व व्यापार ह्या विषयांतील पोर्तुगीझ लोकांचे उद्योग जितके महत्त्वाचे होते, त्यांहून ज्यास्त महत्त्वाचे उद्योग धर्मविषयांत त्यांनीं केले आहेत. त्यांत परधर्मी लोकांस बाटवून क्रिस्ती करण्यांत त्यांनीं आपली शिकस्त केली. मुंबईबेट पोर्तुगीझांच्या ताब्यांत आलें, तेव्हां फ्रॅन्सिस्कन मिशनरींनीं तेथें असलेल्या सर्व योगी व बैरागी लोकांस बाटवून क्रिस्ती केलें; तसेंच मुंबईनजीक कान्हेरी आणि मंडपेश्वर येथें जीं बौद्ध लोकांचीं लेणीं होतीं, त्यांतही क्रिस्ती प्रार्थना सुरू केल्या. हें काम करणारा मुख्य पाद्री ऍंटोनियो पोर्टो होय. एका वसई प्रांतांत दोन वर्षांच्या अवधींत त्यानें हजारों लोक बाटविले. ह्या पोर्टोची आठवण अद्यापपावेतों लोकांस चांगली होत असते.

ऍंटोनिओ ह्यास कान्हेरीच्या लेण्यांत जे बैरागी व साधु सांपडले त्यांस बाटवून त्या लेण्यांत क्रिस्ती प्रार्थना करण्याची त्यानें सुरुवात केली. ह्या कामांत पोर्तुगीझ सरकारचें व फौजेचें पाठबळ त्यास असे. म्हणून कोणी त्यास अडथळा केल्यास त्यास ह्या फौजा ठोकून काढीत. ह्या लेण्यांत मुख्य चैत्य जेथें आहे, तेथें सेंट मायकेलचें मंदीर स्थापण्यांत आलें. हल्लीं त्या लेण्यांत क्रिस्तीधर्माची खूण कांहींच राहिलेली नाहीं. वसई मराठ्यांनीं घेतली, तेव्हां त्या लेण्यांतील व सभोंवारच्या प्रांतांतील क्रिस्तीधर्माचें खूळ त्यांनीं मोडून टाकिलें. क्रिस्ती लोकांनीं आपल्या अमदानींत फोडलेल्या मूर्तींचे अवशेष अद्यापि

दृष्टीस पडतात. फादर पोर्टो मंडपेश्वर येथें आला, तेव्हां तेथें सुमारें पन्नास योगी होते, ते एकदम पळून गेले. नंतर देवालयांत जाऊन तेथें त्यानें क्रिस्ती मंदीर बनविलें. पुढें ह्या ठिकाणीं पोर्तुगीझ राजा तिसरा जॉन ह्यानें बाटलेल्या लोकांच्या मुलांकरितां एक विद्यापीठ स्थापिलें; व त्याच्या खर्चास पूर्वीच्या हिंदु मंदिराचें सर्व उत्पन्न लावून दिलें. ह्या मंदिराचा मधला हॉल फार मोठा म्हणजे १०० व ३० हात लांबरुंद होता. तेथें पांच क्रिस्ती धर्मगुरु राहत असत; व त्यांस सालिना दीडशें खंडी तांदळांची नेमणूक होती. ह्यापैकीं बरेंच धान्य ते गरिबांस वांटीत असत. पुढें मराठ्यांनीं हें कॉलेज मोडून तेथील इमारतीचीं लांकडे ठाण्यास नेलीं, व पूर्वीच्या हिंदु देवतांच्या मूर्ती क्रिस्ती लोकांनीं प्लास्टरनें बुजविल्या होत्या, त्या पुनः उघड्या करून त्यांचीं पूजाअर्चा पूर्ववत् चालू केली.

पण ह्या धर्मप्रसाराच्या कामांत विशेष पुढाकार घेऊन काम करणारा पहिला बिशप जॉन आल्बुकर्क हा. स. १५३८त इकडे आला. त्याजबरोबर बोर्बा व लागोस ह्या नांवाचे दोन फ्रॅन्सिस्कन पाद्री इकडे आले हेच पाद्री इकडील लोकांचा प्रथम धर्मच्छल करूं लागले. हा आल्बुकर्क इकड पंधरा वर्षें काम करीत होता, (स. १५३८–५३). एवढ्या अवधींत फक्त एक गोवा शहरांत १५ मंदिरें स्थापन झालीं. आदिलशहाच्या मशिदींत त्यांनीं आपलें मुख्य मंदीर केलें. इतर ठिकाणींही असाच प्रकार झाला. स १५४२ त फ्रॅन्सिस्को नांवाचा एक जेझुइट पाद्री आपल्या पंथाचे पुष्कळ लोक घेऊन गोव्यास आला हाच पुढें प्रसिद्धीस आलेला सेंट फ्रॅन्सिस झेविअर होय. त्यानंतर अनेक पंथाचे लोक गोव्यास आले, पण तेथें मुख्य भरणा फ्रॅन्सिस्कन पंथाचाच होता.

पोर्तुगीझांच्या मनांत धर्मशिक्षणाचे मुख्य हेतु तीन होते : क्रिस्ती धर्म वाढविणें, मूर्तिपूजकांचा उच्छेद करणें, व बाटलेल्या क्रिस्ती लोकांचा

उत्कर्ष करणें. ह्या उद्देशांत कित्येक व्यक्तींच्या कडक व फाजील धर्मश्रद्धेची भर पडल्यामुळें लोकांवर कहर गुदरला व मूळचा धर्मोद्देशही तडीस गेला नाहीं. वरील उद्देश तडीस नेण्यास सामुग्री आयतीच तयार होती. इमारती पाहिजेत तर हवीं तितकीं हिंदु देवळें तयार होतीं. त्यांचीं उत्पन्नें इकडेच तोडून घेतलीं कीं चालू खर्च भागणारा होता. तोटा आल्यास हिंदूंचा पैसा लुटून आणण्यास दिक्कत ती कोणती? ह्याप्रमाणें सेंटपॉलकॉलेज नांवाची पहिली संस्था स. १५४१त स्थापन झाली. तींत कानडी, दक्षणी, मल्याळी, सिंहली, बंगाली, पेगू, चिनी, जपानी वगैरे सर्व जातींचे विद्यार्थी होते. अशा लोकांचा भरणा आरंभीं सुमारें तीन हजार होता. ह्या विद्यापीठावर स. १५४८त कामार्ट ह्याची नेमणूक झाली, तेव्हां त्यास असें होऊन गेलें, कीं एकदम सर्व हिंदुस्थान खाऊं का गिळून टाकूं. पण परधर्मी लोकांवर एकदम मोठा जुलूम करण्यास राजाची परवानगी नव्हती. तेव्हां तशी परवानगी मिळवून आणण्याकरितां कॉलेजच्या व्यवस्थापकांनीं मुद्दाम एक गृहस्थ युरोपास राजाकडे पाठविला. त्यानें राजापासून ह्या कृत्याकरितां पाहिजे तितका अधिकार मागून आणिला. म्हणजे लोक जर खुशीनें क्रिस्ती धर्म न स्वीकारतील, तर त्यांजला जबरदस्तीनें व जुलमानें क्रिस्तीं करावे, असा हा अधिकार होता. अशा उद्योगाची बातमी गोव्यांतील लोकांस कळल्यावरोबर बहुतेक हिंदु लोक शहर सोडून गेले. तेव्हां पाद्र्यांच्या ह्या उद्योगाबद्दल तेथील रहिवाशी पोर्तुगीझ व्यापाऱ्यांस फार वाईट वाटलें. कारण हिंदु लोक गेल्यामुळें त्यांचा व्यापार बसला. त्या वेळीं गोव्याची सेनेट म्हणजे म्युनिसिपालिटी होती, तिनें स. १५४६त एक पत्र व्हाइसरॉय यास लिहिलें त्यांत असा मजकूर आहे. "आम्ही माफी मागून असें कळवूं इच्छितों, कीं परधर्मी व्यापारी व ग्रामस्थ वगैरे सर्व लोकांनीं हें कर्ज दिलेलें आहे. पण आपणांजवळ तर

कित्येक फाजील धार्मिक मंडळी असून हिंदुस्थानचे लोक अगदीं कुच-कामाचे आहेत, त्यांस आपल्या राज्यांत राहूं देणें गैर होय, त्यांस हद्द-पारच केलें पाहिजे, अशा प्रकारची समजूत त्यांनीं महाराज साहेबांची पाडिली आहे, ह्यामुळें मोठा अपाय होण्याचा संभव आहे." परंतु ह्या कृत्यांत धर्माधिकाऱ्यांच्या आग्रहापुढें प्रत्यक्ष व्हाइसरॉयाचेंही कांहीं चालेना. राजाकडून आलेला हुकूम त्यास प्रसिद्ध करावा लागला. त्या हुकुमाचें तात्पर्य. ( उतारा, पत्र ता. ८ मार्च, स. १५४६ चें, ):--

१. आपल्या राज्यांत मूर्तिपूजा बंद करणें हें क्रिस्ती राजांचें कर्तव्य आहे.

२. आपल्या राज्यांत मूर्तिपूजकांस यथेच्छ धर्माचार करण्याची पूर्ण मुभा आहे हें पाहून आम्हांस अत्यंत खेद होतो.

३. आमचें असें फर्मान आहे, कीं सर्व मूर्ति फोडून टाकाव्या व मूर्ति करणाऱ्या कारांगिरांस शिक्षा कराव्या.

४. क्रिस्तीधर्म स्वीकारिलेल्या लोकांस विशेष हक्क द्यावे व त्यांज-पासून वेठबिगार वगैरे घेऊं नये.

५. जकातीच्या उत्पन्नापैकीं कांहीं भाग बाटलेल्या लोकांस तांदुळ वांटण्यांत खर्च करावा.

६. परधर्मी लोक क्रिस्ताच्या मूर्ति करितील तर त्यांस शिक्षा कराव्या.

७ बाटलेल्या लोकांस धर्माचें व इतर शिक्षण देण्याकरितां विद्यापीठें घालावीं व त्यांत विधर्मी लोकांसही क्रिस्ती धर्माचें शिक्षण द्यावें.

८. बाटलेल्या लोकांची भक्ति आपणांवर बसावी म्हणून त्यांस ममतेन वागवावें.

ह्या हुकमानें बिशपाचें काम बरेंच सुकर झालें. वरील हुकमाची अंमलबजावणी करण्याकरितां त्यानें आपल्या राज्यांत जिकडे तिकडे हुकूम पाठविले. त्यांनीं हिंदूंचीं मंदीरें जमिनदोस्त करण्याचा सपाटा चालविला. ब्राह्मण लोक ह्या कृत्यास अडथळा करीत म्हणून त्यांस देशांतून घालवून दिलें. राजा, बिशप व व्हाइसरॉय या त्रिवर्गांनीं धर्मप्रसाराचे कामास लेखी हुकूम दिल्यामुळें जी गोष्ट पूर्वी व्यक्तिशः कोणी एकादा करी, ती आतां राज्याची मुख्य कामगिरी होऊन बसली. बिशपानें सोडिलेल्या हुकुमाचा आशय येणेंप्रमाणें आहे:—" राजाचा हुकूम सामील ठेवून धर्मखात्यांतील सर्व अधिकाऱ्यांस असें फर्माविण्यांत येत आहे, कीं हिंदु लोकांचीं मंदिरें बांधून तयार असतील किंवा तयार होत असतील, तीं सर्व पाडून टाकण्यास तुम्हांस पूर्ण अखत्यार व फरज आहे. इतउत्तर जे कामदार इकडे येतील त्यांनींही या हुकमाची अंमलबजावणी करावी, असें परमेश्वराच्या नांवानें माझें त्यांस सांगणें आहे. " पाद्री पोर्टो हा मोठा विलक्षण मनुष्य होता. तो लष्करी पेशाचा व धर्माभिमानी असून दीवच्या वेढ्यांत हातांत क्रूस घेऊन तो आपल्या शिपायांस लढण्याविषयीं उत्तेजन देत होता.

मुंबईंत फ्रॅन्सिस्कन् पाद्र्यांचेंच नेहेमीं वर्चस्व होतें. मुंबईपासून वसईपावेतों ह्या मंडळींनीं अनेक मंदिरें बांधिलेलीं होतीं. चौल, साष्टी, ठाणें येथेंही पोर्तुगीझ पाद्र्यांनीं आपल्या संस्था स्थापिल्या. मंदीर बांधणें, त्यास उत्पन्न करून देणें व त्या उत्पन्नांतून मंदिराचा व बाटलेल्या लोकांचा खर्च चालविणें अशी त्यांची योजना असे. तसेंच गरीब लहान मुलांच्या पोषणासाठीं धर्मादाय असे. त्यांतून हजारों मुलांस बाटविण्याची व्यवस्था चाले. कित्येक दुष्काळांचे वगैरे प्रसंगीं ते गरीब मुलें विकत घेत. अशा विक्रीची किंमत वयावर असे. वर्षाच्या आंतलें मूल पोर्तुगालमधील एका कोंकराच्या किंमतीस मिळे. ह्या

कामासाठीं गांवोगांवीं हिंडणारे फिरते पाद्री असत. ह्याप्रमाणें फक्त एका ठाणें शहरांत तीन वर्षांच्या अवधींत सुमारें सहा हजार मुलें पैदा झाल्याचा दाखला मिळतो. एकदां गोकुळअष्टमीच्या दिवशीं (ऑगस्ट स. १५६४) वसईच्या खाडींत हिंदुलोक स्नानास गेले असतां त्यांजवर जेझुइट पाद्र्यांनीं हल्ला करून, मारामारी केली. असे प्रकार वारंवार होत; त्यामुळें हिंदूंस आपले आचार राखण्याची मोठी पंचाईत पडे. इकडे हे क्रिस्ती पाद्री ऐषआरामांत व चैनींत दंग होऊन राहत, व त्यांस कशाची गुमान वाटत नसे. ह्या उद्योगाचा परिणाम असाच नाहीं तर दुसरा काय होणार? अनेक सधन पोर्तुगीझ पुरुष व बाया मरणसमयीं आपली दौलत एखाद्या मंदिरास देत असत.

बाटून क्रिस्ती झालेल्या हिंदु लोकांस परत स्वधर्मांत घेण्याचे अनेक प्रयत्न तत्कालीन ब्राह्मणांनीं केलेले आहेत. अशा लोकांस आपल्या पिढीजाद धर्मांत परत येण्याबद्दल ते उपदेश करीत, इतकेंच नाहीं तर गोकुळअष्टमी वगैरे सारख्या मोठ्या मेळ्यांचे दिवशीं बाटलेल्या लोकांस समुद्रस्नान अगर गंगास्नान घालून शुद्ध करून घेत. अशा पवित्र दिवशीं गंगास्नान केल्यानें सर्व पातकांचें जसें क्षालन होतें, तसें क्रिस्त-धर्म स्वीकारून व्हावयाचें नाहीं असा शास्त्राधार ते सर्व लोकांस पढवीत. ही ब्राह्मणांची युक्ति पाहून पाद्र्यांचें पित्त खवळून जाई; व त्यांचा उद्योग बंद पाडण्याकरितां ठाणें, वसई, मुंबई वगैरे ठिकाणच्या खाड्यांच्या व समुद्राच्या कांठीं त्यांनीं खांबांवर जिकडे तिकडे क्रूस रोवून ठेविले होते. असें झालें म्हणजे क्रूस रोविलेला नसेल अशा ठिकाणीं जाऊन ब्राह्मण आपला मेळा भरवीत. शेवटीं क्रिस्त्यांचे जाचास त्रासून त्यांनीं वसईनजीक रानांत एक तलाव शोधून काढिला. तेथें कांहीं दिवस ब्राह्मणांचें शुद्धीकरण गुप्तपणें चालू होतें. पुढें तें उघडकीस आल्यावर पोर्तुगीझ शिपायांनीं ब्राह्मणांवर हल्ला करून त्यांस

हुसकून दिलें. त्या वेळीं एक वैरागी एकदां क्रिस्ती होऊन पुनः हिंदु झालेला निर्भयपणें फौजेच्या समोर एकटा उभा राहिला. तेव्हां तर त्या क्रिस्त्यांचें पित्त ज्यास्तच खवळून त्यांनीं त्या जागेचा विध्वंस केला; व गाई मारून त्यांचें मांस व रक्त तलावांत व बाजूस शिंपडून ती जागा अपवित्र केली, ( ऑगस्ट १५६४ ). सन १५७८त जेझुइट लोकांनीं साष्टीबेटांतील दोन गांव सबंध बाटविले; त्यांत एकंदर दहा हजार लोक गेले. दुसऱ्या वर्षीं वांद्रा येथें दोन हजार कोळी लोक बाटले. अशी सालोसालची यादी व संख्या देऊं लागल्यास पल्ला येणार नाहीं. एवढी मोठी संख्या परधर्मांत गेली, तरी हिंदुधर्म जिवंत आहे, हेंच आश्चर्य होय. डॉमिनिकन, फ्रॅन्सिस्कन आणि जेझुइट व सेंट ऑगस्टाईन हे चार मुख्य पंथ होत. ह्याच कामीं खटपट करण्याकरितां कामोन्स ( Comoens ) नांवाचा प्रसिद्ध पोर्तुगीझ कवि स. १५५३त इकडे आला. गोव्यांत कांहीं वर्षें स्वस्थ राहून तो चिनास मकाव येथें गेला; तो परत स. १५८१ त गोव्यास आला. पुढें तो चौल येथें पब्लिकवर्क्सखात्याचा मुख्य होता. ह्याप्रमाणें सोळा वर्षें इकडे राहून तो परत गेला. ह्या कामोन्सनें लिहिलेले उत्कृष्ट ग्रंथ आज जगद्विख्यात आहेत.

८. **पोर्तुगीझांच्या चुकांचा इतरांस झालेला फायदा.**—पोर्तुगीझ लोकांची विशेष भरभराट सोळाव्या शतकाच्या पहिल्या पंनास वर्षांत होती. आफ्रिकेच्या दक्षिण टोंकापासून जपानपर्यंतचा सर्व किनारा त्यांच्या ताब्यांत होता. वास्तविक त्यांचें स्वामित्व व्यापारावर होतें, भूप्रदेशावर नव्हतें. मोठा भूप्रदेश ताब्यांत ठेवण्याइतकी त्यांची शक्ति नव्हती; व व्यापार ताब्यांत ठेवण्याची त्यांच्या अंगीं योग्यता नव्हती. त्यांच्या अंगीं धर्माचें वारें प्रखर होतें. त्यामुळें वाटेल तें साहस ते करीत. सर्व परधर्मीयांस ते आपले शत्रु समजत. त्यांच्यांत धर्मभोळे-

पणा, क्रूरपणा व धर्मभ्रष्टता हे दुर्गुण कल्पनातीत होते. हिंदु लोकांशीं गोडीनें वागण्याचा थोडाबहुत प्रयत्न आल्बुकर्कनेंच काय तो केला. गामा, सोरेझ, सेक्रेरा, मेन्झिस, यांच्या क्रूर कृत्यांनीं सर्व लोक बेहोष झाले, व स. १५६७त पोर्तुगीझ लोकांविरुद्ध सर्व राजांचा एक मोठा कट झाला. त्यांच्या अंगीं शौर्य नसतें तर त्यांचा तेव्हांच नायनाट झाला असता. त्यांचें विलक्षण शौर्य एवढाच कायतो त्यांचा तारीफ करण्याजोगा गुण दिसून येतो. सन १५५८ त पोर्तुगालचा राजा तिसरा जॉन मरण पावला व सेबॅशन गादीवर बसला. या सेबॅशननें आपलें वैभव परत मिळविण्याकरितां ब्रॅगॅन्झा यास आपले संपूर्ण अधिकार देऊन हिंदुस्थानांत पाठविलें. पण त्याच्या हातून फारसें काम झालें नाहीं. एका इसमानें चांगलें काम केलें तर त्याच्या पश्चात् पांच इसम वाईट येऊन पुनः सर्व घोटाळा करीत. चोविसावा गव्हर्नर आथेड (इ. स. १५६७-१५७१) यानें फार चांगला कारभार केला. पण पुढील पांच वर्षांत पांच नालायक अंमलदार आले. तेव्हां सर्व राज्य आतांच बुडतें कीं काय, अशा भीतीनें आथेड यास १५७९त राजानें पुनः इकडे पाठविलें. तो एक वर्षानें इकडे मरण पावला. राजा सेबॅशन सन १५७८त मरण पावला व पोर्तुगालचें राज्य स्पेनचा राजा दुसरा फिलिप याचे ताब्यांत गेलें (इ. स. १५८०). या गोष्टीचा परिणाम असा झाला, कीं पोर्तुगालचें हिताहित कोणीच पाहिनासें झालें व स्पेनचाच पगडा वर राहिला. स. १६४०त पोर्तुगाल देश पुनः स्वतंत्र झाला खरा, पण त्या वेळीं त्यांस डच व इंग्रज हे प्रतिस्पर्धी झाल्यामुळें त्यांच्याशीं स्पर्धा करण्यांत त्यांचें राज्य लयास गेलें.

स. १५९० पासून १६१० ह्या वीस वर्षांत पोर्तुगीझांच्या व्यापाराची अत्यंत भरभराट होती. त्या वेळीं दर सफरींत त्यांचीं दीडशेंपासून अडीचशें गलबतें वावरत असत. परंतु हल्लीं लिस्बनहून गोव्यापर्यंत

दरसाल एका आगबोटीची एक सफर होत असते, व केप आफ् गुड होपपासून जपानपर्यंतच्या अफाट राज्यापैकीं गोवा, दमण आणि दीव हीं तीन ठिकाणें कायतीं त्यांच्या ताब्यांत आहेत. ह्यावरून त्या राज्याचा केवढा ऱ्हास झाला आहे ह्याची कल्पना होईल.

सन १५८०त स्पेन व पोर्तुगाल एक झाले, तेव्हां स्पेनचें व इंग्लंडचें वैर असून पुढें आठ वर्षांनींच स्पॅनिश आरमाराचा चूर झाला. अशा प्रकारें स्पेनच्या युद्धांत पोर्तुगालचें सर्व उत्पन्न खर्च झाल्यामुळें, हिंदुस्थानच्या व्यापारांत घालण्यास भांडवलच राहिलें नाहीं. स. १५८७त पोर्तुगालच्या व्यापाराचा सर्व हक्क एका कंपनीस विकण्यांत आला, त्याचें उत्पन्न स्पेनच्या युद्धांत खर्च झालें. ह्या कंपनीच्या विरुद्ध सर्व अधिकाऱ्यांनीं तक्रार केल्यामुळें, कंपनीचा व्यापार नीट चालला नाहीं. मात्र अशा कंपनीच्या व्यवहारांवरून पुढें इंग्रज व डच कंपन्यांस आपला क्रम सुधारतां आला. आरंभीं पोर्तुगीझ कामगारांचे पगार फार थोडे होते. वास्को ड गामा, आल्बुकर्क वगैरे इसम तर केवळ कीर्तीच्या आशेनें बाहेर पडले होते, म्हणून त्यांस पैशाची परवा नव्हती. पण ही कीर्तीची आशा लवकरच संपली. तेव्हां पैसा मिळाल्याशिवाय काम करण्यास कोणी तयार होईना. आरंभीं समुद्रावर लूट करून किंवा जिंकलेल्या शहरांत लूट करून, किंवा एतद्देशीय राजांपासून खुशीचीं किंवा सक्तीचीं बक्षिसें घेऊन, ते आपले खिसे भरीत. वास्तविक अशा प्रकारें मिळविलेल्या पैशावर राजाचा हक्क असावयाचा. पण राजानें लोकांचे पगार वाढविण्याची कबुली न दिल्यामुळें, तो पैसा लोकांच्याच पदरांत पडूं लागला. पोर्तुगीझ शिपायांची तर अत्यंत दुर्दशा असे. त्यांच्या अंमलदारांस म्हणजे कप्तानास दरमहा १२ शिलिंग म्हणजे सहा रुपये पगार असे, त्यामुळें त्यांस केवळ तांदूळ व मासे ह्यांहून ज्यास्त कांहीं खाण्यास मिळत नसे.

पण त्या वेळच्या पराक्रमास बक्षीसही तसेंच मिळे. अनेक नवीन प्रदेश व बेटें ओसाड पडलेलीं असत. वाटेल त्यानें जाऊन लढावें व प्रदेश काबीज करावा. पूर्वेकडील द्वीपसमूहांत हा प्रकार विशेष जारीनें चालला. असले व वर लिहिलेले अन्यायाचे प्रकार पोर्तुगीझ राजास बंद करतां येईनात याचें एक कारण असें आहे, कीं आपणांस पोसावे लागणाऱ्या खुशालचंद इसमांस चरण्यास पाठविण्याची हिंदुस्थान ही एक उत्कृष्ट जागा पोर्तुगीझ सरकारास मिळाली होती. पोर्तुगाल देशची शेती गुलामांकडून केल्यामुळें, अनेक गरीब लोक अन्नास मोताद झाले. अशा लोकांस हिंदुस्थानास पाठवून देणें एवढाच मार्ग होता. इकडे त्यांस मृत्यु आला तर सुटले बिचारे; व नशिबानें श्रीमंती आली तर बरेंच झालें. हिंदुस्थानांत जाऊन एतद्देशीय स्त्रीशीं लग्न केलें, कीं नोकरी ठेवलेली. अशा नोकऱ्या तरी प्रत्येकास कोठच्या मिळणार? तरी कामाच्या जरुरीपेक्षां फारच ज्यास्त जागा पोर्तुगीझ राज्यांत होत्या. अशा गिधाडांच्या झडपेनें क्रिस्ती (फिरंगी) हा शब्द त्या वेळीं किती भीतिप्रद झाला होता हे सांगण्याचें जरूर नाहीं. हातास लागेल तें ते पळवीत, व वाटेल तो अनाचार व क्रूरपणा करीत. स. १५५० च्या सुमारास हा अनाचार कळसास पोंचला. तेव्हां 'कसें तरी करून आम्हांस सोडवा, नाहीं तर पुढें आमची धडगत नाहीं,' अशा प्रकारच्या विनवण्या लोकांकडून पोर्तुगालच्या राजाकडे जाऊं लागल्या.

आजपावेतों हिंदुस्थानांत युरोपियनांनीं राज्यें कमाविलीं, त्यांत पोर्तुगीझ लोकांचें नांव पहिलें आहे. इतक्या दूर देशच्या लोकांनीं येथें येऊन राज्य स्थापन करणें ही गोष्ट आरंभीं आश्चर्यकारक दिसते. पण ऐतिहासिक रीत्या हे प्रकार कसे घडले हें समजलें म्हणजे आश्चर्य वाटण्याचें कारण राहत नाहीं. राज्य स्थापन करणें हा एक प्रकारचा

प्रयोग आहे. त्यांत अनेक प्रकारांचा समावेश होतो. पैकीं पोर्तुगी-झांस आरंभीं जे प्रकार बरे वाटले, ते त्यांनीं आपल्या शक्त्यनुसार करून पाहिले. त्यांत त्यांच्या कित्येक चुका झाल्या; व कित्येकांत त्यांस यश आलें. त्यांच्यानंतर इंग्रजांनीं जेव्हां आपला राज्यस्थापनेचा प्रयोग करून पाहिला, तेव्हां त्यांस ह्या पोर्तुगीझांच्या अनुभवाचा फारच उपयोग झाला. जे प्रकार अयोग्य ठरले, ते त्यांनीं वर्ज्य केले; व जे उपयुक्त वाटले ते त्यांनीं स्वीकारिले. ह्या दोन राष्ट्रांच्या प्रयोगांमधील अंतर समजून घेण्यासारखें आहे. ह्यासाठीं येथें पोर्तुगीझ राज्यस्थापनेची जी हकीगत दिली आहे, तिची इंग्रज राज्यस्थापनेशीं तुलना करून पाहिली असतां, ऐतिहासिक विवेचनास पुष्कळ मदत होईल. पोर्तुगीझांच्या राज्यांत धर्माचें प्राबल्य विशेष होतें. त्यामुळेंच पोर्तुगीझांचा ऱ्हास झाला, तेव्हां इंग्रज राज्यकर्ते धर्माच्या नादास लागले नाहींत. तसेंच युरोपियन पुरुष व एतद्देशीय स्त्रिया यांचे लग्न-व्यवहार करून हाफकास्ट प्रजा उत्पन्न केल्यामुळें व त्यांस नोकऱ्या द्याव्या लागल्यामुळें, पोर्तुगीझांचा कांहींच फायदा न होतां उलट नुक-सानच झालें, तेव्हां हाही प्रकार इंग्रजांनीं टाळला. इकडचा व्यापार कंपनीच्या हातांत दिल्यामुळें इंग्लंडातील इंग्रज राज्यपद्धतीचे विशिष्ट परिणाम पोर्तुगीझांप्रमाणें त्यांच्या अंमदानींत इकडील व्यवस्थेवर घडून आले नाहींत; व खासगी व्यापाराचें बंडही त्यांनीं लवकरच मोडिलें. तसेंच वर वर्णन केलेला पोर्तुगीझांचा ऐषआराम इंग्रजांनीं इकडे कधींच चालूं दिला नाहीं. आपलीं कामें करण्यास गुलाम मिळाले ह्याबद्दल पोर्तुगीझांस आरंभीं अतिशय आनंद झाला व फायदा झाला असें वाटलें. पण अंतीं ते स्वतः कोणतेंही काम करण्यास नालायक झाले. त्यांस दारिद्र्यानें गांठून त्यांचे हाल कोणाच्यानें पाहवेनात. हे सर्व प्रकार इंग्रजांस शक्य असूनही त्यांनीं स्वीकारिले नाहींत, ह्यांत त्यांनीं आपल्यापरी शहाणपणा प्रगट केला नाहीं असें कोण म्हणेल ?

---

# प्रकरण सातवें.

## डच लोकांची हकीगत.



**१. डच लोकांचा पूर्वक्रमः**—डच म्हणजे नेदर्लंडचे लोक. त्यांचा देश युरोपाच्या वायव्येस समुद्रकांठीं आहे. हा देश फार दिवस स्पेनच्या ताब्यांत होता. तो ताबा त्यांनीं मोठ्या शिकस्तीनें झुगारून दिला. दर्यावर्दी कामांत ते फार निपुण होते. वास्तविक पूर्वेकडील समुद्रांत त्यांचा प्रवेश इंग्रजांच्या मागून झाला. तथापि त्यांनीं व्यापाराच्या कामांत इंग्रजांच्या पुढें फारच आघाडी मारली. व्हेनिस आणि जिनोआ येथील व्यापार बंद पडून लिस्बन शहर भरभराटीस आलें, तेव्हां हिंदुस्थानांतून लिस्बनास येणारा माल डच लोक आपल्या जहाजांतून उत्तर युरोपखंडास पुरवीत असत. स. १५८०त नेदर्लंड देश स्पेनपासून स्वतंत्र झाला; व पोर्तुगाल देश स्पेनच्या राज्यांत सामील झाला. तेव्हां डच लोकांचा सूड घेण्याकरितां स्पेनचा राजा दुसरा फिलिप यानें लिस्बन येथें येण्याची त्यांस बंदी केली, परंतु या बंदीनें त्यांच्या अंगचें खरें तेज ज्यास्तच चमकूं लागलें.

सन १५८८ त इंग्लंडावर गेलेल्या स्पॅनिश आरमाराचा पराजय झाला ही संधि पाहून, डच व्यापरी जहाजें घेऊन हिंदुस्थानास येण्याचा

दुसराच मार्ग शोधून काढावयास लागले. सन १४९३तील हुकमानें पोपानें पोर्तुगाल देशास जे हक्क दिले होते त्यांस बाध आणूं नये, म्हणून युरोपाच्या उत्तरेकडून हिंदुस्थानास येण्याचा मार्ग ते काढूं लागले. स १५९४-९५ व ९६ या वर्षी विल्यम बॅरेंट ( Barent ) यानें उत्तरेकडून हिंदुस्थानास जाण्याचे तीन प्रयत्न केले. पण ते विफल होऊन त्यांतच बॅरेंट मरण पावला. लिन्सकोटेन नांवाचा एक डच व्यापारी सतरा वर्षांचा असतांना लिस्बनास गेला. तेथें सुमारें दोन वर्षें राहून तेथून पुढें तो गोव्यास गेला. तेथें तेरा वर्षें राहून त्यानें व्यापारसंबंधीं पुष्कळ माहिती गोळा केली. सन १५९२त परत येऊन त्यानें ती माहिती १५९६त प्रसिद्ध केली. ह्या पुस्तकांचीं भाषांतरें युरोपियन भाषांत लगेच झालीं. लिन्सकोटेनचें पुस्तक व्यापाऱ्यांच्या व खलाशांच्या फार उपयोगी पडलें. त्याच्या सल्ल्यानें आम्स्टॅर्डमच्या व्यापाऱ्यांनीं एक सभा भरवून हिंदुस्थानांत एक व्यापारी सफर पाठविण्याचें ठरविलें. त्याप्रमाणें कार्नेलियस हौटमन याच्या हाताखालीं, सन १५९५त चार गलबतें आफ्रिकेच्या रस्त्यानें हिंदुस्थानास आलीं, तीं अडीच वर्षांनीं परत युरोपास गेलीं. ह्या सफरींत व्यापारासंबंधीं फारसा फायदा झाला नाहीं, तथापि पुढील मार्ग मात्र कायमचा ठरला.

ह्याप्रमाणें इकडचा व्यापार एकट्या पोर्तुगीझ लोकांच्या हातांत होता, त्यांत आतां डच लोक वांटेकरी झाले. व्हेनिस, जिनोईझ, तुर्क वगैरे राष्ट्रें आपल्या व्यापाराचे मार्ग अगदीं गुप्त ठेवीत असत; व एकास सांपडलेल्या मार्गांत दुसऱ्या कोणाचा टिकाव ते लागूं देत नसत. ह्याच धोरणावर पोपानें हुकूम देऊन पृथ्वीवरील सर्व प्रदेश स्पेन व पोर्तुगाल ह्यांस वांटून दिले होते. सोळाव्या शतकाच्या अखेरीस हा गुप्तपणा टिकणें शक्य नव्हतें. पोर्तुगालच्या राजपुत्र हेन्रीचे शोध

सर्व लोकांत प्रसिद्ध झाले होते. डच लोकांनीं छापण्याची कला शाधून काढिली होती, त्यायोगानें उत्तम प्रकारचे भूगोल व नकाशे छापून प्रसिद्ध झाले. तेव्हां इंग्लंडांत व हालंडांत मोठमोठ्या कंपन्या स्थापन होऊं लागल्या. गुप्तपणाचें तत्त्व नाहींसें झाल्यावर, प्रथम येणाऱ्याची मालकी कायम समजावी, हें तत्त्व कांहीं दिवस अमलांत आलें. त्यास पोपाच्या हुकुमाची पुष्टि मिळाली. पण असे हुकूम कायम राहणें शक्य नव्हतें. तेव्हां ज्यानें प्रदेशाचा शोध लावला असेल त्यास तो प्रदेश स्वतःच्या बळावर आपल्या ताब्यांत ठेवतां येईल तरच तो त्याचा समजावा, असा ग्रह उत्पन्न झाला. अर्थात् 'बळी तो कान पिळी,' हा न्याय अंमलांत येऊन त्याच न्यायानें इंग्रज व डच यांनीं प्रथम आपले प्रयत्न चालविले.

पोर्तुगीझ लोकांच्या शंभर वर्षांच्या व्यापारांत लिस्बन शहर फार भरभराटीस आलें. हिंदुस्थानांतून लिस्बनास आणलेला माल इतर देशांत नेऊन विकण्याकरितां पोर्तुगीझ व्यापाऱ्यांस डच व्यापाऱ्यांची मदत घ्यावी लागली. डच गलबतें लिस्बनहून सर्व प्रकारचा माल नेऊन युरोपाच्या उत्तरेकडील भागास पुरवीत असत. त्यामुळें एकीकडे पूर्वेकडील देश व एकीकडे हॉलंड ह्यांच्या नेआणीनें लिस्बनची मोठी भरभराट झाली. हॉलंडांतून तो माल लंडनांत जाई. हालंडांतील शेल्ट नदींत दररोज पांचशें जहाजें जात येत असत.

हौटमन परत आल्यावर सन १५९८त पांच डच जहाजें पूर्वेकडे आलीं त्यांत भरून आणलेल्या मालाचें उत्पन्न पाहून सर्व राष्ट्र उन्मत्त होऊन गेलें. हौटमन पुनः एकदां पूर्वेकडे गेला; पण तिकडे त्याचा खून झाला. सन १६०१पर्यंत डच लोकांनीं एकंदर पंधरा सफरी केल्या; व त्यांच्या अनेक कंपन्या निर्माण झाल्या. ह्या सर्व कंपन्यांस एकवट करून डच पार्लमेंटानें डच ईस्ट इंडिया कंपनी नांवाची

एक मोठी कंपनी स्थापन केली, ( सन १६०२ ). डच सरकारनें ही गोष्ट फार शहाणपणाची केली. कारण ह्या कंपन्या निराळ्या राहिल्या असत्या तर, त्यांस मोठमोठ्या राष्ट्रांशीं झगडा कारितां आला नसता. ही जी कंपनी स्थापन झाली तिला हिंदुस्थानांतील व्यापाराचा संपूर्ण मक्ता एकवीस वर्षेपर्यंत देण्यांत आला. ह्या व्यापाराकारितां निराळी कंपनी कोणीं काढूं नये असें डच सरकारानें फर्माविलें. मुख्य कंपनीवर डच पार्लमेंटाची सक्त देखरेख होती. कंपनीचे हिशेब तपासणें व तिच्या कामगारांनीं सोडलेले हुकूम पाहणें हीं कामें सरकार करी. कंपनीच्या लोकांनीं फार त्वरेनें मोठें भांडवल जमविलें. तिचें पहिलें भांडवल चौपन्न लक्ष रुपये होतें. तीस सरकारच्या नांवानें युद्ध किंवा तह करण्याचा अधिकार होता. व्यापाराच्या नांवाखालीं युद्ध करून स्पेनची खोड मोडण्याचा डच सरकारचा विचार होता. स्पेनच्या सरकारानें हॉलंडांतील लाखों लोकांचे प्राण घेतले होते; त्याची आठवण बुजली नव्हती. त्याचा सूड ह्या कंपनीच्या मार्फत घ्यावयाचा होता. सन १६०२त डच कंपनीनें बॅंटम् नजीक पोर्तुगीझांचा पराभव करून मसाल्याच्या बेटांस जाण्याचा मार्ग खुला केला. सन १६०३त ते गोव्यावर आले, आणि १६०६त त्यांनीं टेंगस नदींतून लिस्बनवर मारा चालविला. सन १६०६त जिब्रॉलटरच्या अखातांत त्यांनीं स्पॅनिश आरमाराचा समूळ नाश केला. इकडे पूर्वसमुद्रांतील पोर्तुगीझांचीं मोलक्का बेटें त्यांनीं घेतलीं, आणि जपानपर्यंत त्यांनीं आपला अंमल बसविला. डच लोकांची भिस्त मसाल्याच्या किफायतीवर होती. मसाल्याचा व्यापार दुसऱ्या कोणासही करूं देऊं नये व मोलक्का, अंबोयना, बांडा वगैरे मसाल्याच्या बेटांत दुसऱ्या कोणास प्रवेश करूं देऊं नये, अशी डच सरकारची आपल्या अधिकाऱ्यांस सक्त ताकीद होती.

२. **पूर्वेकडील द्वीपसमूहावर त्यांचा अंमल.**—लिस्बन आणि मोलक्का अशीं दोन टोकें डच लोकांनीं काबीज केल्यावर त्यांचे दरम्यान त्यांनीं आपलीं मुख्य ठाणीं बसविलीं. सन १६१९ चे सुमारास त्यांनीं जावा बेट काबीज करून तेथचें बंदर बटेविया येथें आपलें मुख्य ठाणें वसविलें. सन १६४१त मलाक्काची सामुद्रधुनी व द्वीपकल्प हीं काबीज केलीं. सन १६३८ ते १६५८ पर्यंत पोर्तुगीझ लोकांशीं वीस वर्षे झगडा करून त्यांनीं सीलोन बेट घेतलें. सन १६५२त केप आफ् गुड् होप् येथें त्यांनीं आपली वसाहत केली. सारांश, सन १६४०त पोर्तुगीझ देश स्पेनपासून स्वतंत्र झाला, तेव्हां त्या राष्ट्राची पूर्वेकडील सर्व सत्ता डच लोकांनीं काबीज केली होती. १६४१त डच व पोर्तुगीझ या दोन राष्ट्रांमध्यें तह होऊन डच लोकांनीं काबीज केलेले प्रदेश त्यांजकडेसच राहिले, व पूर्वेकडील समुद्रांत दोनही राष्ट्रांचा संचार अप्रतिहत चालावा असें ठरलें.

या कामीं डच राष्ट्राचा उद्देश पोर्तुगीझांच्या उद्देशाहून वेगळा होता. आरबांचा व्यापार बुडवून क्रिस्तीधर्माची वृद्धि करावी व नवीन प्रदेश जिंकून पोर्तुगीझ राज्य वाढवावें, हा पोर्तुगीझ लोकांचा उद्देश डच लोकांनीं कायम ठेविला नाहीं. डच लोकांचा हेतु केवळ व्यापारापुरता होता. त्यांची दृष्टि केवळ द्रव्यप्राप्तीकडे होती. व्यापाराचे जिन्नस आपल्याच हातांत राहवे व दुसऱ्या युरोपियन राष्ट्रांस ते मिळूं नयेत एवढ्यापुरताच ते एकाद्या प्रदेशावर आपला अंमल ठेवीत. कोणत्याही प्रदेशाच्या राज्याच्या अंतर्व्यवस्थेंत ते हात घालीत नसत. त्यांचें मुख्य धोरण असें होतें, कीं पूर्वेकडील द्वीपसमूहांतील राजांनीं हालंडचें वर्चस्व कबूल करावें; व कोणत्याही युरोपियन व्यापाऱ्यांस व विशेषतः इंग्रजांस आपल्या टापूंत येऊं देऊं नये. जसजसा पूर्वेकडील द्वीपसमूहांवर त्यांचा ताबा दृढ होत चालला, तसतसा त्यांचा व्यापाराचा मक्ता

ज्यास्त बळावत चालला. उदाहरणार्थ, एतद्देशीय व्यापाऱ्यांनीं मालाची खरेदीविक्री करणें ती ठरवून दिलेल्या जागांतच करावी; त्यांनीं दुसऱ्या कोणत्याही प्रदेशांशीं मालाची नेआण करूं नये, असें त्यांनीं ठरविलें. डच व्यापारास धक्का बसेल अशीं मसाल्यांचीं झाडें कोणी नवीन लाविल्यास तीं ते टिकूं देत नसत. पूर्वेकडील समुद्रांत मसाले पिकणाऱ्या द्वीपांचा समूह मोठा आहे. या समूहांत उत्तरेकडे बोर्निओ नावाचें मोठें बेट आहे. पश्चिमेकडील बाजूनें सुमात्रा, जावा, फ्लोरिस, तिमोर, या बेटांची रांग आहे. बोर्निओच्या पूर्वेस सेलिबीज बेटें आहेत; त्याच्या पलीकडे मोलक्का म्हणजे मसाल्याची बेटें असून त्यांत टर्नेट, टायडोर, बांडा, आंबोयना, पुलवे, पुलारून, रोझंजीन इत्यादि अनेक बेटें आहेत; व त्यांच्याही पूर्वेस न्यूगिनी नांवाचें मोठें बेट आहे. त्याच्यापुढें फिलिपाईन बेटांची रांग उत्तरेकडे गेली आहे. सुमात्राच्या वायव्य कोंपऱ्यावर ऍकिन (Achin) नांवाचें बंदर आहे. तें मलाक्का सामुद्रधुनीचें नाकेंच होय. तेथचा राजा पोर्तुगीझ लोकांशीं पुष्कळ दिवस लढला व सन १६००त त्यानें डच लोकांची मदत घेतली. तेव्हांपासून सुमात्रा बेटांतील सर्व लहानथोर राजांस डच लोकांनीं हळूहळू ग्रासून टाकिलें. मलाक्का द्वीपकल्पाच्या पश्चिम किनाऱ्यावर पोर्तुगीझ लोकांचें मलाक्का नांवाचें शहर होतें; व त्याच्याच दक्षिणेस पूर्वकिनाऱ्यावर जोहोर नांवाचें शहर असून तेथचा राजा स्वतंत्र होता. सन १६०६त डच लोकांनीं जोहोरच्या राजाशीं संगनमत करून मलाक्का काबीज करण्याचा विचार चालविला. शेवटीं सन १६४१त मलाक्का डच लोकांच्या स्वाधीन झालें. मलाक्का सामुद्रधुनीप्रमाणेंच सुमात्रा व जावा या दोन बेटांमधील सुंडा नांवाची सामुद्रधुनी फार महत्त्वाची आहे. जावाच्या ईशान्य किनाऱ्यावर बँटम येथें एका लहानशा राजाचा अंमल होता. त्या राजाशीं स. १६०९त डच लोकांनीं

तह करून हळूहळू जावा बेट व्यापिलें. बँटमच्या पूर्वेस एका खाडीच्या कांठीं जकात्रा नांवाचें एक लहानसें ठिकाण होतें, तें बँटम-पेक्षां व्यापाराला ज्यास्त सोयकर आहे असें पाहून, डच लोकांनीं जुनें जकात्रा शहर मोडून तेथेंच बटेविया नांवाचें आपलें नवीन ठाणें बसविलें ( १६१९ ). येणेंप्रमाणें पूर्वेकडील द्वीपसमूहांत प्रवेश करण्याचीं नाकीं ताब्यांत आल्यावर त्यांनीं आंतल्या द्वीपसमूहांतही अनेक ठाणीं बसविलीं. तेथचे लोक पोर्तुगीझ अंमलास त्रासून गेल्यामुळें ते मोठ्या खुषीनें डच लोकांस सामील झाले, म्हणजे पोर्तुगीझ लोकांपासून स्वसंरक्षण करण्याकरितां तद्देशीय अधिकाऱ्यांनीं डच लोकांचा आश्रय करणें ही डच लोकांच्या सत्तेची पहिली पायरी होय. टर्नेटचें उदाहरण घ्या. पहिला तह झाल्यावर पुढें नवीन किल्ले बांधणें व जुने मोडणें हीं कामें डच लोकांनीं केलीं. नंतर ऑंबोयना बेटांतील लवंगा आपणांस वाटेल त्या दरानें विकतां याव्या, म्हणून टर्नेट बेटांतील लवंगांचीं झाडें त्यांनीं उपटून टाकविलीं. अखेरीस सन १६४९त टर्नेटच्या सुलतानानें डच गव्हर्नरास आपला मुख्य प्रतिनिधि नेमिलें. आंबोयनाचा इतिहासही असाच आहे. स. १६००त आंबोयनाचा राजा व डच व्यापारी ह्यांजमध्यें स्नेहभावाचा तह झाला. १६०९त त्यांस किल्लाबांधण्याची परवानगी मिळाली, तेव्हां तेथें हॉलंडचें सार्वभौमत्व कायम झालें. पुढें आपल्या लवंगा दुसऱ्या कोणास विकणार नाहीं असें राजानें कबूल केलें. असें होतां होतां स. १६१८त डच लोकांनीं आंबोयनावर आपली सत्ता कायम केली व तेथील संपूर्ण व्यापार बळकाविला. पुढें त्यांनीं आपला प्रॉटेस्टंट धर्म त्या बेटांतून चालू करण्याची व वेठबिगारी घेण्याची परवानगी तहानें मिळविली.

आरंभीं डच लोकांचा अंमल बराच सुखावह होता. त्यांच्या मदतीनें पोर्तुगीझ लोकांनीं चालविलेला कहर आपण दूर केला असें तिकडील

लोकांस कांहीं दिवस वाटलें. परंतु हा शांत प्रकार फार दिवस टिकला नाहीं. तिकडील लोकांस बळजबरीनें धरून प्रतिबंधांत ठेवणें, तद्देशीय अधिकाऱ्यांस हिंदुस्थानाशीं किंवा आशियांतील इतर देशांशीं कोणत्याही प्रकारचें दळणवळण करूं न देणें; व धट्याकट्या लोकांस जुलुमानें गुलाम करणें, इत्यादि अनन्वित प्रकार डच लोकांनीं पुढें चालू केले. आरंभीं फक्त व्यापारापुरतीच त्यांची मागणी असे. परंतु पुढें इंग्रजांशीं त्यांचा झगडा सुरू झाला, तेव्हां त्यांनीं आपला क्रम बदलिला.

**३. डच लोकांचा इंग्रजांशीं झगडा.**—डच लोक म्हणत, कीं आपण या द्वीपसमूहांत प्रथम प्रवेश केला, तद्देशीय लोकांस मदत केली व त्यांजबरोबर कायमची व्यवस्था तहानें करून घेतली. सबब त्यांत आपण इंग्रजांचा प्रवेश होऊं देणार नाहीं. इंग्रज म्हणत, हीं बेटें स० १५७९त प्रथम इंग्रज खलाशी ड्रेक ह्यान शोधून काढिलीं. इकडे तिकडे चारदोन किल्ले बांधिल्यानें तीं संपूर्णपणें डच लोकांच्या ताब्यांत गेलीं असें होत नाहीं. म्हणून तेथें दोघांचाही हक्क सारखा असावा. वास्तविक पाहतां ही पहिली सबब निरुपयोगी आहे. अमुक एका प्रदेशांत अमक्यानें प्रथम प्रवेश केला, म्हणून त्यावर त्याची मालकी असावी हें तत्त्व इंग्रजांस कधींहि कबूल नव्हतें, व हें तत्त्व मोडूनच ते पोर्तुगीझ व इतर लोकांशीं झगडत होते. पण प्रसंग पडेल त्याप्रमाणें हे इंग्रज वाटेल तें तत्त्व पुढें करीत. वरील दोनही विरुद्ध तत्त्वांचा उपयोग त्यांनीं अनेक वेळां केलेला आहे. त्या तत्त्वांवर सरकारी कागदोपत्रीं सुद्धां ईस्ट इंडिया कंपनीनें हक्क सांगितले आहेत. हीच धरसोड इंग्रज व डच यांजमधील वैराचें मूळ कारण होय. युरोपांत या दोनही राष्ट्रांमध्यें सख्य होतें. दोनही राष्ट्रें प्रॉटेस्टंट धर्माचीं पुरस्कर्तीं होतीं. इ. स. १६०२त या दोनही राष्ट्रांच्या आरमारांनीं एकवटून पोर्तुगीझ लोकांचा पराभव केला होता. या सर्व गोष्टी खऱ्या, तरी पण पूर्वेकडील द्वीपसमूहांत इंग्रजांचा शिरकाव झा-

त्यानें डच लोकांची किफायत टिकणारी नव्हती. इंग्रज लोक थोडथोडें भांडवल जमवून सफरी करीत; व बंदरोबंदरीं जाऊन चढाओढीनें वाटेल ती किंमत देऊन माल खरेदी करीत. हें पाहून डच लोक एतद्देशीय लोकांस सांगत, कीं "हे इंग्रज केवळ लुटारू आहेत. हे व्यापाराच्या उद्देशानें इकडे आलेले नाहींत. यांस माल विकूं नका." परंतु ही फसवणूक फार वेळ टिकली नाहीं. इंग्रज लोक नियमितपणें येऊन योग्य किंमत देऊन माल खरेदी करितात हें एतद्देशीय लोकांस उघड उघड दिसे. पुढें कांहीं दिवस एतद्देशीय व्यापाऱ्यांस डच लोकांनीं लांच देऊन पाहिला, तरी इंग्रजांचा व्यापार बंद पडेना. स. १६०३त इलिझाबेथ राणी मरण पावल्यावर जेम्स राजा गादीवर आला. त्यानें स्पेनशीं तह केला. त्यामुळें डच व इंग्रज यांजमधील प्रेमभाव अर्थात्च कमी झाला; धर्माचें बंधन ढिलें पडलें; आणि व्यापार आणि किफायत यांशिवाय त्यांस दुसरें कांहीं दिसेना.

आरंभीं इंग्रज कंपनी दुर्बल होती. इलिझाबेथ राणी मरून गेली. राजा जेम्सची पद्धति धरसोडीची होती. डच लोक नुकतेच स्वतंत्र होऊन ताज्या दमांत होते. इंग्रज कंपनी थोडथोडें भांडवल जमवून निरनिराळ्या सफरी करी. डच लोकांनीं १६०२त खंबीर राष्ट्रीय कंपनी स्थापन केली. पृथक् सफरींची पद्धत सोडून देण्यास इंग्रजांस आणखी १० वर्षें लागलीं. तरी इंग्रज लोक पूर्वेकडील द्वीपसमूहांतील तद्देशीय राजांच्या भांडणांत डच लोकांच्या विरुद्ध वागूं लागले. सुमात्राच्या राजास एक इंग्रज बायको आणून देण्याचेंही इंग्रजांनीं अभिवचन दिलें. त्याप्रमाणें एक मुलगी पसंत करण्यांत आली. पण तिचें पुढें काय झालें त्याचा दाखला उपलब्ध नाहीं. युरोपियन राज्यकारणांनींही इंग्लंड व हॉलंड यांमध्यें वैमनस्य पडत चाललें होतें. भावी चिन्ह ओळखून डच सरकारानें पीटर बोथ ( Pieter Both ) नांवाचा

एक लायक गृहस्थ गव्हर्नर जनरल नेमून इकडे पाठविला. तो आठ जहाजें बरोबर घेऊन स० १६११त बँटम येथें आला. पुढील चार वर्षांत त्यानें सर्व बेटें तहांच्या जाळ्यांत गुंतवून टाकिलीं; एवंच जावा-पासून मोलक्का पावेतों डच लोकांचा व्यापार व सत्ता त्यानें कायम केली. पूर्वेकडील समुद्रांत डच लोकांची सत्ता स्थापन करणारा हाच पहिला पुरुष होय. स. १६१९त तो परत येत असतां मॉरिशस बेटानजीक वादळांत सांपडून मरण पावला. पोर्तुगीझ लोकांस मलबार किनाऱ्यावर त्रास पडला तसा डच लोकांस ह्या पूर्वद्वीपसमुद्रांत पडला नाहीं, ह्याचें कारण- तेथील राजे अगदींच लहान व एकमेकांपासून अलग होते. इंग्रज लोकांनीं त्या वेळेस तिकडे जोराचा प्रयत्न केला नाहीं. स. १६१० पर्यंत सगळीं सतरा जहाजें कायतीं इंग्रजांनीं तिकडे पाठविलीं; व त्या-पैकीं एका वेळीं अशीं थोडींच तिकडे होतीं. डच लोकांचीं स. १६०२ पावेतों तिकडे ६५ जहाजें गेलीं व स. १६०२ पासून १६१० पर्यंत ६९ जहाजें गेलीं. त्यांतून हत्यारें व लढणाऱ्यांची संख्या इंग्रजांकडे फारच कमी होती; डच लोकांच्या कंपूंत शिस्त व नीतिही इंग्रजांपेक्षां चांगली होती. इंग्रज कंपनीनें हॉलंडांतील लोकांपुढें आपल्या तक्रारी ठेवून पाहिलें, पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. तेव्हां जेम्स राजानें ह्या तक्रारी मिटविण्याचा प्रयत्न चालविला. त्यांमुळें दोन प्रकार उपस्थित झाले. युरोपांत हॉलंड व इंग्लंड येथील सरकारांमध्यें तहाची बोलाचाली, व पूर्वेकडील समुद्रांत युद्धप्रसंग. दोनही सरकारांनीं वाटेल तितकी खटपट करून स्नेह जोडिला, तरी तो कागदावरच राहत असे. त्याचें मुख्य कारण असें कीं स्पेनच्या राष्ट्राशीं जेम्सचा स्नेहभाव होता, ही गोष्ट हॉलंडास खपणारी नव्हती. स्पेनपोर्तुगालशीं लढण्याकरतां हॉलंडचे लोक अतोनात पैसा खर्च करीत होते, तसा खर्च करण्यास इंग्रज तयार नव्हते. स. १६१३त, १६१४त व १६१९त लंडन व

आम्स्टर्डाम येथें दोनही राष्ट्रांचे मोठमोठे वकील तहाची तडजोड करीत होते. पण त्याजपासून कांहीं एक निष्पत्ति झाली नाहीं. ह्याच वर्षी मसाल्याच्या बेटांत बांडा, आंबोयना, जावा इत्यादि ठिकाणीं, दोनही राष्ट्रांचे लोक एकमेकांस वक्रदृष्टीनें वागत होते. इंग्रज म्हणत 'आमचा एक डोळा फोडण्यासाठीं हे डच आपले दोनही डोळे फोडून घेतील.' स. १६१७त विलायतेंत अशी बातमी आली, कीं आंबोयना येथें ४०।५० इंग्रज, डच लोकांच्या कैदेंत उपाशीं मरत आहेत. शिव्यागाळी भांडा-भांडी वगैरे प्रकार तर हरहंमेशचे होते. स. १६१४ व १५ ह्या दोन वर्षी जेरार्ड रेन्स्ट् हा डच गव्हर्नर जनरल होता. तो ही बोथसारखाच हुशार असून त्यास संपूर्ण अधिकार दिलेला होता. तो इकडेच मरण पावल्यावर लॉरेन्स रिआल नांवाचा तिसरा ग. ज. झाला. त्यानें किल्ले वगैरे बांधून डच लोकांची सत्ता पुष्कळ मजबूद केली.

इकडे इंग्रजांचेंही प्राबल्य हळूहळू वाढत होतें. स. १६१३–१६ च्या समाईक भांडवलाच्या (Joint-Stock) व्यापारांत त्यांस चांगलीच किफायत होऊन स. १६१७ त त्यांच्या शेअरचा भाव शेंकडा २०७ होता. त्यांचें महत्त्व मसाल्यांच्या बेटांत विशेष नव्हतें. तरी सर टॉमस रोच्या वकिलातीनें हिंदुस्थानच्या पश्चिम किनाऱ्यावर त्यांचें बस्तान चांगलें बसत चाललें होतें. म्हणून स. १६१७–२० पावेतोंच्या चार वर्षांकरितां दुसरें समाईक भांडवल जमविण्यांत आलें, तेव्हां मोठमोठ्या लोकांनीं हांहां म्हणतां दीडकोटि रुपयांच्या वर भांडवल जमविलें. पण इतक्या पैशानेंही डच लोकांचा नक्शा उतरणारा नव्हता. डच लोकांच्या कंपनीची व्यवस्था तेथील सरकाराच्या ताब्यांत असल्यामुळें, तिच्या कृत्यांस सर्व डच राष्ट्राचें पाठबळ असे. इंग्रज कंपनीस सरकारचें पाठबळ तर नव्हतेंच, पण शिवाय आरंभाच्या निरनिराळ्या सफरी व अलीकडच्या चार चार वर्षांच्या समाईक

भांडवलाच्या सफरी ह्यांच्या योगानें त्यांच्या व्यवस्थेंत एक निबंध राहत नसे. हा कंपनीच्या व्यवस्थेंतील दोष इंग्रजांस फार दिवस नडला. ठरीव मुदतींत होईल तितका नफा करून घ्यावा हें इंग्रज व्यापाऱ्यांचें आरंभीं धोरण होतें, म्हणून किल्ले वगैरे कायमचा बंदोबस्त करण्यास ते धजत नसत. दरबारांतील निरनिराळ्या पक्षांचा त्यांस जाच सोसावा लागे. जेम्स हा स्कॉटलंड व इंग्लंड दोनही देशांचा राजा होता. स्कॉटलंडांत एक कंपनी स्थापन झाली तिला सन १६१७त राजानें व्यापाराची सनद करून दिली. त्यामुळें अर्थात्च लंडन कंपनीचें धाबें दणाणलें. स्कॉच लोकांचें इंग्रजांशीं चांगलें नव्हतें व धर्मसंबंधांत ते डच लोकांस मिळण्याजोगे होते. सन १६१८त लंडन कंपनीनें स्कॉच कंपनीचें नुकसान भरून दिलें, तेव्हां त्या स्कॉच कंपनीची सनद राजानें रद्द केली.

इकडे १६१८ मध्यें डच व इंग्रज यांजमध्यें मोठाच तंटा सुरू झाला. डच लोकांनीं इंग्रजांस कैदेंत ठेविलें आहे; इंग्रजांचीं ठाणीं त्यांनीं काबीज केलीं आहेत; त्यांचीं दोन जहाजें हल्ला करून घेऊन आंतील खलाशांस कैद केलें आहे, इत्यादि तक्रारी कंपनीनें राजापुढें ठेविल्या. तेव्हां सन १६१८त पुनरपि तडजोड सुरू होऊन हॉलंडचे दहा वकील लंडनास आले. सन १६१९च्या जुलईत तह कायम झाला, त्यांत डच लोकांचीच बहुतेक सरशी झाली. डच लोकांकडून इंग्रज कंपनीचें सालिना सुमारें दहा लाख रुपये नुकसान होत असे, तें भरून न मिळतां उलट पूर्वेकडील द्वीपसमूहांत इंग्रजांचा कांहींच हक्क राहिला नाहीं. एकमेकांचीं जप्त केलेलीं जहाजें व माल मात्र एकमेकांस परत मिळून दोघांचाही व्यापार पूर्व समुद्रांत चालावा, व प्रत्येक कंपनीनें दहा लढाऊ जहाजें तिकडे कायमचीं ठेवून द्यावीं असें ठरलें. हा तह वीस वर्षें पर्यंत चालावयाचा होता; व त्याच्या बजावणीकरितां

प्रत्येक राष्ट्राच्या चार चार गृहस्थांचें एक कौन्सिल नेमिलेलें होतें. हा तह इंग्रज व्यापाऱ्यांस बिलकुल पसंत पडला नाहीं, व त्याचा विशेषसा उपयोगही झाला नाहीं. बांडा आणि आंबोयना येथील लवंगांच्या व्यापारांत आपणांस भाग असावा आणि बटेवियानजीक आपलेंही एक मजबुतीचें ठिकाण असावें, अशा इंग्रजांच्या दोन मोठ्या मागण्या होत्या. जावा बेटाच्या मसाल्यांत वरील तहानें इंग्रजांस सारखा हक्क दिलेला होता. पण आंबोयना व बांडा या महत्त्वाच्या ठिकाणीं त्यांचा हिस्सा फक्त एक तृतीयांशच होता. ह्या बेटांस जाण्याचा रस्ता अगदीं दक्षिणेकडूनही होता, म्हणून तीं इंग्रजांच्या स्वाधीन झालीं तर जावा, सुमात्रा वगैरे ठिकाणच्या डच लोकांस त्यांची भीति होती. तेव्हां बांडा, आंबोयना वगैरे बेटें इंग्रजांस मिळूं नयेत, अशी डच लोकांची उत्कट इच्छा होती. ह्या द्वीपसमूहांत त्या वेळीं दोनही राष्ट्रांचीं आरमारें होतीं. दोघांच्याही फौजा बहुतेक सारख्याच होत्या.

ह्या वेळीं डच लोकांकडे कोन ( Coen ) नांवाचा तत्कालीन घडामोडींत प्रसिद्धीस आलेला एक फार हुशार गृहस्थ डच अधिकारी होता. ह्याचा जन्म सन १५८७ त झाला. त्याचें लहानपणचें शिक्षण रोम येथें एका प्रसिद्ध व्यापारी पेढींत झालें होतें. सन १६०७त तो ह्या पूर्वेकडील डच वसाहतींत आला. १६१३त तो बँटम येथें प्रेसिडेंट झाला; व १६१७त त्यास गव्हर्नर जनरलची जागा व राजाचे सर्व हक्क मिळाले. पोर्तुगीझांचा आल्बुकर्क, फ्रेंचांचा डुप्ले, व डचांचा कोन यांची ऐतिहासिक दृष्ट्या बरोबरी आहे. डच लोकांचें राज्य इकडे स्थापन करावें अशी कोनची महत्त्वाकांक्षा होती व त्यास सर्व कंपनीचें व राष्ट्राचेंही पाठबळ मिळालें. त्यानें १६१८ ते १६२३ व १६२७ पासून १६२९ पावेतों गव्हर्नर जनरलचा कारभार केला; आणि जावा बेटांत बटेवियाची स्थापना

करून तेथें मजबूत तटबंदी केली. इतक्यांत विलायतेंत तह झाल्याची बातमी आली. त्या तहांतील संदिग्धपणाचा फायदा घेऊन कोननें नानातऱ्हेचे बेत चालविले. कंपनीच्या संरक्षणार्थ दोघांचींही जहाजें असावींत असें ठरलेलें होतें. पण कोन दोनही आरमारांचा उपयोग डच सत्ता वाढविण्याकडे करूं लागला. तथापि सर्वांत तंट्याचें मुख्य बीज असें उत्पन्न झालें, कीं ह्या मुलखांत सार्वभौमसत्ता कोणाची चालावी, व कायदे कोणत्या राष्ट्राचे चालावे? कोननें डच सत्ता प्रमुख समजून हॉलंडचे कायदे सुरू केले, त्यामुळें इंग्रजांस फारच जाच होऊं लागला. सारांश, १६१९चा तह फायदेशीर न होतां उलट त्यानें पूर्वींच्या भांडणांत ज्यास्तच भर घातली ही गोष्ट इंग्लंडां-तही कळून चुकली होती.

**४. तंट्याचा अतिरेक, आंबोयनांतील कत्तल.**—स. १६१९तला तह झाला नसता तर ह्यापूर्वींच इंग्रजांस डच लोकांनीं त्या द्वीपसमूहां-तून कायमचें काढून लाविलें असतें. कोननें आपल्या सरकारास कळ-विलें, कीं "इंग्रज लोक ह्या द्वीपसमूहांतून स्वेच्छेनेंच निघून जाण्याच्या अगदीं बेतांत आले होते, पण या तहानें तुम्हीं त्यांस पुनः आश्रय दिल्याबद्दल त्यांनीं तुमचे आभारच मानिले पाहिजेत." इंग्रज लोकांची वसती बँटम येथें होती, पण कोननें ती बटेविया येथें आपल्या नजरे-खालीं आणिली. तेथें इंग्रजांस इतका त्रास पोचूं लागला, कीं बहुतेक इंग्रज हळूहळू जावा बेट सोडून हिंदुस्थानांत येऊं लागले. तद्देशीय रहिवाशांपेक्षांही इंग्रजांची स्थिति निकृष्ट झाली. इंग्रज वखारींतील कारभारी क्लार्क ह्यास त्यांनीं भर बाजारांत चाबकांनीं मारिलें व त्याचें मांस तोडून त्याच्या जखमांत मीठ आणि आंब भरली. इंग्रज पहारेकऱ्यांस त्यांनीं आठ दिवस अटकेंत ठेविलें. ज्या गोष्टींत डच लोक कायदा म्हणून वजावीत, तीच गोष्ट इंग्रजांस जुलमासारखी

वाटे. 'ह्या दु:सह जाचांतून आम्हांस सोडवा', अशा तऱ्हेच्या विनवण्या इंग्रजांकडून इंग्लंडास येऊं लागल्या. इंग्रजांविरुद्ध पुरावा देण्यासाठीं तद्देशीय लोकांस डच लोक भयंकर जाचीत. बांडा, आंबोयना इत्यादि बेटांवर दोनही राष्ट्रांचे अधिकारी आपले हक्क सांगत होते. १६२१त पुलारून बेटांतून इंग्रजांस डच लोकांनीं घालवून दिलें. आंबोयना बेटांत इंग्रजांची एक वखार होती. हर्मन व्हान स्प्युल्ट् (Herman Van Speult) हा तेथचा डच गव्हर्नर निष्पक्षपाती म्हणून नांवाजलेला होता. सन १६२३ च्या जानेवारींत डच गव्हर्नर जनरल कोन युरोपास गेला. तेव्हां त्यानें असें फर्माविलें होतें, कीं "आंबोयना येथें इंग्रजांचा मुळींच शिरकाव होऊं देऊं नका. त्यांना शत्रूंसारखे वागवा. त्यामुळें कसाही बनाव बनला तरी त्याविषयीं मुळींच फिकीर बाळगूं नका". वास्तविक कोनच्या कारभाराचें धोरण या वाक्यांतच स्पष्ट होत आहे. १६२३च्या आरंभीं आंबोयना वगैरे सर्व बेटें डच लोकांच्या ताब्यांत आलीं. त्या वेळीं आंबोयना येथें दोनशें डच व तीनचारशें जपानी वगैरे एतद्देशीय लोक एवढें लष्कर होतें. शिवाय बंदरांत त्यांचीं आठ जहाजें होतीं. इंग्रजांच्या वखारींत अठरा इंग्रज लोक होते. त्यांच्या ताब्यांत तीन तलवारी, दोन बंदुका व अदशेर दारू होती. त्यांना मदत म्हटली तर जवळच्या बांडा बेटांत असलेल्या नऊ इंग्रजांची. इंग्रजांचा मुख्य प्रेसिडेंट जावा येथें होता. त्यानें बांडा व आंबोयना येथील सर्व इंग्रजांस आपल्याकडे निघून येण्याविषयीं हुकूमही पाठविले होते, परंतु ते वेळेवर येऊन पोंचले नाहींत. फेब्रुवारी तारीख १० सन १६२३ रोजीं रात्रीं डच लष्करांतील एका जपानी शिपायानें डच संत्र्यापाशीं, एकंदर संत्री किती आहेत, पहारे केव्हां बदलावयाचे, वगैरे विचारपूस केली. दुसऱ्या दिवशीं गव्हर्नरानें त्यास विचारिलें, तेव्हां तो

म्हणाला, ' मीं हे प्रश्न सहजगत्या विचारिले, त्यांत विशेष कांहीं हेतु नव्हता.' एकेकाला पहारा किती वेळ करावा लागेल हें समजण्याकरितां असली विचारपूस पहारेकरी सहज करीत असतात. पण गव्हर्नर स्थ्युल्ट यास आपल्यावरील निष्पक्षपाताचा आरोप काढून टाकावयाचा होता. त्यास ही संधि आयतीच सांपडली. त्यानें त्या जपानी पहारेकऱ्याचे हाल करून त्याजपासून इंग्रजांविरुद्ध पुरावा गोळा केला, व त्याजवर त्याच दिवशीं त्या जपानी शिपायाची सही घेतली. डच कायदा असा आहे, कीं कोणापासून जबरदस्तीनें पुरावा घेण्यांत आल्यास तो पुरावा निदान चोव्वीस तासांनंतर त्यास वाचून दाखवून मग त्यावर त्याची सही घ्यावी. त्या जपानी शिपायानें दुसऱ्या आठ नऊ जपानी शिपायांचीं नांवें पहिल्यानें सांगितलीं होतीं. त्यांजवरही जुलूम करून इंग्रजांविरुद्ध गव्हर्नरानें पुरावा घेतला. त्यांना डागल्यामुळें ते रडत ओरडत होते. अशा स्थितींत त्यांस उचलून तुरुंगांत नेल, असा डच कारभाऱ्यांचा पुरावा आहे. ह्या पुराव्यावरून असा प्रकार जुळविण्यांत आला, कीं एकादें इंग्रज जहाज येतांच, किंवा गव्हर्नर दुसरीकडे जाईल तेव्हां, किल्यावर हल्ला करून तो काबीज करावयाचा, असा त्या अठरा इंग्रज लोकांनीं वर्षारंभाच्या दिवशीं शपथा घेऊन बेत केला होता; व त्यासाठीं जपानी शिपायास फितूर करण्याचें प्राइस नांवाच्या एका इंग्रज हजामाचें वचन घेतलें होतें. दारूच्या नादांत या हजामानें गैरकायदा वर्तन केल्यामुळें तो या वेळीं तुरुंगांत होता. ता. १५ फेब्रवारी रोजीं त्याचीही जबानी घेऊन जबरदस्तीनें त्यास वरील प्रकार कबूल करण्यास लाविलें. हा प्रकार त्या इंग्रज लोकांस कळला. परंतु ५०० लष्कर व ८ जहाजें यांच्यासमोर १८ असाम्यांनीं लढून किल्ला घेणें ही गोष्ट असंभाव्य असल्यामुळें ते बेफिकीर होते. तथापि गव्हर्नरानें घेतलेल्या पुराव्याचा उपयोग करून

इंग्रजांचा कारभारी टॉवरसन ( Towerson ) व बाकीचे सतरा असामी यांस बिड्या घालून कैदेंत ठेविलें. पुढें चौकशी सुरू झाली. वखारींत किंवा कोणापाशीं एका ओळीचाही पुरावा मिळाला नाहीं. प्रथम बोमंट व जॉन्सन या दोन इसमांस पुढें आणिलें. बोमंट ह्यास बाहेरील दालनांत ठेवून जॉन्सन यास आंतल्या खोलीत नेलें. तेथून जॉन्सन केवीलवाणी रडत आहे असें त्यास ऐकूं आलें. एक तासानें जॉन्सन सर्वांगावर भाजलेला व ओलाचिंब असा बाहेर आला. एडवर्ड कॉलिन्स नांवाच्या इसमानें सर्व गोष्टी कबूल केल्या, म्हणून त्यास जाच झाला नाहीं. तथापि त्यासही प्रथम दुःख सहन करावें लागलें, व तें चुकवि-ण्याकरितां त्यानें सर्व कबूल केलें. हा क्रूरपणाचा प्रकार ता. १५ पासून ता. २३ पावेतों चालला होता. यातना चुकाव्या म्हणून बापडे एका तोंडानें सर्व बेत कबूल करीत व लगेच दुसऱ्या तोंडीं आम्ही खोटें बोललों असें म्हणत. जॉन वेद्रल ह्यास चार वेळां उलटें टांगलें. आपण काय बोलावें हें त्यास कळेना. कारण डच लोकांचे मनांत काय प्रकार सिद्ध करा-वयाचा आहे ह्याची त्यास खबरच नव्हती. शेवटीं पहिल्या साक्षी-दारांच्या जबान्या त्यास वाचून दाखविल्या, तेव्हां त्यानें सर्व गोष्टींस ‘ होकार ’ दिला. ‘ मला सांगा काय लिहूं तें व काय बोलूं तें, म्हणजे एकदम तसें करितों, ’ असें प्रत्येक इसम सांगे. जॉन क्लार्कनें इतक्या यातना सहन केल्या, कीं ‘ हा कोणी भूत आहे किंवा चेटकी आहे ’ असें डच लोकांस वाटलें, व त्यासाठीं त्यांनीं त्याची हजामत केली, जणूं काय त्याच्या केसांत चेटक भरलेलें होतें. नंतर पुनः त्याजवर प्रयोग चालविला. पायांस, हातांस, कोंपरावर व काखेंत मेणबत्त्यांचे चटके देऊन आंतील मांस बाहेर काढिलें. ह्या जखमा धुऊं देत नसत, किंवा त्यांस औषधपाणी करीत नसत. शेवटीं त्यांत किडे पडून ते

सर्वांगावर चालत व दुर्गंधी सुटे. अशा प्रकारचा क्रूरपणा केल्याचें डच न्यायाधीश कबूल करीत नाहींत, मात्र थोडाबहुत जाच केला असें मोघम म्हणतात. पण तेथें प्रत्यक्ष हजर असलेल्यांच्या तोंडून खरा प्रकार कधींच बाहेर आला आहे. प्रथम ते गुन्हेगारास हात उलटे वर करून दरवाज्यांत पक्ष्यासारखा लोंबत टांगीत. नंतर सर्व डोक्यावरून माने-पर्यंत रुमाल बांधीत. मग त्या रुमालावर हळूहळू पाणी ओतीत; त्यायोगें त्याचें अंग सुजून पहिल्याहून दुप्पट तिप्पट मोठें होई; व डोळे पुढें गळून पडल्यासारखे होत. सारांश जीव गुदमरून शरीर फुटण्याचे बेतांत येई. हा पाण्याचा प्रकार झाला. विस्तवाचा प्रकार असा, कीं मनुष्यास टांगल्यावर त्याच्या नाजूक भागांस विस्तव लावावयाचा. ह्याचा परिणाम वर सांगितलाच आहे. अशा प्रकारच्या यातनांमुळें त्या मंडळीपैकीं कोणांतच त्राण राहिलें नाहीं. अशा भयंकर प्रसंगांत इंग्रज लोक असतां, त्या सर्वांस इकडे पाठवून द्यावें म्हणून जावाच्या प्रेसिडेंटाचें पत्र आलें. गव्हर्नर स्प्युल्ट्नेंच कबूल केलें आहे, कीं हें पत्र आपण वाचलें. असें असून त्यानें पुढील कृष्णकृत्य केलें. पुढील व्यवस्था डच कायद्याप्रमाणें व्हावयाची ती झाली नाहीं. डच वकिलानें ह्या सर्वांस फांशीची शिक्षा द्यावी म्हणून जज्जापाशीं मागणी केली व ता. २३ फेब्रुवारी रोजीं थोडी मंडळी खेरीज करून बाकीच्या सर्वांस फांशीची शिक्षा सांगण्यांत आली. सदर गुप्त बेत झाला त्या वेळेस जे इंग्रज आंबोयना येथें नव्हते, त्या सर्वांस सोडून देण्यांत आलें. दुसऱ्या तिघांपैकीं प्रत्येकाच्या नांवानें चिठ्या टाकून बटेवियाच्या गव्हर्नर जनरलाकडे वाटेल ती शिक्षा करण्यास रवाना करण्यांत आलें. टॉवरसननें आपल्याला झालेल्या अन्यायाबद्दल एक वाक्य एका बिलावर हळूच एका बाजूस लिहिलेलें उपलब्ध झालें आहे. 'मी सर्वथैव निरपराधी आहे. परमेश्वर माझ्या

शत्रूंना क्षमा करो आणि मला आपल्या कृपाछत्राखालीं घेवो.' अशाच तऱ्हेचा आणखी पुरावा अनेक गुप्त रीतीनें ठेवलेला उघडकीस आला आहे. तारीख २६ फेब्रुवारी रोजीं किल्ल्याच्या दालनांत शिक्षा भोगण्यासाठीं त्यांना आणिलें. तेथून टॉवरसनला माराच्या खोलींत नेऊन दोन घागरी पाणीही आंत नेलें. तेथें त्याचा पुष्कळ छळ झाला. कारण टॉवरसन मुळींच कबूल होईना. इतरांचीही तीच अवस्था झाली. पुढें ती रात्र सर्वांनीं प्रार्थना करण्यांत घालविली. ता. २७ रोजीं दहा इंग्रज, नऊ जपानी आणि एक पोर्तुगीझ यांस शहरांतून मिरवीत वधस्थळीं आणिलें. तेथें दवंडी पिटवून लोकसमुदाय जमविला होता, तेथें त्या सर्वांचा शिरच्छेद करण्यांत आला. राहिलेल्या लोकांस बटेविया येथें रवाना केलें. याप्रमाणें मसाल्याच्या बेटांतील इंग्रजांची कारकीर्द संपली.

**९. सुडाची अनास्थाः**—आंबोयना येथील कत्तल व तिच्यापासून उत्पन्न होणारे राजकीय प्रश्न ह्यांविषयीं इंग्रजी भाषेंत इतके ग्रंथ व लेख लिहिलेले आहेत, कीं यूरोपच्या राजकीय घडामोडींत ह्या प्रश्नास इतकें महत्त्व मिळाल्याबद्दल आश्चर्य वाटतें. आंबोयनांतील अठरा इंग्रजांच्या कत्तलीपेक्षां ज्यास्त भयंकर प्रकार इंग्रजांनीं व इतर युरोपियनांनीं इकडे थोडेथोडके केले आहेत असें नाहीं. पण कातडीच्या वर्णभेदामुळें त्यांचें महत्त्व कमी झालें आहे. आंबोयनांतील भयंकर बनावाचा सूड अनेक कारणांमुळें मागें पडला. इंग्लंडास ही बातमी पोंचण्यास पंधरा महिने लागले ( मे १६२४ ). प्रथम हा प्रकार कोणास खराच वाटला नाहीं. पण पुढें जेव्हां पुराव्यानिशीं सर्व गोष्टी बाहेर आल्या तेव्हां तो कंपनीनें राजापुढें मांडिला. राजानें एकदम सूड घेण्याचा निश्चय केला. पण त्याच संधीस स्पेनच्या राजाशीं जेम्सचें फाटलें होतें, व हॉलंडचे वकील तह करण्याकरितां लंडनास आलेले होते.

अशा संधीस राजा जेम्स व कौन्सिल यांनीं लगेच आपले अश्रु पुसून डच वकिलांच्या हातांत हात घातले व स्नेह संपादिला. एवंच डच वकील सुद्धां, 'राजा किती थोर मनाचा आहे! त्यानें आंबोयना येथील क्रूरपणाविषयीं एक ब्र सुद्धां काढिला नाहीं, अशी जेम्सची स्तुति करीत स्वदेशीं परत गेले. परंतु सर्व इंग्रज राष्ट्र डच लोकांविरुद्ध खवळून गेलें होतें. कंपनीनें सूड घेण्याकरितां राजाला एक अर्ज केला व कांहीं मंडळी मुद्दाम जाऊन राजाला भेटली. तेव्हां राजाचाही इलाज चालेना. राजानें आपल्या हॉलंडच्या वकिलास लिहिलें, कीं 'डच सरकारापासून जाब मागवावा; नाहीं तर आम्ही वाटेल त्या डच लोकांचा शिरच्छेद करूं किंवा युद्ध सुरू करूं.' ह्या शब्दांनीं डच सरकाराची अगदीं तारांबळ उडून गेली होती. गव्हर्नर स्प्युल्टनें राष्ट्रावर नसतें संकट ओढून घेतलें म्हणून त्याजला डच सरकारनें ठपकाही दिला. परंतु जेम्सचें शौर्य डच लोकांस माहीत होतें. तो बोलण्यांत मोठा शूर, पण कृतींत नेभळा होता हें ते जाणत होते. म्हणून 'आज जबाब देतों, उद्यां देतों,' अशाखालीं त्यांनीं वेळ काढिला, व बटेविया येथें असलेल्या इंग्रजांस सुरक्षितपणें बाहेर पोंचवून दिलें. अशा वाटाघाटींत पांच सात महिने निघून गेले व जेम्स राजा मरण पावला, ( मार्च १६२५ ). इतक्यांत आंबोयनांतील खडानखडा हकीगत इंग्लंडांत सर्वतोमुखीं झाली. टॉवरसनची गोष्ट ऐकून तर लोकांस मोठाच कळवळा आला. इ. स. १६०४त टॉवरसन इंग्लंड सोडून बाहेर पडला असून, निरनिराळ्या ठिकाणीं अठरा वर्षें उत्तम प्रकारें काम केल्यावर आंबोयना येथें मोठा एजंट झाला. त्यास दरमहा १५० रुपये पगार मिळत होता. पण तो भोळा होता. त्यानें डच गव्हर्नर स्प्युल्टशीं दोस्ती संपादन केली, व आपलें सर्व हितगूज तो त्यास सांगूं लागला. इतकेंच नव्हे तर स्प्युल्टच्या सुस्वभावाची तारीफ तो

बटेव्हिया येथील इंग्रज प्रेसिडेंटास वारंवार लिहून पाठवीत असे. ' आपण स्प्युल्ट् ह्यास एक सलामालकीचें पत्र पाठवा व कांहीं दारूच्या बाटल्या नजर करा, ' असें त्यानें प्रेसिडेंटास लिहिलें. प्रेसिडेंटानें टॉवरसन यास जबाब पाठविला, कीं ' अशा बाबतींत स्प्युल्ट् चांगला दिसतो, पण तो आंतल्या गांठीचा आहे. त्यास आम्ही कांहीं नजर पाठविण्याची जरूरच नाहीं. पण तुम्ही मात्र त्याच्या गोड शब्दांनीं फसूं नका म्हणजे झालें.' दुसऱ्याच महिन्यास त्यास प्रेसिडेंटाचा हुकूम गेला, कीं ' तुम्ही आंबोयना सोडून निघून यावें. ' इकडे टॉवरसनचा भोळेपणा चालूच होता. अशा प्रकारच्या सुस्वभावी मनुष्याच्या घाताबद्दल लोकांस दुःख वाटणें साहजिकच आहे.

इकडे इंग्लंडांत आंबोयनाच्या कत्तलीचीं नाटकें सुरू झालीं व लंडनांतील डच लोकांस बाहेर पडण्याची भीति वाटूं लागली. अशा स्थितींत चार्लस् गादीवर आला. त्याच्या मनांत स्पेनचें वांकडें असल्यामुळें हॉलंडशीं स्नेह पाहिजे होता. म्हणून हॉलंडांतील इंग्रजांचा वकील सर डड्ले कार्ल्टन ( Sir Dudley Carleton ) ह्याजपुढें दोन विरुद्ध कामांची मोठी पंचाईत पडली. तेव्हां राजानें डच सरकारास आंबोयनाबद्दल जबाब देण्यास दीड वर्षाची मुदत दिली; व कशीतरी कंपनीची समजूत केली. ह्या दीड वर्षांत चार्लस्चें पार्लमेंटाशीं भांडण झालें व फ्रान्सशीं युद्ध सुरू झालें. अर्थात् आंबोयनाचें काम मागें पडलें. डच सरकारानें कोन यास पुनरपि गव्हर्नर जनरल नेमून पूर्वेकडे पाठविलें. पुनः इंग्रजांनीं त्यास आंबोयनाचें स्मरण दिल्यावर ' आम्ही तें सर्वच काम न्यायाच्या कोर्टांत पाठविलें आहे ' असा त्यांस जबाब मिळाला. अर्थात् ह्यापासून काहींच निष्पत्ति होण्याजोगी नव्हती. राजा व पार्लमेंट यांचें तिकडे इंग्लंडांत भांडण वाढतच चाललें व कंपनीची दाद कोठंच लागेना. क्षुल्लक प्रश्नांच्या

वाटाघाटींत वर्षेच्या वर्षे जाऊं लागलीं. आंबोयनांतील मुख्य गुन्हेगार अधिकारी हॉलंडांत आले व त्यांचा त्या राष्ट्रानें मोठा बहुमान केला.

आंबोयनाच्या घोर प्रकरणाबद्दल इंग्रजांस न्याय न मिळण्याचें मुख्य कारण स. १६१९ तला तह होय. दिवाणी फौजदारी दाव्यांसंबंधीं ह्या तहांत एक अक्षरही नव्हतें, व एकंदर तह घोटाळ्याचा होता. दुसरें कारण असें, कीं इंग्रजांची माहिती नेहमीं अपुरी असे; व डच लोक प्रत्येक कामांत पुरे वाकब असत. कोणाचा स्वभाव कसा आहे, कोणाची काय अडचण आहे, कोणता जवाब दिला असतां निसटून जातां येईल, हें सर्व त्यांस यथास्थित समजे. शिवाय डच लोकांची कंपनी म्हणजे सर्व डच सरकार, व डच सरकार म्हणजे डच राष्ट्र, असा प्रकार होता तो इंग्रजांकडे नव्हता. इंग्लंडांत कंपनीची काळजी कोणी करीत नसे. हा आंबोयनाचा प्रकार वाचून, राजकीय बाबतींत कसे प्रकार घडून येतात हें चांगलें कळून येईल. शिवाय त्या वेळचा युरोपचा कायदा व त्याची बजावणी ह्यांचा सुद्धां ह्या प्रकरणांत पुष्कळ संपर्क पोंचतो. लोकांचे हाल करून त्यांची कबुली घेणें हा प्रकार युरोपियन कायद्यांत त्या वेळीं प्रचलित होता. इंग्लंडांतही असे हाल करीत असत. राजा जेम्सनें तर अनेक प्रसंगीं ह्या प्रकाराचा उपयोग केलेला आहे. शिवाय त्या वेळच्या व्यापाराच्या पद्धतींत एकाच इसमास व्यापार, युद्ध, न्याय वगैरे निरनिराळीं कामें एका वेळीं करावीं लागत; व एका कामांतले रागद्वेष दुसऱ्या कामांत बाजूस ठेवणें संभवनीय नव्हतें. पण ह्याशिवाय इतर बाबतींतही डच कायद्याचा पूर्णपणें भंग झालेला आहे. मुख्य मुद्दा असा, कीं इंग्रज लोक पूर्णपणें निरपराधी आहेत हें सर्व डच मंडळीस ठाऊक होतें. ही गोष्ट डच दप्तरांतूनच सिद्ध होत आहे. ऐझॅक ब्रून नांवाचा डच अकाउंटंट आंबोयना येथें होता, त्याचें हें सर्व कृष्ण कृत्य होतें. व्हॅन स्प्युल्ट्‌ला सुद्धां आरंभीं जरी इंग्र-

जांचा संशय आला असला, तरी सर्व प्रकारचा तपास झाल्यावर त्याच्या मनांत इंग्रजांबद्दल कांहींच संशय उरला नव्हता. परंतु एकदां केलेला उपक्रम मागें घेण्याइतकें त्याच्यांत धाडस नव्हतें. सर्व इंग्रजांस बटेव्हिया येथें पाठवून द्यावें, ते आपखुशीनेंच आंबोयना सोडण्यास तयार आहेत, असें बटेव्हियाच्या प्रेसिडेंटानें स्प्युल्ट् ह्यास पाठविलेलें पत्र त्यानें छपवून ठेविलें, एवढीच गोष्ट त्याच्या दुष्ट स्वभावाची खात्री देण्यास पुरेशी आहे. ह्या प्रकरणाचा तपास होऊन इंग्रज न्यायासनासमोर आपणास साक्ष द्यावी लागेल अशी त्यास एकसारखी भीति वाटत होती, त्यामुळें आंबोयनांतील काम संपल्यावर तो गुप्तपणें युरोपांत येत होता. पण प्रवासांत असतांच तांबड्या समुद्रांत तो मरण पावला.

आंबोयनेंत येथील प्रकरणानंतर आपल्या राष्ट्रामार्फत ह्या घोर कृत्याचा सूड घेण्यांत येईल अशी वाट पहात सर्व इंग्रज लोक बटेव्हिया येथें बसले; व शेवटीं निराशेनें त्यांनीं ह्या दुष्ट लोकांची संगत कायमची सोडिली.

६. **डच लोकांच्या जुलमाची कमाल.**—येणेंप्रमाणें डच लोकांच्या भांडणांतील त्यांचे दोन मुख्य हेतु तडीस गेले. मसाल्याच्या बेटांतून इंग्रजांचा पाय निघाला व बटेव्हिया येथें त्यांचें वर्चस्व राहिलें नाहीं. हे हेतु तडीस नेण्यापुरताच त्यांचा दुष्टपणा होता. आंबोयना येथील प्रकरण खेरीज करून डच लोकांनीं कोणताही अत्याचार केलेला नाहीं. पुढेंही ते इंग्रजांशीं पूर्वीप्रमाणेंच सरळ वागूं लागले. तथापि व्यापाराचे संबंधानें दोन राष्ट्रांची झटापट एवढ्यानें तुटणारी नव्हती. स. १६२६त इंग्रज कंपनीनें बटेविया येथील आपली वखार बंद केली. तरी आंबोयना येथील प्रकरणाचा सूड घेण्याचा विचार इंग्रजांच्या मनांत मधून मधून उसळत असे. पहिल्या जेम्सला युद्ध करण्याची इच्छा नव्हती व पहिल्या चार्ल्सला सामर्थ्य नव्हतें. चार्ल्सचा शिरच्छेद झाल्यावर इंग्लंडचीं राज्यसूत्रें एका जबरदस्त पुरुषाचे हातीं गेलीं, तेव्हांच डच

लोकांनीं इंग्रजांस दाद दिली. तो पुरुष क्रॉम्वेल होय. सन १६५४त पांच महिन्याचे आंत क्रॉम्वेलनें सर्व प्रकरणाचा निकाल लावून घेतला. डच लोकांनी नुकसानीबद्दल साडेआठ लाख रुपये इंग्रजकंपनीस दिले; छत्तीस हजार रुपये मृतांच्या वारसांस दिले; व कुलारून बेट इंग्रजांस मिळालें. तरी इंग्रजांच्या मनांतील दंश गेला नाहीं. म्हणून पुढील शेंपन्नास वर्षांत या दोन प्रॉटेस्टंट राष्ट्रांचा स्नेह जमला नाहीं. त्यामुळें युरोपच्या घडामोडींस निराळें वळण लागलें. त्यांचा स्नेह जुळता तर फ्रान्सचा चौदावा लुई इतका शिरजोर झाला नसता, दुसऱ्या चार्ल्स राजास फ्रान्सचा मिंधा होऊन राहवें लागलें नसतें, व दुसऱ्या जेम्स राजास इंग्लंडांत जुल्म करण्याची छाती झाली नसती. अर्थात् १६८८तील इंग्लंडांतील राज्यक्रान्तीचें अंतस्थ कारण ही आंबोयनाची कत्तल होय. इकडे व्यापाराच्या संबंधांत डच लोकांची हांव इतकी अनावर झाली कीं, त्या योगानें त्यांनीं पूर्वेकडील समुद्रांत केलेल्या क्रूर कृत्यांपुढें मलबार किनाऱ्यावरील पोर्तुगीझ क्रिस्त्यांचे जुल्म कांहींच नव्हत असें म्हटलें पाहिजे. स्पेन, पोर्तुगाल, व इंग्लंड या सर्वांनींच इकडे थोडेंबहुत क्रूर आचरण केलेलें आहे. तथापि पूर्वद्वीपसमूहाचा गड्डा आयताच डच लोकांच्या हातास लागल्यामुळें, व हिंदुस्थानांतील मोगल बादशाहीप्रमाणें तिकडे कोणतेंहि मजबूत राज्य नसल्यामुळें, डच लोकांच्या हातून भयंकर अनर्थ झाले. व्यापार करण्यास पैसा पाहिजे व पैशासाठीं राज्य पाहिजे, ही परंपरा पोर्तुगीझ लोकांप्रमाणेंच डच लोकांस जरूर वाटली. पोर्तुगीझांचा शहाणा सरदार आल्बुकर्क यानें ती जरूर भागविण्याचा प्रयत्न केला; पण त्यास युरोपांतील सरकाराचें पाठबळ नसल्यामुळें यावें तसें यश आलें नाहीं. तीच गोष्ट डच सरदार कोन यानें तडीस नेली. त्यास संपूर्ण डच राष्ट्राचें पाठबळ मिळालें. युरोपांतील बायकापुरुष आणून इकडे स्वतःच्या वसाहती तयार करावयाच्या,

ही कल्पना कितीही सुंदर असली तरी ती शक्य नाहीं असें अलीकडे सिद्ध झालें आहे. पण कोनला हें त्या वेळेसच कळून चुकलें होतें. यासाठीं जितके मिळतील तितके पूर्वेकडील मजूर लोक मिळविण्याचा त्यानें यत्न केला. ह्यासाठीं ( १ ) बेटांत सांपडलेल्या लोकांस त्यानें गुलाम केलें; ( २ ) आफ्रिका व आशिया खंडांतील देशांतून मिळतील तितके गुलाम आणविण्याची त्यानें तजवीज केली; व ( ३ ) रस्त्यांत सांपडतील तितके लोक आणून तो ह्या बेटांत भरूं लागला. ह्या तीन गोष्टींवरून पोर्तुगीझ लोकांचा जुलूम व डच लोकांचा जुलूम यांजमधील अंतर कळण्याजोगें आहे. पोर्तुगीझ लोकांनीं नुसते देश जिंकिले; पण डच लोकांनीं देश जिंकून सर्व लोकांस गुलाम बनविलें. पोर्तुगीझ लोक दुसऱ्या लोकांनीं आणिलेले गुलाम विकत घेत. पण डच लोकांनीं या कामाकरितां सर्व समुद्रांत फिरतीं आरमारें ठेविलीं होतीं. अशा रीतीनें त्यांनीं असंख्य लोक गोळा केले. तिसरा प्रकार तर मोठा चमत्कारिक आहे. पूर्वेकडील चीन वगैरेच्या किनाऱ्यावर हत्यारबंद माणसें पाठवून वाटेल त्या लोकांस पकडून आणण्याचा क्रम किती निंद्य आहे याची कल्पनाच केली पाहिजे! इतक्या लोकांची मजुरी व वाटेल तितकी जमीन फुकट मिळाल्यामुळें मसाल्याचीं झाडें लावून त्यांत डच राष्ट्रास अपरिमित फायदा करून घेतां आला. उगाच कोठें थोड्याशा इंग्रजांची आडकाठी असे, तीही आंबोयनाच्या प्रकारानें बंद झाली. कोणाही तद्देशीयास ते लहानसा रोपटाही लावूं देत नसत. अशा रीतीनें सर्व लोकांपासून कसोशीनें श्रम घेऊन उष्ण कटिबंधांतील अतिसुपीक जमीन या राष्ट्रानें शेकडों वर्षें पिकवून खाल्ली, हा केवढा फायदा, आणि लोकांवर केवढा नाहक जुलूम !!!

एवढ्यावरच कोनच्या युक्त्या संपल्या नाहींत. त्यानें तिकडे व्यवस्थेशीर राज्यपद्धत सुरू केली; व किनाऱ्याकिनाऱ्याचा सर्व व्यापार आपल्या

ताब्यांत घेतला. तसेंच ठिकठिकाणीं पद्धतशीर जकाती व कर बसवून आफ्रिका, यूरोप आणि आशिया येथील बहुतेक सर्व ठिकाणीं मालाची नेआण जलमार्गानें चालविली. पूर्वद्वीपसमूहाचें हातीं लागलेलें राज्य थोड्या खर्चांत किल्ले वगैरे बांधून त्यानें मजबूत केलें. येणेंकरून इकडे आलेल्या तत्कालीन युरोपीय मुत्सद्यांमध्यें, आरंभीं पोर्तुगीझांचा आल्बुकर्क व शेवटास फ्रेंचांचा डुप्ले यांच्या मध्यभागीं कोन हा विलक्षण धूर्त, हुशार व दूरदृष्टि पुरुष दिसून येतो. तसेंच अत्यंत पाषाणहृदयी असेंही विशेषण त्यास दिलें पाहिजे. कारण मानवी दुःखाविषयीं इतका बेफिकीरपणा दुसऱ्या कोणीं दाखविला नसेल. हा बेफिकीरपणा कोननें कायदेशीर केला, व तो जो एकदां डच राष्ट्रांत शिरला त्या योगानें बहुतेक युरोपियन राष्ट्रें प्राच्य लोकांसंबंधानें अगदीं अंध होऊन गेलीं. याचा दाखला युरोपांतील तीस वर्षांच्या युद्धांत उत्कृष्ट दिसून येतो.

पूर्वसमुद्रांत ज्या युरोपियन राष्ट्रांनीं पाय ठेविला त्यांपैकीं एका विशिष्ट व व्यवस्थित पद्धतीनें काम चालविणारें हें एक डच राष्ट्र होय. पूर्वेकडील व्यापार ही सर्व राष्ट्राची किफायत होय असें ह्या राष्ट्रास वाटत होतें. त्यासाठीं वाटेल तो स्वार्थत्याग करण्यास व वाटेल तो अन्याय करून त्याजवर पांघरूण घालण्यास तें राष्ट्र तयार होतें. तो प्रकार इंग्रज राष्ट्रानें त्या वेळीं उचलला नव्हता. कंपनी मेली कीं जिवंत आहे याची पार्लमेंटास पर्वा नव्हती. म्हणून कोनसारखा उपद्व्यापीपणा करण्यास क्लाइव्ह, हेस्टिंग्जसारखे इंग्रज कामगार पुढें आले नव्हते, तोंपर्यंत इंग्रजांचें पाऊल पुढें पडलें नाहीं. अर्थात् राज्य व व्यापार यांची प्राप्ति म्हणजे केवढा अकल्प्य उपद्व्याप, व केवढी पाषाणहृदयी खटाटोप आहे, एवढें जरी आपण या इतिहासापासून उमजलों तरी पुरे आहे. बाकी हिंदुस्थानांतील इंग्रजांच्या कृत्यांचा खरा इतिहास आपणांस कळण्याची आज जर इतकी मारामार पडत आहे, तर मग त्या दूरच्या

पूर्वद्वीपसमूहांतील लोकांची काय दशा झाली असेल! लहान लहान बेटें एकमेकांपासून अलग असल्यामुळें, लोकांत राष्ट्रीयत्व व समुदायशक्ति नसल्यामुळें व त्यांच्या अज्ञानांमुळें, त्यांजवर डच लोकांच्या अमदानींत जे दुर्धर प्रसंग ओढवले असतील किंवा आले असतील त्यांची हकीगत कागदावर असणेंच जर अशक्य आहे, तर मग ती बाहेर येण्याचा संभव कोठून असणार? आपल्याच उदाहरणावरून आपण त्यांची कल्पना केली म्हणजे पुरे. बाकी ज्या गोष्टी आपणांस कळत नाहींत त्या घडल्याच नाहींत असें मात्र नाहीं.

**७. डच लोकांच्या ऱ्हासाचीं कारणें.**—ऑस्ट्रेलियाचें मोठें द्वीप डच लोकांनींच शोधून काढिलें; त्यास त्यांनीं न्युहॉलंड असें नांव दिलें होतें. स. १६३५त डच लोकांनीं फोर्मोसा बेट पोर्तुगीझ लोकांपासून काबीज केलें; व स. १६३८त सीलोन बेटांत ह्या दोन राष्ट्रांचा संग्राम सुरू होऊन स. १६५८त तें बेट डच लोकांस मिळालें. स. १६६१ पासून ६४ पावेतों मलबार किनाऱ्यावरील कोलम, कोचिन, काननूर व क्रांगानूर हीं स्थळें त्यांस मिळालीं. स. १६६९त सेंट टॉमे व सेलिबीझ बेटाच्या पश्चिम किनाऱ्यावरील मॅकासर हीं ठिकाणें त्यांस मिळालीं. स. १६८२त इंग्रजांपासून बँटम त्यांस मिळाल्यापासून सयाम, टांकिन, अमोय वगैरे पूर्वेकडील ठिकाणांच्या आपल्या सर्व वखारी इंग्रजांस उठवाव्या लागल्या. स. १७५९त डच लोकांनीं बंगाल्यांतून इंग्रजांस घालविण्याचा जबर प्रयत्न केला; पण कर्नल फोर्ड यानें त्यांचा चांगलाच समाचार घेतल्यावर, बंगाल्यांत डच लोकांचे १२५ पेक्षां ज्यास्त लष्करी लोक राहूं नयेत असें ठरलें. पुढें डच व इंग्रज ह्यांमध्यें अनेक भानगडी झाल्या. हल्लीं पूर्वेकडील प्रदेशांत खालील ठिकाणें त्यांच्या ताब्यांत आहेत. जावा, सुमात्रा, बांका, बोर्निओ, सेलिबीझ, मोलक्का ऊर्फ मसाल्याचीं बेटें, तिमोर, न्युगिनी इत्यादि.

हळू हळू इतर दर्यावर्दी राष्ट्रें व्यापारांत पुढें सरसावलीं. पूर्वींचा व्यापार सत्तेच्या व बळजबरीच्या तत्त्वांवर चालू होता. पण अर्थशास्त्राची वृद्धि होऊन व्यापाराचीं तत्त्वें बदललीं तरी डच लोकांनीं नवीन स्थित्यनुरूप आपली व्यापारपद्धति बदलली नाहीं, त्यामुळें त्यांच्या हातचा व्यापार गेला व त्याबरोबरच बरेचसें राज्यही गेलें. मसाल्याच्या व्यापाराकरितां त्यांनीं आपलें मुख्य ठिकाण दूरच्या आंबोयना बेटांत केलें, तें कोननें बदलून बटेव्हिया येथें आणिलें. तरी मसाल्याच्या व्यापारांत त्यांचा दुर्लौकिक झाला. नुसत्या मसाल्यावर उपजीविका होण्याचे दिवस गेले. युरोपांत फ्रेंच, जर्मन, इंग्रज वगैरे राष्ट्रें कालदेशवर्तमानानुरूप राजकीय व व्यापाराच्या वगैरे बाबतींत पुढें सरसावत असतां, डच लोकांनीं आपला जुना हटवादीपणा सोडिला नाहीं. इतरांबरोबर आपणही पुढें सरण्याची पर्वा त्यांनीं केली नाहीं. अर्थात् ते युरोपांत एकलकोंड्यासारखे राहिले; त्यांनीं आपल्या राज्यांत परदेशांच्या जहाजांस रिघाव दिला नाहीं. आपल्या नद्यांतून व कालव्यांतून अन्य लोकांस येऊं दिलें नाहीं; यामुळें त्यांचें अतोनात नुकसान झालें. त्यांचें व जर्मनीचें ऐक्य होणें सुलभ होतें. तें झालें असतें तर इंग्रजांस आशियाखंडांत थारा झाला नसता. शिवाय डच राष्ट्रांत लोक फार थोडे होते व त्यांच्या पूर्वेकडील राज्याचा पाया अगदींच आकुंचित होता. अखेरीस ते इंग्लंडशीं टिकाव धरूं शकले नाहींत. तसेंच त्यांचा व इंग्रजांचा शेंपन्नास वर्षें झगडा झाला, त्यांत त्या वेळीं इंग्लंडास कितीही त्रास पोंचला तरी अंतीं इंग्रजांचा फायदाच झाला. कारण डच लोकांचा जाच चुकविण्याकरितां त्यांनीं या पूर्वद्वीपसमुद्रांतून पळ काढिला, म्हणूनच हिंदुस्थानांत त्यांची राज्यस्थापना शक्य झाली. हिंदुस्थान हातीं आल्यामुळें पूर्वेकडील सर्वच व्यापार इंग्रजांच्या ताब्यांत गेला. कोणींही विपत्तींत डगमगूं नये; धैर्य धरून वागलें असतां

शेवटीं यशःप्राप्ति झाल्यावांचून राहत नाहीं हें इंग्रज व डच ह्यांच्या या झगड्यापासून शिकतां येण्यासारखें आहे; तसेंच हे राष्ट्रीय उदय व ऱ्हास प्रत्येकानें समजून घेण्यासारखे आहेत.

**७. डच नोकरांचे पगार.**—डच लोकांनीं पूर्वेकडील बेटांत आपल्या व्यापाराची व राज्याची व्यवस्था केली, तीच पुढें बहुतेक इंग्रज कंपनीनें हिंदुस्थानांत उचलली ती व्यवस्था येणेंप्रमाणें—

डच लोकांच्या कारभारांत १३ प्रकारचे नोकर होते:—

| प्रकार. | नांव. | पगार दरमहा †गिल्डर्स. | भोजनाबद्दल †डॉलर्स. |
|---|---|---|---|
| पहिला. | कारकून रायटर, सोल्जरपैकीं. | ९ ते १४ | |
| दुसरा. | †अंडर असिस्टंट. .... | २० | ४ |
| तिसरा. | †अपर असिस्टंट. .... | २८ ते ३१ | ४ |
| चवथा. | अंडरमर्चंट. .... | ३६ ते ४५ | ८ |
| पांचवा. | मर्चंट ( व्यापारी ). .... | ५० ते ६५ | ८ |
| सहावा. | अपर मर्चंट. .... | ८० ते १२० | १२ |
| सातवा. | कमोडोर (स्टेट सेक्रेटरी).... | १५० | २० |
| आठवा. | डायरेक्टर. .... | २०० | ३० |
| नववा. | गव्हर्नर. .... | | ३० |
| दहावा. | मेंबर्स एक्स्ट्रा ऑर्डिनरी काउ० | २०० | |
| ११ वा. | बटेव्हियाचें काउन्सिल मेंबर्स. | ३५० | १०० |
| बारावा. | डायरेक्टरजनरल बटे.चा दुय्यम. | ६०० | १०० |
| तेरावा. | गव्हर्नरजनरल ऑफ् बटेव्हिया. | १२०० | २०० |

† गिल्डर=सवा रुपया, व डॉलर=तीन रुपये, अंडर म्ह० खालचा, अपर म्ह० वरचा.

डच ले.कं.च्या लष्करी नोकरींत खालील प्रकार असत.

| प्रकार. | नांव. | पगार दरमहा गिल्डर्स. | भोजनाबद्दल डॉलर्स. |
|---|---|---|---|
| पहिला. | प्रायव्हेट, अंडर असिस्टंट.... | २० | ४ |
| दुसरा. | सार्जंट .... .... .... | २८ ते ३६ | ४ |
| तिसरा. | एनसाइन (अंडर मर्चंट).... | ३६ ते ४५ | ८ |
| चवथा. | लेफ्टेनंट (मर्चंट प्रमाणें).... | ६० ते ६९ | ८ |
| पांचवा. | कॅप्टन ( अपर मर्चंट ) .... | ८०–१२० | १२ |
| सहावा. | मेजर ( कमोडोर प्रमाणें ).... | १९० | २० |

ह्यांशिवाय गव्हर्नर जनरल ह्यास सर्व कच्चा खर्च मिळत असे. तसेंच सर्व नोकरांस दरमहा दारू, मसाले, तेल, लांकडें, तांदूळ, आंब, मेणबत्या, ह्या जिनसा दरजाप्रमाणें देण्याची वहिवाट असे. विलायतेहून नवीन दारू येण्याची सर्व लोक वाट पाहत असत. ह्याप्रमाणें कच्चा शिधा देऊन शिवाय प्रत्येकास स्वतःच्या सोयीसाठीं वर लिहिलेला भोजनाचा खर्च म्हणून ठरवून दिलेला असे.

वसाहतीच्या आरमारांतील नोकरांचे प्रकारही सहा होते; व त्यांचे प्रकार जवळजवळ वरच्यासारखेच होते.

पाद्री दोन प्रकारचे होते. एक आजारी माणसांचे शुश्रूषक,—त्यांस पगार वरच्या असिस्टंट सारखा व प्रार्थक म्ह० प्रार्थना करणारे, त्यांस

पगार अपरमर्चंट प्रमाणें. शस्त्रवैद्य म्ह० सर्जन ह्यांसही अपरमर्चंट-प्रमाणें पगार असत.

हिंदुस्थानांतील सिव्हिल सर्विस नामक नोकरांची मालिका ह्याच पायावर रचलेली आहे असें दिसून येईल. नोकरी झाल्यावर पेन्शन देणें किंवा मयत नोकरांच्या बायकामुलांस तनखा करून देणें ही व्यवस्था इंग्रजांनीं डच लोकांपासूनच घेतलेली आहे. ही नोकरांच्या मनांत राजनिष्ठा उत्पन्न करण्यास चांगलें साधन असून, तिच्यावर हल्लींही राज्यकर्त्यांची पुष्कळ भिस्त आहे.

---

# प्रकरण आठवें.

## ईस्ट–इंडिया–कंपनीची स्थापना.

### सन १६००.

१. अमेरिका व पॅसिफिकमहासागर ह्यांचे शोध. २. पहिली पृथ्वीप्रदक्षिणा.
३. एलिझाबेथ राणीचे घाडशी खलाशी. ४. फादर स्टीफन व रॉल्फ् फिच्च्.
५. कंपनी स्थापण्याचा उपक्रम. ६. पहिली बैठक.
७. सनद मिळविण्याची खटपट. ८. ह्या उद्योगाविषयीं स्फुट विचार.

**१. अमेरिका व पॅसिफिक महासागर ह्यांचे शोध.**—पंधराव्या शतकांत युरोपांत अनेक महत्त्वाच्या गोष्टी घडून आल्या. छापण्याची कला निघाली, व कांस्टांटिनोपल तुर्कांच्या हातांत पडल्यामुळें, तेथचे ग्रीक व लॅटिन पंडित पश्चिमेकडील देशांत आले. तेणेंकरून जुन्या विद्यांस पुनरुज्जीवन मिळून युरोपांत नवीन जागृति उत्पन्न झाली. तेव्हां सर्व विषयांत नवीन विचार व नवीन शोध सुरू झाले. त्यांत नौकाशास्त्रांत पोर्तुगालच्या राष्ट्रानें कशी आघाडी मारिली हें मागें

सांगितलेंच आहे. कोलंबसानें अटलांटिक महासागरांत अनेक सफरी केल्या, पण त्यास अमेरिकेच्या किनाऱ्याजवळचीं बेटें मात्र सांपडलीं, मुख्य महाद्वीपास त्याचा पाय लागला नाहीं. कोपर्निकस वगैरे अनेक विद्वान शोधकांचें मत पृथ्वी गोलाकार आहे असेंच होतें. पण ही गोष्ट सामान्य जनसमूहास खरी वाटत नव्हती. इकडे वास्को ड गामा ह्यास हिंदुस्थानास येण्याचा समुद्रमार्ग सांपडला, तरी पृथ्वी गोल आहे हें सिद्ध झालें नाहीं. मात्र पूर्वेकडे मसाल्याचीं बेटें आहेत, तीं आपल्या ताब्यांत असावीं असें पुष्कळांस वाटूं लागलें. स. १५०९ त हीं बेटें शोधून काढण्याचा स्पेनच्या दरबारांत निश्चय झाला. तदनुसार स्पेनचीं जहाजें बाहेर जाऊन दक्षिण अमेरिकेचा कांहीं किनारा शोधून परत आलीं. इंग्लंडचेही प्रयत्न चालू होते. इंग्लंडचा राजा सातवा हेन्री यानें आपल्या खलाशांस सनदा दिल्या, त्यांत पोर्तुगीझ लोकांशीं तंटा करूं नये असें त्यानें फर्माविलें होतें. हिंदुस्थानास जाण्याचा वायव्य दिशेकडून दुसराच समुद्रमार्ग शोधून काढण्याची इंग्रजांनीं खटपट चालविली. कोलंबसानें शोधून काढिलेलें क्यूबाबेट हेंच जपानचा पूर्वकिनारा होय असें इंग्रजांस वाटलें. पोपाच्या हुकुमांत पूर्व व पश्चिम हे शब्द अनेक वेळां वापरले असून त्यांत उत्तर हा शब्द नव्हता; तेव्हां उत्तरेकडून आपण हिंदुस्थानास गेल्यास पोपाचा हुकूम न मोडतां आपलें काम होईल असें इंग्रज खलाशांस वाटलें. त्या वेळीं ब्रिस्टल शहर भरभराटींत असून दर्यावर्दी कामांत तेथचे व्यापारी व खलाशी विशेष प्रमुख होते. केबो (Cabot) नांवाच्या दोन व्यापाऱ्यांस सन १४९७त सातव्या हेन्रीनें मदत देऊन हिंदुस्थानचा मार्ग शोधून काढण्यास पाठविलें. जॉन केबो हा जिनोआचा व्यापारी लिस्बन पासून मक्केपर्यंत प्रवास करून इंग्लंडांत वास्तव्य करून राहिला होता. सन १४९७त आपला मुलगा सबा-

इशन यास बरोबर घेऊन तो ब्रिस्टल सोडून निघाला. त्याजबरोबर एक जहाज व अठरा खलाशी होते. एक महिन्यानें ते न्यूफाउन्डलन्डच्या किनाऱ्यावर आले. तेव्हां त्यांस वाटलें, कीं आपणांस चीनचा किनारा सांपडला. परत येऊन ही गोष्ट त्यांनीं राजास निवेदन केली. तेव्हां जॉन केबोचा मोठा सन्मान करण्यांत आला. त्यानंतर सबाश्शन केबोनें अमेरिकेपर्यंत तीन सफरी केल्या; व दरखेपेस कांहीं तरी नवीन प्रदेशाचा शोध लावून तो परत आला. लाब्राडोरच्या किनाऱ्यावर त्याची बरीच वाताहत झाली. केबोच्या शोधांचा उपयोग इंग्लंडास फारसा झाला नाहीं.

**अमेरिगो व्हेस्पची** (Amerigo Vespucci) नांवाचा एक इटालियन गृहस्थ कोलंबसाच्या सफरींत होता. कोलंबसाबरोबर तो परत न येतां नवीन सांपडलेल्या बेटांत राहून किनाऱ्याकिनाऱ्यानें नवीन भूप्रदेशांचा शोध लावीत होता. किनाऱ्यावर एका ठिकाणीं मोठमोठ्या झाडांवर पूल करून त्याजवर घरें बांधलेलीं, असें एक गांव त्यास आढळलें. तीं झाडें पाण्यांत उगवलेलीं असल्यामुळें, एका घरांतून दुसऱ्या घरास जाण्यास, युरोपांतील व्हेनिस शहराप्रमाणें जलमार्ग होते. हें एक लहानसें व्हेनिसच आहे असें समजून त्यास अमेरिगोनें व्हेनिझूला ( लहान व्हेनिस ) असें नांव दिलें, तें अद्यापि चालत आहे. कोलंबस मरण पावल्यावर अमेरिगोनें व इतर गृहस्थांनीं नवीन भूप्रदेशांत सफरी केल्या व शोध लाविले, त्यांवरून त्यांची अशी खात्री झाली, कीं आपणास सांपडलेली भूमि ही कांहीं मार्कोपोलोचा चीन देश नव्हे, व वास्को ड गामाचा हिंदुस्थानही नव्हे, हें एक नवीनच खंड असावें. ह्या तर्कास अमेरिगोनें पुष्कळ प्रमाणें दिलीं होतीं. त्यानें पाठविलेलें पत्र इटालियन भाषेमध्यें होतें. त्याचीं लगेच लॅटीन व इतर भाषांत भाषांतरें झालीं,

व अमेरिगो म्हणतो ही गोष्ट खरी आहे अशी लोकांची खात्री होऊन, पूर्वींच्या लोकांस माहीत नसलेलें एक नवीन खंड उपलब्ध झालें व तें अमेरिगोच्या माहितीनें लोकांस कळलें, म्हणून त्याच्याच नांवावरून अमेरिका हें नांव त्या खंडास पडलें. तथापि कोलंबस, केबो व अमेरिगो ह्यांनीं शोधून काढलेले प्रदेश एकच महाद्वीप होत. हें समजण्यास बरेच दिवस लागले.

त्या वेळच्या एक एक शोधांच्या हकीगती वाचल्या म्हणजे आश्चर्य वाटतें. पॅसिफिक महासागर युरोपियनांस ठाऊक नव्हता, तो मोठ्या चमत्कारिक रीतीनें ठाऊक झाला. पंधराव्या शतकाच्या आरंभापासून अमेरिकेबद्दल सर्व लोकांत चर्चा सुरू होऊन एकामागून एक हजारों जहाजें तिकडे जाऊं लागलीं. एकदां स्पेन देशाहून कांहीं लोक हेटीबेटांत वसाहत करण्यासाठीं गेले. त्यांत बाल्बोआ नांवाचा गृहस्थ होता. तेथें लवकरच तो कर्जबाजारी झाला. कर्ज झालेल्या मनुष्यास बाहेर जाऊं द्यावयाचें नाहीं असा स्पेनचा कायदा असल्यामुळें त्यास हेटीबेटांतून बाहेर निघतां येईना. तेव्हां तो एका गलबतावरील रिकाम्या पिपांत लपून बसला व बाहेर पडला. गलबत बरेंच समुद्रांत आल्यावर त्याचा तपास लागला. कांहीं वेळानें तें गलबत एका खडकावर आपटून फुटलें. ह्या कठीण प्रसंगीं बाल्बोआचा धूड स्वभाव कामास आला. वांचलेल्या लोकांस त्यानें डारियननजीक एका रानटी लोकांच्या खेड्यांत आणिलें. हें गांव पनामा संयोगिभूमीच्या अरुंद पट्टीवर होतें. तेथें वसाहत करून ते सर्व लोक राहिले व बाल्बोआ त्यांचा मुख्य झाला. तेथच्या रहिवाशी लोकांशीं सख्य संपादून व सोन्याच्या खाणींचें वगैरे काम करून बाल्बोआ आसपासच्या प्रदेशाचा शोध लावीत होता. ऐके दिवशीं स्पेनचे दोन गृहस्थ सोनें विभागून घेत असतां भांडूं लागले. त्या वेळीं तेथें तद्देशीय लोकांचा सरदार होता

तो सहज म्हणाला, 'बाबांनो एवढ्याशा सोन्यासाठीं भांडता कां? तुम्हाला सोनेंच पाहिजे असेल तर येथून दक्षिणेस एक मोठा देश आहे तेथें वाटेल तितकें सोनें आहे, जा आणि पाहिजे तितकें घ्या. येथून दक्षिणच्या बाजूस जवळच मोठा समुद्र आहे, तेथें जहाजांत बसून त्या सुवर्णमय ( पेरु ) देशास तुम्हांला जातां येईल.' दक्षिणेस समुद्र आहे हें ऐकून बाल्बोआस अचंबा वाटला. लगेच कांहीं लोक बरोबर घेऊन तो निघाला. मध्यें उंच पर्वताची ओळ आगली तिजवर तो मोठ्या प्रयासानें चढला. शिखरावर गेल्यावर त्यास तोंडासमोर एक मोठा प्रचंड महासागर दिसला. त्या वेळीं त्यास जो अचंबा वाटला त्याचें काय वर्णन करावें? लगेच त्यानें गुडघे टेकून प्रार्थना केली. त्या जागीं त्यानें एक दगडाचा क्रूस उभारला व स्पेनच्या राजाच्या नावानें त्या प्रदेशाचा ताबा घेतला. नंतर पलीकडच्या बाजूस खालीं उतरून नागव्या तलवारीनिशीं कमरेइतक्या पाण्यांत जाऊन त्यानें महासागराचा ताबा घेतला. ही गोष्ट ता. १३ सेप्टेंबर, सन १५१३ रोजीं घडली. ह्या शोधानें अमेरिका हें एक स्वतंत्र खंड आहे व त्याच्या पश्चिमेस मोठा महासागर असून त्याच्या पलीकडे आशियाखंड आहे हें सिद्ध झालें. त्याच वर्षी सोलिस नांवाचा एक खलाशी शोधास गेला असतां रिओ प्लॉटा नदीच्या मुखांतून आंत शिरला. तेथें तो व त्याचे आठ साथीदार यांस किनाऱ्यावरील तद्देशीय लोकांनीं कापून भाजून खाल्लें, तेव्हां पुढें जाण्याचें कोणास धैर्य होईना.

२. **पहिली पृथ्वीप्रदक्षिणा.**—मॅगेलन नांवाचा एक पोर्तुगीझ खलाशी होता. तो अल्बुकर्कबरोबर गोव्यास जाऊन तेथून पूर्वेकडील द्वीपसमूहांत प्रवास करीत गेला. तेथें तद्देशीयांशीं लढण्यांत त्यानें आपला हूडपणा व्यक्त केला. तेथून पोर्तुगाल देशास परत आल्यावर त्यास असें वाटलें, कीं आपण पश्चिम दिशेनें थेट पुढें गेलों

तर त्याच पूर्वेकडील बेटांस पोंचूं; कारण अटलांटिक महासागरांतून हिंदी महासागरांत उतरण्यास कोठें तरी जलमार्ग असला पाहिजे. हा शोध तडीस नेण्यास पोर्तुगालच्या राजानें त्यास मदत केली नाहीं. तेव्हां तो स्पेनच्या राजाकडे गेला. तेथें त्यास मदत मिळाली. ता. २० सेप्टेंबर १५१९ रोजीं मोडकीं तोडकीं पांच गलबतें घेऊन मॅगेलन निघाला. बरोबर दोनशें ऐशीं लोक होते. तीन महिन्यांनीं ते ब्राझील देशास पोंहोचले. तेथें बरोबरच्या लोकांनीं बंड केलें. तें मोठ्या धैर्यानें मोडून मॅगेलन पुढें निघाला. पुढें त्यास लाप्लॅटा नदीचें मुख लागलें. तेव्हां येथें पलीकडे जाण्यास रस्ता आहे असें त्यास वाटलें. थोडेसें आंत गेल्यावर ही नदी असून समुद्र नव्हे असें त्यास आढळून आलें. तेव्हां परत येऊन पुनः तो दक्षिणेस चालूं लागला. बाल्बोआस सांपडलेल्या समुद्रांत उतरण्याचा त्याचा विचार होता. जातां जातां थंडी फार लागूं लागली. पुढें जाण्यास कोणी धजेना. अन्नसामुग्री संपली. कातड्याचीं दोरखंडें कुरतडून खाण्याचा प्रसंग आला. अशा रीतीनें जातां जातां ते एका चिंचोळ्या सामुद्रधुनींत शिरले. उजव्या हातच्या जमिनीचें टोक ओलांडून पुढें जातात तों एका मोठ्या शांत समुद्रांत त्यांचा प्रवेश झाला, ( ता. २८ नोव्हेंबर सन १५२० ). इतके दिवस वादळें वगैरे सहन करून आतां शांत समुद्र त्यास लागला, म्हणून त्यास त्यांनीं पॅसिफिक महासागर असें नांव दिलें. मॅगेलनजवळ आतां फक्त तीन जहाजें राहिलीं होतीं. तीं घेऊन थोडेंसें उत्तरेकडे जाऊन पुनः त्यानें पश्चिमेकडे कूच केलें. आठवड्याचे आठवडे, महिन्याचे महिने गेले, तरी जमनीचा ठिकाण लागेना. चामड्याचीं दोरखंडें पाण्यांत मऊ करून ते खाऊं लागले. त्यामुळें पुष्कळ लोक मरण पावले. कांहीं झालें तरी मॅगेलन परत फिरेना. अठ्याण्णव दिवसांनीं त्यास कांहीं बेटें लागलीं. तेथें त्यास कांहीं ताजीं फळें व भाज्या मिळून थोडासा दम आला.

दहा दिवस विश्रांति घेऊन ते पुढें निघाले. लौकरच त्यांस आणखी पुष्कळ बेटें लागलीं. तीं स्पेनच्या नांवानें मॅगेलननें ताब्यांत घेतलीं. पुढें सहा वर्षांनीं जन्मास आलेला स्पेनचा राजा फिलिप ह्याच्या नांवावरून त्या बेटांस फिलिपाईन आयलन्डस् असें नांव मिळालें. ह्या बेटांत मॅगेलन यास चिनी व्यापारी मसाले वगैरे घेऊन आलेले आढळले. त्यावरून मसाल्यांचीं बेटें आतां जवळच असलीं पाहिजेत अशी मॅगेलनची खात्री झाली. स्वतः मॅगेलन कमी उपद्व्यापी नव्हता. असल्या सफरींतही लोकांचीं राज्यें घेणें, त्यांस बाटवून ख्रिस्ती करणें, हीं कामें तो करूं लागला. एका राजापाशीं त्यानें स्पेनकरतां खंडणी मागितली. ती राजानें नाकबूल केल्यामुळें अठ्ठेचाळीस लोक बरोबर घेऊन मॅगलन जमिनीवर उतरला. त्यांजवर हजारों लोक हातांत भाले घेऊन चालून आले. त्यांजबरोबर लढतांना मॅगेलन मरण पावला, (ता. २७, एप्रिल सन १५२१), व त्याचे दोघे साथीदार सेरानो व बार्बोझा हे तसेच पुढें गेले. त्यांस बोर्निओ बेट लागलें, व सन १५२१च्या नोव्हेंबरांत मोलुका नांवाचीं मसाल्यांचीं बेटें त्यांस सांपडलीं. तसेच ते पुढें हिंदुस्थानच्या व आफ्रिकेच्या दक्षिण टोंकांस वळसा घालून ता. ८ सेप्टेंबर रोजीं स्पेनदेशास येऊन पोंचले. पांच जहाजांपैकीं व्हिक्टोरिया नांवाचें एक जहाज मात्र ही पहिली पृथ्वीप्रदक्षिणा करून परत आलें. तें अद्यापि प्रदर्शनांत ठेविलेलें आहे. मॅगेलनच्या ह्या सफरीनें पृथ्वीचा गोल आकार व तिचा एकंदर विस्तार ह्यांविषयीं खरी कल्पना युरोपच्या लोकांस कळून आली; व प्रिन्स हेन्रीचा उपक्रम शेवटास गेला. दक्षिण अमेरिकेच्या टोंकाशीं जी सामुद्रधुनी आहे तिला मॅगेलनची सामुद्रधुनी असें नांव अद्यापि चालत आहे. पोपाच्या हुकुमानें पोर्तुगीझ लोकांस नवीन सांपडलेल्या प्रदेशाचें स्वामित्व मिळालें, तें सुमारें शंभर वर्षें पावेतों टिकलें. त्या शंभर

वर्षांत म्हणजे बहुतेक सोळावें शतक संपेपर्यंत पोपाच्याविरुद्ध वर्तन करण्यास युरोपियन राष्ट्रांची छाती झाली नाहीं. प्रॉटेस्टंट धर्माची स्थापना कायम झाली नव्हती व स्पेनची सत्ता अव्याहत होती, तोंपर्यंत असें धाडस कोण करणार ? अर्थात् पोपाचा हुकूम कायम समजून, म्हणजे त्याजविरुद्ध आचरण न करितां, व्यापार वाढविण्याचे मार्ग शोधून काढण्याचेच इंग्रजांनीं प्रथम प्रयत्न चालविले. व्हेनिशन व्यापारी मुसलमानांस मदत करून खुष्कीच्या मार्गानेंच पोर्तुगीझ लोकांच्या व्यापारास आडकाठी घालीत होते, हें वर आलेंच आहे. पुढें सन १५२१त स्पेनच्या तर्फेनें मॅगेलननें पृथ्वीप्रदक्षिणा करून, पृथ्वी गोल आहे असा खात्रीचा शोध लाविला, त्यामुळें पोपाच्या हुकुमाबरहुकूम वर्तन ठेवूनही, म्हणजे एका पश्चिम दिशेनेंच प्रवास करून वाटेल त्या पूर्वेकडील प्रदेशांत स्पेनच्या लोकांस येतां आलें. अर्थात् स्पेन व पोर्तुगाल ह्यांचा मसाल्यांच्या बेटांबद्दल जबरदस्त तंटा लागला. तो मिटविण्यासाठीं त्या राष्ट्रांचा सन १५२९त सारागोझा येथें तह झाला. त्यांत पोर्तुगालनें स्पेनच्या राजास सतरालक्ष रुपये दिले; व स्पेननें मसाल्यांच्या बेटांवरील आपला हक्क सोडिला. युरोपांत कलह उत्पन्न होऊं नये म्हणून इंग्लंडचा आठवा हेन्री या तहांत सामील झाला होता.

सन १५२७त रॉबर्ट थॉर्न यानें पुष्कळ खटपट करून पुनरपि वायव्येकडून हिंदुस्थानाचा मार्ग शोधण्यासाठीं गलबतें पाठविलीं. पण त्यांचा उपयोग झाला नाहीं. तसेंच १५३६त होअर व दुसरे साठ लोक दोन गलबतें घेऊन न्यूफाउन्डलन्डपर्यंत गेले, व एकमेकांस खाण्याची पाळी आल्यामुळें परत आले. पुढें सन १५५३त सर ह्यू विलोबी (Willoughby) यानें एक सफर केली, ती विशेष महत्त्वाची आहे. या सफरींत सबॅश्शन केबो हा होता. सफरीच्या खर्चाकरितां

पंचवीस पौंडाचा एक, असे भाग करून सहा हजार पौंड जमविले होते. या सफरींत तीन जहाजें होतीं व सहाव्या एडवर्ड राजाच्या नांवचीं इकडील राजे लोकांस पत्रें दिलेलीं होतीं. नोव्हा झेंब्ला येथें पोंचल्यावर रशियाच्या उत्तर भागांत हीं गलबतें बर्फांत सांपडून सर्व लोक मरण पावले. पुढें सुमारें दोन वर्षांनीं दुसरे लोक त्याच भागीं गेले तेव्हां विलोबी व त्याचे सत्तर लोक आपापल्या गलबतांत बर्फानें गोठून मेलेले त्यांस दिसले. विलोबी तर कागदपत्र व डायरी उघडून आपल्या खोलींत बसलेला होता. विलोबीच्या हाताखालीं रिचर्ड चॅन्सेलर नांवाचा एक खलाशी होता. त्याचें गलबत विलोबीच्या दोन गलबतांपासून वेगळें होऊन परत इंग्लंडास आलें. या चॅन्सेलरनें पुढें रशियाच्या उत्तरभागांतून आशिया खंडाशीं व्यापार करणारी एक कंपनी स्थापन केली. ह्या कंपनीस राणी मेरीकडून स. १५५४त व्यापाराची सनद मिळाली. ती अठराव्या शतकाच्या अखेरपर्यंत कायम होती. ती मस्कोव्ही कंपनी म्हणून प्रसिद्ध आहे. या कंपनीचा एक व्यापारी जेंकिन्सन हा सन १५५७त मास्को येथें गेला. तेथें झारनें त्यास मेजवानी दिली. तेथून पुढें तो बुखारा येथें गेला असतां तेथें त्यास हिंदुस्थानचे व्यापारी भेटले. हा जेंकिन्सन अनेक वेळां इंग्लंडास परत येऊन पुनः मास्कोस गेला. त्याच्या प्रयत्नानें रशियाच्या आरमाराची स्थापना होऊन रशियाचा सामुद्रिक व्यापार वाढला. तथापि जेंकिन्सननें काढिलेला मार्ग खुष्कीचा असल्यामुळें त्यापासून इंग्रजांच्यानें पोर्तुगीझांशीं टिकाव धरवेना; शिवाय कास्पियन समुद्रावरील चांचे व व्होल्गा नदीवरील लुटारू तार्तार त्यांस फार त्रास देत असत. एकंदरींत वायव्येकडील मार्गाच्या प्रयत्नापासून इंग्रजांस कांहीं एक निष्पत्ति झाली नाहीं.

३. **एलिझाबेथ राणीचे धाडशी खलाशी.**—सन १५५३ पासून १५५८ पर्यंत राणी मेरी इंग्लंडच्या गादीवर होती. ती कॅथोलिक पंथाची असून, तिचें लग्न स्पेनच्या फिलिप राजाशीं झालें होतें. त्याच्या मदतीनें इंग्लंडांत कॅथोलिक धर्म पुनः स्थापण्याचा तिचा विचार होता. परंतु ती सन १५५८त मरण पावली. नंतर राणी एलिझाबेथ गादीवर आली, व इंग्लंडच्या इतिहासास निराळें वळण लागलें. इलिजाबेथला प्रॉटेस्टंट धर्माचा कट्टा अभिमान होता. स्पेनचें ऐश्वर्य पाहून तिला अतिशय वैषम्य वाटलें. धर्माच्या बचावाकरितां व व्यापार वाढवून संपत्ति मिळविण्याकरितां स्पेनबरोबर उघड सामना करणें अपरिहार्य आहे अशी तिची खात्री झाली; व स्वतः होऊन तिनें स्वावलंबनाचा मार्ग आपल्या लोकांस दाखविला. राणीचें प्रोत्साहन मिळतांच, ड्रेक, हॉकिन्स, फ्रॉबिशर, गिल्बर्ट, रॅले वगैरे अनेक नामांकित खलाशी हांहां म्हणतां पुढें आले, व समुद्रावर अनेक धाडसाचीं कृत्यें करूं लागले. इंग्लंडच्या एकंदर सामुद्रिक शक्तीचा आरंभ ह्या वेळेपासून झाला आहे.

**ड्रेक.**—सर फ्रॅन्सिस ड्रेक ह्याचें नांव इंग्लंडच्या खलाशांत अग्रगण्य आहे. हा व दुसरे प्रसिद्ध खलाशी डेव्हनशायर प्रांतांतले होते. लहानपणापासून हा हॉलन्ड देशांत सफरी करीत असे. त्या देशांत स्पेननें उडवून दिलेले कहर त्यास चांगले समजून आले, व स्पेनचा व्यापार हिसकून घेण्याचा त्यानें निश्चय केला. सन १५६७त जॉन हॉकिन्स व ड्रेक यांनीं थोडींशीं जहाजें घेऊन अमेरिकेकडे सफर केली. तिकडे सोनें, चांदी, रत्नें, वगैरे जमा करून परत येत असतां त्यांस स्पॅनिश जहाजांनीं लुटलें, व ते दोघे जीव बचावून कसेबसे स्वदेशीं परत आले. स्पॅनिश लोकांशीं दोन हात केल्याबद्दल त्यांचा इंग्लंडांत मोठा गौरव झाला. पुनः स. १५७४त ड्रेक ७३ लोक बरोबर घेऊन

गुप्तपणें अमेरिकेस गेला. पानामासंयोगिभूमीच्या पश्चिम किनाऱ्यावर स्पेननें पेरूदेशाहून अपरिमित सोनें आणलेलें आहे अशी त्यास बातमी लागली. तें सोनें अॅटलांटिक किनाऱ्यावर येऊन पुढें स्पेनदेशास जावयाचे होतें. त्याजवर ड्रेकनें हल्ला केला; पण त्याचे लोक थोडे असल्यामुळें स्पॅनिश लोकांनीं त्यास हांकून लाविलें. ह्या वेळीं ड्रेक भयंकर कचाट्यांत आला होता. त्याच्या हालअपेष्टेचीं वर्णनें हृदयद्रावक आहेत. आजारानें त्याचे पुष्कळ लोक मेले. त्याचा भाऊ मरण पावला. तरी न डगमगतां तो संयोगिभुमविरची डोंगरांची ओळ चढला; व तेथून पॅसिफिक महासागराचें दर्शन घेऊन प्रार्थना करून म्हणाला, 'देवा ह्या समुद्रावर सफर करण्याचें मला सामर्थ्य दे.' आजपावेतों स्पेनची अमेरिकेंतील सत्ता व संपत्ति गुप्त होती, ती ह्यापुढें जगजाहीर झाली.

इंग्लडास परत येऊन स. १५७७त राणीच्या परवानगीनें ड्रेक पृथ्वीप्रदक्षिणेस निघाला. तेव्हां त्याचें वय ३२ वर्षांचें असून त्यास विलक्षण हिंमत वाटत होती. त्याच्या गलबताचें नांव पेलिकन असून, बरोबर दीडशें खलाशी होते. रस्त्यांत युद्धप्रसंग, फितुरी वगैरे प्रकारांनीं त्यांचे पुष्कळ हाल झाले. व्हालपारेझोच्या बंदरांत त्यांस स्पॅनिश जहाजांवरील अपार संपत्ति लुटण्यास मिळाली. पुढें तसाच अमेरिकेच्या पश्चिम किनाऱ्यानें तो सॅन्फ्रान्सिस्कोपावेतों गेला; तेथून पश्चिमेस वळून त्यानें फिलिपाइन बेटें गांठलीं. तेथून अनेक संकटें सहन करीत मसाल्यांच्या बेटांत आला. टर्नेटच्या राजानें सर्व लवंगा इंग्रज व्यापाऱ्यांस देण्याचें कबूल केलें. पुढें ड्रेक हिंदीमहासागरांतून आफ्रिकेस वळसाघालून, इंग्लंड सोडल्यापासून बरोबर तीन वर्षांनीं इंग्लंडच्या प्लिमथ बंदरीं दाखल झाला. ह्याप्रमाणें पॅसिफिक महासागरावर सफर करण्याची त्याची हौस देवानें पुरविली; व

बरोबर आणिलेली सामुग्री ड्रेकनें राणीच्या पायांशीं अर्पण केली. मॅगलनच्या 'व्हिक्टोरिया'प्रमाणें ड्रेकचें 'पेलिकन' जहाज अद्यापि प्रदर्शनांत ठेविलेलें आहे. 'अज्ञात भूभागांवरील ह्या अट्टल चोरास' राणीनें 'सर' हा किताब दिला. ड्रेकच्या साहसानें स्पेनचा ऐश्वर्यभानु अस्ताचलाकडे उतरूं लागला.

स्पेनचा फिलिप राजा हा अपमान निमूटपणें सहन करणारा नव्हता. एलिझाबेथ राणीनें त्याजबरोबर असा वाद चालविला, कीं हवा आणि समुद्र हीं परमेश्वरानें सर्व मनुष्यांच्या उपयोगाकरितां निर्माण केलीं आहेत. तीं बंद करण्याचा हक्क कोणासही नाहीं. हा युक्तिवाद फिलिप यास रुचला नाहीं. त्यानें आपलें सर्व ऐश्वर्य खर्चून इंग्लंड देश जिंकण्यासाठीं एक प्रचंड आरमार तयार केलें. त्याच्या कडेकोट तयारीवरून त्यास 'अजिंक्य' ही संज्ञा होती. स० १५८८ च्या जुलई महिन्यांत हें प्रचंड आरमार इंग्लिश खाडींतून आंत आल्यावर, इंग्रज खलाशांच्या युक्तीनें व प्रचंड वादळाच्या जोरानें त्याचा संपूर्ण नाश झाला, व स्पेनचे हजारों लोक मृत्युमुखीं पडून त्या प्रचंड आरमाराचा चुराडा झाला. स्पेनच्या नाशाचा हा आरंभ होय.

**मार्टिन फ्रॉबिशर.**—हाही एक इंग्लंडचा प्रसिद्ध खलाशी होता. ह्याचा जन्म स० १५३५त झाला. त्याचें सर्व आयुष्य समुद्रावरच खर्च झालें. केबो व विलोबी ह्यांजप्रमाणें वायव्येकडील मार्गाच्या वेडानें फ्रॉबिशर ह्यासही पछाडलें होतें. वायव्येकडून जवळचा मार्ग हिंदुस्थानास सांपडेल, आणि तेणेंकरून हिंदुस्थानची संपत्ति आपल्या हातीं येईल अशी त्यास मोठी हिंमत वाटत होती. ड्रेकप्रमाणें चौर्यकर्मांत नांव मिळविणें त्यास पसंत नसून, कांहीं तरी नवीन शोध करून कोलंबसासारखी कीर्ति मिळवावी म्हणून तो झटत होता. लोक त्यास वेडा पीर म्हणत. पुष्कळ खटपट करून त्यानें पैसा जमविला;

व सन १५७६त दोन जहाजें घेऊन, तो ध्रुवप्रदेशाकडे गेला. तिकडे लॅब्राडोरच्या पुढील बर्फाळ बेटांत पुष्कळ दिवस रेंगाळून त्यास विमुख परत येणें भाग पडलें. त्या बेटांतून त्यानें बरोबर सोन्याचे दगड आणिले होते. ते पाहून लोकांच्या तोंडास पुनः पाणी सुटलें; व त्यांनीं स० १५७७त फ्रॉबिशर यास पुनः सोन्याचे दगड आणण्यास पाठविलें. त्या नवीन प्रदेशाचा कबजा घेण्यासाठीं जंगी तयारी करून दिलेली होती. ही सफर सुद्धां पहिल्यासारखीच निष्फळ होऊन परत आली. तरी सोन्याचांदीचे दगड आणून फायदा करावा ही टूम कायम होती. स. १५८३त फ्रॉबिशरनें आणलेल्या सर्व दगडांतील सोनें एका हुशार कारागिरानें बाहेर काढून जाहीर केलें. तें सर्व एक गुंजही भरलें नाहीं. फ्रॉबिशरच्या तीन सफरींस मिळून दोन लाख रुपये खर्च आला होता. सारांश, अंगांत हिंमत असूनही ती भलतीकडेच खर्च होऊन फ्रॉबिशर अन्नास मोताद झाला. त्यास भांडवल देणारा व्यापारी लॉक, त्याची बायको व पंधरा मुलें ह्यांचे हाल तर कुत्रा खाईना! सर्व लोकांनीं त्याजवर कर्जाच्या फिर्यादी केल्यामुळें त्यास पसतीस वर्षे तुरुंगांत राहवें लागलें. येणेंप्रमाणें वायव्येकडील मार्ग शोधून काढण्याच्या प्रयत्नापासून कांहींच उपयोग झाला नाहीं.

**गिल्बर्ट व रॅले.**—सर हंफ्रे गिल्बर्ट व सर वॉल्टर रॅले हे सावत्रभाऊ. हेही डेव्हनशायर प्रांतांत राहणारे होते. इंग्लंडजवळ उत्कृष्ट खलाशी असून, तेथच्या लोकांनीं केवळ लुटारूपणाचा मार्ग पतकरावा व इतर राष्ट्रांप्रमाणें नवीन शोध किंवा नवीन प्रदेश काढूं नये, ह्याचें त्यांस मोठें दुःख वाटून त्यांनीं अमेरिकेंत आपल्या वसाहती करण्याची राणीस सल्ला दिली. ती प्रथम तिला आवडली नाहीं. ह्या कृत्यापासून देशांत पैसा न येतां उलट खर्च मात्र होणारा आहे असें तिला वाटे.

स.१५७८त गिल्बर्ट अकरा जहाजें व पांचशें लोक घेऊन न्यूफाउंडलंड बेटास गेला. पण तेथें व्यवस्था न लागून त्यास परत यावें लागलें. पुनः स. १५८३त तो त्याच बेटांत गेला; व पुनरपि अपयश येऊन परत येत असतां रस्यांत जहाज फुटून वरच्या सर्व लोकांसह समुद्रांत बुडून मरण पावला. गिल्बर्ट यास ' इंग्रज वसाहतींचा जनक ' म्हणतात.

त्यानंतर सर वॉल्टर रॅले त्याच कामासाठीं बाहेर पडला. स. १५८४त तो अमेरिकेच्या एका सुपीक भागावर येऊन दाखल झाला. तेथें त्यानें पहिली इंग्रज वसाहत स्थापिली, व तीस, कुमारी एलिझाबेथ राणीच्या सन्मानार्थ ' व्हर्जिनिया ' असें नांव दिलें. पण ही वसाहत यशस्वी होण्यास पुष्कळ दिवस लागले. रॅलेचे व दुसऱ्या मंडळींचे अनेक प्रयत्न फुकट गेले. तंबाकू व बटाटे ह्यांचीं झाडें इंग्लंडांत प्रथम रॅले व हॉकिन्स ह्यांनींच आणिलीं असें म्हणतात.

ह्यांशिवाय सर रिचर्ड ग्रेन्व्हिल, जॉन डेव्हिस, हेन्रि हड्सन इत्यादि अनेक शूर इंग्रज खलाशांनीं अनेक पराक्रमाचीं कृत्यें केलीं आहेत. स्पॅनिश लोकांची तर इंग्रजांच्या दर्यावर्दी शौर्याबद्दल चांगलीच खात्री झाली, व हळूहळू इंग्रजांचें नांव युरोपांत वर येत चाललें. ह्या उन्नतीचें बरेंच श्रेय राणी एलिझाबेथला दिलें पाहिजे. स्पेनशीं दोन हात करावयाचे असा मनाचा धडा करून त्या शहाण्या राणीनें राष्ट्रीय वृद्धीच्या हरएक कृत्यास आपलें संपूर्ण पाठबळ दिलें. म्हणूनच इतक्या स्थितींतून अनेक शूर पुरुष हांहां म्हणतां उदयास आले. अंतःकरणांत खरी कळकळ असल्यास एका व्यक्तीस काय करतां येतें हें ह्यावरून व्यक्त होत आहे.

**४. फादर स्टीफन व राल्फ् फिच.**—फिलिप व एलिझाबेथ ह्यांचें भांडण ऐन रंगांत येत चाललें असतां, स. १५८५–८७च्या तीन

वर्षांत जॉन डेव्हिस ह्यानें उत्तरेकडे तीन सफरी केल्या. स. १५८६त टॉमस कॅव्हेंडिश हाही इंग्लंड सोडून निघाला, तो अमेरिकेवरून चीन, मसाल्याचीं बेटें व हिंदुस्थान वगैरे ठिकाणीं किनाऱ्या किनाऱ्यानें फिरून, स्पेनच्या मुलुखांत दंगा उडवीत व पुष्कळ महत्त्वाची माहिती मिळवीत, १५८८च्या सेप्टेंबरांत म्हणजे स्पॅनिश आरमाराचा पराभव झाल्यावर दोन महिन्यांनीं परत इंग्लंडास आला. उत्तरेकडील मार्गाची खटपट सोडून पोर्तुगीझ लोकांनीं काढलेल्या मार्गानेंच आपणही व्यापार करावा, ही गोष्ट इंग्रजांच्या मनावर प्रथम ठसवून देणारा खलाशी कॅव्हेंडिश होय. इंग्लंडांत ह्या वेळीं उत्कृष्ट जहाजें तयार होत होतीं व काम पाहिजे म्हणून तीं रिकामीं पडलीं होतीं. नवीन वसाहती करण्यास इंग्रजांस जागा नव्हती. पोपाच्या ठरावानें नवीन शोध लाविलेल्या प्रदेशांचे मालक स्पेन व पोर्तुगालचे लोक मात्र होते. इंग्रजांचीं कांहीं गलबतें आमस्टर्डाम पावेतों जात; व क्वचित् कांहीं भूमध्यसमुद्राच्या पूर्वेस प्रवास करीत. पण पूर्वेकडील बेटांतले मसाले, बनारसचें उंची कापड, इराणांतलें रेशीम, गोवळकोंड्याचे हिरे वगैरे जिन्नस इंग्लंडास जर्मनी व हॉलंड येथील बंदरांतून न्यावे लागत. स. १५८६ त स्पेनच्या फिलिप राजानें हॉलंडच ॲन्ट्वर्प शहर धुळीस मिळविलें, तेव्हां तेथचे व्यापारी इंग्लंडांत येऊन राहिले. इंग्लंडचे कोष्टी पुष्कळ माल तयार करीत; पण त्याचा बाहेर खप नसल्यामुळें, तो सर्व पडून राहिला होता, व इंग्लंडचे खलाशी मनगटें चावीत स्वस्थ बसले होते. अशा स्थितींत कॅव्हेंडिश पृथ्वीप्रदक्षिणा करून परत आला, त्यानें पूर्वेकडील व्यापाराची भरंवसेलायक बातमी लोकांस दिल्याबरोबर, लंडनच्या मुख्य मुख्य व्यापाऱ्यांनीं कॅव्हेंडिशच्या मदतीनें एक अर्ज लिहून तो राणीकडे सादर केला. त्यावर बरीच वाटाघाट व भवतिनभवति होऊन अखेरीस

पूर्वेकडे व्यापारासाठीं सफर करण्यास राणीनें परवानगी दिली व त्यास लागणारा खर्च वर्गणीनें गोळा करण्यांत आला.

ह्याप्रमाणें लंडनच्या साहसी व्यापाऱ्यांनीं कॅप्टन रेमंड ह्याच्या हाताखालीं तीन गलबतें स. १५९१च्या एप्रिलांत रवाना केलीं. ही गोष्ट बाहेर कोणासही रुचली नाहीं. डच, फ्रेंच, स्पॅनिश व पोर्तुगीझ हे सर्व इंग्लंडविषयीं दांतओठ चावूं लागले. इंग्रजलोक दर्यावर्दी कामांत कुचकामाचे आहेत, व त्यांनीं अशा मोठ्या साहसी कृत्यांस हात घालूं नये असें सर्व परकीयांचें मत होतें. ही पहिली सफर निघून गेल्यावर टॉमस स्टीफन नांवाच्या एका इंग्रज गृहस्थानें हिंदुस्थानांतून व्यापाराची बरीच हकीगत इंग्लंडास लिहून पाठविली.

**फादर टॉमस स्टीफन ( स. १५४९–१६१९ ).**—ह्याचा जन्म इंग्लंडांत सॉल्स्बरी गांवाजवळ स. १५४९त झाला. त्याचा बाप लंडनचा एक व्यापारी होता, व त्याच कामांत त्यानें लहानपणापासून आपल्या मुलास घेतलें. पण तें काम न आवडून तो ऑक्सफर्डच्या न्यू कॉलेजांत जाऊन ग्रॅजुएट झाला. तेथें असतांना प्रॉटेस्टंट चळवळींविरुद्ध व रोमनकॅथोलिक पंथाच्या तर्फेनें त्यानें अनेक निकराचीं भांडणें केलीं. टॉमस पाउंड नावाचा एक विद्वान गृहस्थ कॅथोलिक पंथाच्या तर्फेनें झगडत होता, त्याची व स्टीफनची मैत्री जुळली. त्यांची खटपट लोकांस पसंत न पडून पाउंड कारागृहांत पडला व तीस वर्षे तुरुंगातील यातना त्यास सहन कराव्या लागल्या. पण स्टीफन हा शत्रूंची दृष्टि चुकवून रोम येथें पळून गेला. तेथें सोसायटी आफ् जीझस म्हणजे जेझुइट नांवाच्या पंथांत तो दाखल झाला. ह्या पंथाचें प्राबल्य पोर्तुगाल देशांत विशेष असल्यामुळें, स्टीफन लिस्बनास गेला. तेथें त्या वेळीं हिंदुस्थानच्या लोकांस क्रिस्ती करण्यासाठीं जबर प्रयत्न चालले होते, ते पाहून आपणही हें धार्मिक काम करावें अशा

उद्देशानें लिस्बन सोडून स. १५७९ च्या आक्टोबरांत तो गोव्यास आला. त्याचें पुढील सर्व आयुष्य हिंदुस्थानांतच गेलें. हिंदुस्थानांत पाऊल ठेविलेला पहिला इंग्रज गृहस्थ हाच होय. गोव्यास आल्यावर त्यानें आपल्या प्रवासांतील सर्व हकीगतीचीं पत्रें आपल्या बापास लंडनास पाठविलीं, तसेंच हिंदुस्थानच्या स्थितीची व व्यापाराची हकीगत त्यानें लिहून पाठविली, तिचा तेथें पुष्कळ उपयोग झाला. इकडे हिंदुस्थानांतील लोकांस बाटविण्याचा पोर्तुगीझानीं सपाटा चालविला, त्या कामीं फादर स्टीफननें फारच साह्य केलें. गोव्याहून तो साष्टीस गेला, व तेथेंच मरेपर्यंत त्यानें उद्योग केला. साष्टीच्या स्थितीविषयीं त्यानें असें लिहिलें आहे कीं, 'येथचे बहुतेक हिंदु लोक शूर व पोर्तुगीझ लोकांचे कट्टे द्वेष्टे असल्यामुळें, त्यांजपासून आपल्या धर्मप्रसाराच्या कामास फारच धोका येण्याचा संभव आहे'. पश्चिम किनाऱ्यावरील उत्कृष्ट हवा, आल्हाददायक सूर्यप्रकाश, नारळीचीं सुंदर बनें, ब्राह्मणांची बुद्धिमत्ता, क्रिस्ती धर्म स्वीकारून तत्प्रीत्यर्थ उद्योग करण्याची त्यांची हौस, व हिंदु लोकांच्या सुंदर भाषा इत्यादि कारणांनीं फादर स्टीफन ह्यास येथेंच चाळीस वर्षेपर्यंत जन्माचा उद्योग करण्याची स्फूर्ति उत्पन्न झाली व स्वदेशास परत जाण्याची इच्छाच झाली नाहीं. त्यानें मराठी, गोव्याकडील कोंकणी व संस्कृत ह्या तीन भाषांचा उत्कृष्ट अभ्यास केला, तो इतका परिपूर्ण केला कीं, कोंकणी भाषेंत पण रोमन लिपींत त्यानें 'क्रिस्तपुराण' नांवाचा ओवी-बद्ध उत्कृष्ट ग्रंथ बायबलाच्या आधारें लिहिला आहे; तसेंच मराठी व कोंकणी ह्या भाषांचें व्याकरण पोर्तुगीझ भाषेंत त्यानें लिहिलें आहे. हेंच हिंदुस्थानांतील भाषेचें पाश्चात्यानें लिहिलेलें पहिलें व्याकरण होय.

स्टीफनच्या 'क्रिस्त पुराणा'चे दोन भाग आहेत. पहिला भाग जुन्या कराराचा व दुसरा भाग नव्या कराराचा. पहिल्या भागाचे ३६

अवसर म्हणजे अध्याय असून, दुसऱ्याचे ५९ आहेत. सगळा ग्रंथ ११०१८ ओव्यांचा आहे. ह्या ग्रंथाची पहिली आवृत्ति स. १६१६त निघाली; व १६४९त दुसरी, आणि १६५४त तिसरी निघाली. हल्लीं ह्याच्या छापील प्रति उपलब्ध नाहींत, फक्त दहाबारा सुंदर हस्तलिखित प्रति कानडा जिल्ह्यांत उपलब्ध आहेत. हें पुस्तक पांचपन्नास वर्षांपूर्वीं मराठी जाणणाऱ्या एतद्देशीय क्रिस्ती लोकांत फारच प्रिय होतें; व त्यांच्या मंदिरांत त्याचीच आवृत्ति होत असे. कानडा जिल्हा टिपूनें जिंकला, त्या वेळीं प्रत्येक क्रिस्ती कुटुंबांत ह्या पुराणाच्या प्रती त्यास सांपडल्या, त्या सर्व त्यानें जाळून टाकिल्या. हल्लीं ज्यांच्याजवळ ह्या प्रती आहेत, त्यांस त्या अत्यंत बहुमोल वाटतात. मासल्याकरितां ह्या पुराणांतील आरंभींच्या थोड्या ओंव्या येथें उतरून घेतों.

ॐनमो विश्वभर्ता । देवबापा सर्वसमर्था । परमेश्वरा सत्यवंता । स्वर्गपृथ्वीचा रचणारा ॥ १ ॥ तूं रिद्धिसिद्धीचा दातारू । कृपानिधि करुणाकरू । तूं सर्व सुखाचा संग्रहू । आदि अंतू नातुडे ॥ २ ॥ तूं परमानंद सर्वस्वरूपू । विश्वव्यापकू ज्ञानदीपू । तूं सर्व गुणें निर्लेपू निर्मळू निर्विकारू स्वामिया ॥ ३ ॥ तूं अदृष्टू तूं अवेक्तू । समदयाळू सर्वप्राप्तू । सर्वज्ञानू सर्वनीतिवंतू । एकुचि देवो तूं ॥ ४ ॥ तूं साक्षात् परमेश्वरू । अनादिसिद्धु अपरंपारू । आदि अनादि अविनासू अमरू । तुझें स्थान त्रिलोकीं ॥ ५ ॥ स्वर्गसृष्टि त्वां हिलामातें (?) । केला चंद्रू सूर्य नक्षत्रें । तुझे एके शब्दें पावते(नें) । केली सर्व रचना ॥ ६ ॥ तूं आणि तुझा एकचि पुतु । आणि स्पिरितू (Spirit) संतू । तिघेजण एकचि संतवंतू । देवो जाणावा ॥ ७ ॥*

* टीप.—स्टीफनच्या ह्या खिस्त पुराणावर एक निबंध हल्लींचे एक सब जज्ज मि० जे. ए. साल्डाणा, बी. ए., एलएल्. बी., ह्यांनीं वाचिला तो

मूळ पुराण फादर स्टीफननें रोमन लिपींत लिहिलें होतें. वरील ओंव्या वाचून स्टीफनच्या उद्योगाची जरी प्रशंसा केली पाहिजे, तरी त्या परकीयाच्या आहेत ह्याची साक्ष त्यांतील शब्दरचनेवरून सहज पटणारी आहे. कित्येकांच्या मतें मूळ बायबलापेक्षां ह्या पुराणांत स्टीफननें विशेष रस आणिला असून, प्राच्य रुचीस साजणारी अशी काव्यरचना केल्यानें त्याचा परिणाम इकडे चांगलाच झाला. क्रिस्ती धर्माचीं सर्व तत्त्वें व त्यांतील नीतीचा भाग ह्या पुराणांत उत्तम प्रकारें उतरलेला आहे. आपणांस ह्या ग्रंथावरून पाश्चात्यांच्या उद्योगाची मात्र चांगली कल्पना करितां येईल. अशा उद्योगानेंच मलबार किनाऱ्यावर इतके हिंदु लोक बाटलेले आज आपण पाहत आहों.

**राल्फ फिच्च्** नांवाचा दुसरा एक इंग्रज गृहस्थ फिरत फिरत गोव्यास आला होता, त्यास पोर्तुगीझ लोकांनीं तेथें कैदेंत टाकिलें, ही गोष्ट स्टीफननेंच प्रथम इंग्लंडास लिहून कळविली. हा फिच्च स. १५८३ त खुष्कीच्या वाटेनें हिंदुस्थानास जाण्यासाठीं निघाला. त्याजबरोबर पूर्वेकडील राजांस एलिझाबेथ राणीनें पत्रें दिलीं होती. फिच्च हा भूमध्यसमुद्रांतून आशियाच्या पश्चिम किनाऱ्यावर उतरला. नंतर यूफ्रेटीस नदीच्या कांठानें इराणच्या आखातांतून ऑर्मझ येथें आला. तेथें पोर्तुगीझ लोकांनीं द्वेषानें त्यास पकडून गोव्यास पाठवून कैदेंत घातलें. पुढें स्टीफनच्या शिफारसीनें त्याची सुटका होऊन तो तेथून आग्र्यास मोगल दरबारीं जाऊन अकबर बादशहास भेटला. नंतर ब्रह्मदेश मलाक्का, मसाल्यांचीं बेटें वगैरे ठिकाणीं फिरून तो पुनः गोव्यास आला व तेथून परत इंग्लंडास गेला. आपल्या प्रवासांत फिच्चनें पोर्तुगीझांच्या जुलमाची व पूर्वेकडील व्यापाराची अत्यंत उप-

---

Bomby Cotholic Examiner 1903, ह्यांत छापला आहे. त्यावरून ही वरील हकीकत दिली आहे; कविता इंग्रजी लिपींत लिहिलेल्या मिळाल्या.

युक्त माहिती मिळवून आणिली व ती इंग्लंडच्या लोकांस कळविली. आज सगळ्या जगांतील घडामोडी तळहातावर असल्याप्रमाणें आपणांस कळतात, तशी स्थिती त्या वेळीं नव्हती. तेव्हां फिचसारखा क्वचित् एखादा गृहस्थ दूरचा प्रवास करून परत आला म्हणजे त्याची हकीगत ऐकण्यास लोकांचे थव्यांचे थवे एकत्र जमत, व त्या साहसपूर्ण प्रवासांच्या गोष्टी मोठ्या आस्थेनें व उत्सुकतेनें ऐकत.

फिच परत आला त्याच वर्षीं कॅप्टिन रेमंड निघून हिंदुस्थानाकडे आला होता. पण त्यास यश आलें नाहीं. त्याजबरोबरच्या दोन जहाजांतले सर्व लोक आजारानें व वादळानें मृत्युमुखीं पडले. रेमंडबरोबर तिसरें एक जहाज कॅप्टिन लँकॅस्टर ह्याच्या हाताखालीं हिंदुस्थानास आलें; व तेथून मलाक्का येथें जाऊन तेथें माल भरून तें जहाज अनेक संकटें सोशीत स. १५९१त इंग्लंडास परत आलें. ही इंग्रज जहाजांनीं व्यापारासाठीं केलेली पहिली सफर होय. डच लोकांनीं अद्यापि अशी सफर केली नव्हती. थोडा कां होईना, पण लँकॅस्टरनें व्यापाराचा माल पूर्वेकडून इंग्लंडांत आणिला, येणेंकरून पोपानें पोर्तुगीझांस जो व्यापाराचा मक्ता दिला होता, त्याचें महत्त्व लयास गेलें.

**८. कंपनी स्थापण्याचा उपक्रम.**—स्पॅनिश आरमाराच्या विध्वंसापासून प्रॉटेस्टंट राष्ट्रांनीं पोपाचा हुकूम झुगारून दिला इतकेंच नाहीं, तर नवीन शोध करण्याच्या पद्धतींतही पुष्कळ फेरफार केले. प्राचीन व मध्य युगांत व्यापाराची माहिती व मार्ग गुप्त ठेवण्याचा प्रघात असे. कोणी नकाशे वगैरे काढून विकल्यास त्यास देहान्त शासन करीत असत. आड्रिॲटिक समुद्रावरील राष्ट्रें इजिप्ट वगैरे पूर्वेकडील देशांविषयीं कांहीं एक माहिती पश्चिमेकडील अटलांटिक राष्ट्रांस मिळूं देत नसत. हा बाऊ सोळाव्या शतकांत नाहींसा झाला. पोर्तुगीझ राजपुत्र हेन्री ह्यानें आपले शोध गुप्त ठेविले नव्हते. पण सोळाव्या

शतकांत हॉलंडांत छापण्याची व धातूंवर कोरण्याची युक्ति प्रसिद्ध झाल्यापासून नकाशे पाहिजे त्यास मिळूं लागले. ऍंटर्प, ब्रुजिस वगैरे शहरांत मोठमोठे नामांकित शिल्पी निपजले, त्यांनीं आपल्या कसबानें नकाशे व माहिती छपाव्यानें प्रसिद्ध करून ती सर्व राष्ट्रांस मिळेलशी केली. ह्याचाच मुख्य परिणाम डच व इंग्रज कंपन्यांची स्थापना होय असें म्हणण्यास हरकत नाहीं. सारांश, व्यापारांत गुप्तपणा ठेवणें हें पहिलें तत्त्व होतें; तें नाहींसें झाल्यावर ज्यास जें प्रथम सांपडेल तें त्याचें समजावें, हें तत्त्व कांहीं दिवस अमलांत होतें. ह्यांत आतां इतकाच फरक होऊं लागला होता कीं, ज्याला जें आपल्या ताब्यांत ठेवतां येईल, तें त्यानें ठेवावें. म्हणजे नवीन शोध व तो बळकावण्याचें सामर्थ्य ह्या तत्त्वांवर डच व इंग्रज कंपन्यांनीं व्यापाराचा मक्ता स्थापन केला; व त्याच्याच जोरावर त्यांनीं पुष्कळ दिवस पावेतों संपत्ति मिळविली.

पोर्तुगीझ लोकांनीं तरी दुसऱ्यांबद्दल विशेष कडकपणा धारण केला नव्हता. ते जो माल पूर्वदेशांतून लिस्बनास आणीत, तो ते पुढें देशोदेशीं पोंचविण्यास डच व्यापाऱ्यांसच सांगत असत. हॉलंडांत पूर्वीं ब्रुजिस शहर पूर्वेकडील मालाचें द्वार होतें. पण ब्रुजिसची खाडी रेतीनें भरून तें बंदर निरुपयोगी झाल्यामुळें, पोर्तुगीझ राजानें स. १५०४त ऍंट्वर्प शहराचें बंदर खोदवून तें सर्व व्यापाराचें नाकें केलें. सारांश, लिस्बन हें माल पुढें पोंचविण्याचें मधलें द्वार होतें. लंडनचा व्यापार ऍंट्वर्पशीं चाले, लिस्बनशीं चालत नसे. ऍंटर्पच्या बंदरांत दररोज ५०० व सालाचीं ९२ हजार गलबतें संचार करीत असत. ह्या शहराच्या भरभराटीमुळें इंग्लंडच्या व्यापारास पुष्कळ चलन मिळालें. त्यामुळें आपलीं गलबतें थेट पूर्व देशांत पाठवून तेथचा माल बारोबार आणण्याची इंग्रज व्यापाऱ्यांस स्फूर्ति झाली. ह्याच स्फूर्तीस एलिझाबेथ

राणीनें पुष्कळ प्रोत्साहन दिलें. तिनें भूमध्यसमुद्रांतून मोरोक्को व टर्की येथें कित्येक लोक पाठविले. स. १५८७त ड्रेकनें सेंट फिलिप नांवाचें मोठें स्पॅनिश जहाज पकडून आणिलें; त्यावरील मालाचें उत्पन्न दहा लाख रुपये आलें. सरजॉन बरो ह्यानें दुसरें एक जहाज स. १५९२त पकडिलें, त्यांतील मालाची किंमत पंधरा लाख आली. परंतु असें नशीब क्वचितच उघडे. ऍंट्वर्प शहर स्पेनच्या राजानें उद्ध्वस्त केल्या-वरोबर इंग्रजांस बाहेर गेल्याशिवाय गत्यंतर नव्हतें. त्यावरूनच स. १५९१तली पहिली सफर निघाली. सेंट फिलिप जहाजावर जे कागद-पत्र इंग्रजांस मिळाले त्यांवरून पूर्वेकडील व्यापारांत केवढा मोठा फायदा आहे ह्याची इंग्रजांस खरी कल्पना झाली, व इतउत्तर बाकीचे मार्ग सोडून आफ्रिकेच्या दक्षिणटोकानेंच आपणही व्यापार करावयाचा असा त्यांच्या मनाचा पक्का निश्चय झाला. तसेंच स. १५९२त पकडलेल्या जहाजावरील कागदपत्रांत जी माहिती मिळाली, त्यावरूनच पुढें कंपनीनें राणीकडे आपला अर्ज लिहिला.

पंधराव्या शतकाचे अखेरीस जी गोष्ट पोर्तुगीझ सरकारास तुर्क व मुसलमान देशांविरुद्ध करावी लागली, तीच गोष्ट सोळाव्या शतकाच्या अखेरीस प्रॉटेस्टंट राष्ट्रांस पोर्तुगाल वगैरे कॅथोलिक राष्ट्रांविरुद्ध करावी लागली. तथापि भूमध्यसमुद्रावर स्पेनचाच ताबा होता, अटलँटिक महासागर हातचा गेला, तेव्हां त्याचा वचपा भूमध्यसमुद्रावर काढ-ण्याचा स्पेनचा विचार झाला. ह्यामुळें इंग्रजांच्या टर्की कंपनीला पुष्कळ त्रास सोसावा लागला.

मस्कोव्ही कंपनीस खुष्कीच्या मार्गानें व्यापार चालविण्यास अतोनात खर्च येऊं लागल्यामुळें, भूमध्यसमुद्राचा फायदा घेऊन तुर्कस्तानच्या किनाऱ्यावरून पूर्वेकडील माल इंग्लंडांत आणण्याकरितां टर्की आणि लिव्हँट नांवाची कंपनी सन १५८१त स्थापन झाली; तिचा उद्देश

युरोपियन तुर्कस्तानांतून आशिया खंडाच्या पश्चिमभागीं व्यापार करण्याचा होता. उत्तरेकडील मार्ग सांपडत नव्हता; व स्पेनपोर्तुगालशीं लढण्याचा प्रसंग न आणितां व्हेनिशन व्यापाऱ्यांप्रमाणें खुष्कीच्या मार्गानें पूर्वेकडील माल भूमध्यसमुद्रांतून आणण्याचा हा प्रयत्न होता. भूमध्यसमुद्राच्या पूर्वभागास लिव्हँट म्हणतात. त्यावरून ह्या कंपनीस लिव्हँट कंपनी असेंही म्हणत. ह्या कंपनीचे व्यापारी लिव्हँट समुद्रांतून खुष्कीनें आलेप्पो, बगदाद येथें जाऊन इराणी अखातावर आलेला पूर्वेकडील माल खरीद करीत. तिची सनद सन १५९३त वाढविण्यांत आली होती, तरी आफ्रिकेच्या उत्तरेकडील बार्बरी लुटारू व भूमध्यसमुद्रांतील फिलिपचीं जहाजें ह्यांनीं त्या कंपनीचा व्यापार मुळींच चालूं दिला नाहीं. रशियाचा बादशहा पीटर धि ग्रेट ह्यानें आपल्या देशाशीं हिंदुस्थानचा व्यापार जोडण्याचा प्रयत्न करून सन १७१७त बेकोविट् ( Beckovitz ) ह्यास पाठवून अमूदर्या नदीचा शोध लाविला; व सन १७२३त ब्रूस ह्यास पाठवून कास्पियन समुद्राचा तपास केला. इंग्रज सरकारनेंही सन १७४२त जॉन एल्टन (Elton) ह्यास रशियाचे आग्नेय भागांत पाठवून स्वतःचा व्यापार वाढविण्याची खटपट केली; पण त्यामुळें आपला व्यापार बुडेल असें रशियन सरकारास वाटून त्यानें इंग्रजांस आपल्या देशांत इतःपर व्यापाराकरितां येण्याची मनाई केली.

लिन्स्कोटेन नांवाच्या डच खलाशानें पोर्तुगीझ राज्यांत प्रवास करून पुस्तक छापिलें, त्याचे तर्जुमे बहुतेक युरोपियन भाषांत झाले. इंग्रजी तर्जुमा स. १५९८त झाला. त्याला एक प्रस्तावना जोडलेली होती, तिजवरून इंग्लंडांत जागृति होऊन कंपनी स्थापण्याचा उद्योग सुरू झाला.

लिन्स्कोटेन व फिच ह्यांच्या प्रवासानें इंग्रज व डच राष्ट्रांत चढाओढ उत्पन्न होऊन पूर्वेकडचा व्यापार अगोदर कोण बळकावितो असें झालें. स्टेट्स् जनरल म्हणून हॉलंडचा राज्यकारभार हांकणारी सभा होती. तिनें स्पेनच्या फिलिपचें वजन जोखलें तसें एलिझाबेथनें जोखलें नव्हतें. म्हणून डच लोकांची त्वरा एलिझाबेथ राणीस साधली नाहीं. शिवाय इंग्रजांच्या वर सांगितलेल्या दोन कंपन्या अगोदरच असल्यामुळें, तिसरी लवकर निघाली नाहीं. स. १५९७त कॅप्टिन बेंजामिन वूडची एक सफर सर्वस्वी बुडाल्यामुळें लोक विशेष साशंक झाले. शेवटीं डच लोकांनीं इंग्लंडांत जहाजें खरेदी केलीं ही बातमी ऐकून इंग्रजांस शरम वाटली. स. १५९९त सर्व व्यापाऱ्यांनीं वर्गणी करून तीन लक्ष रुपये जमा केले व ' आमच्या देशाची अब्रू राखा, व व्यापार वाढवा, ' अशी राणीस विनंती केली, त्या विनंतीचें फळ इंग्रज ईस्ट इंडिया कंपनी होय.

**६. पहिली बैठक ( ता. २४ सेप्टेंबर, १५९९ ).**—कंपनी स्थापण्याचें व्यापाऱ्यांच्या मनांत आलें, तरी त्यांत पुष्कळ अडचणी होत्या. कंपनीची व्यवस्था कशी राहवी हा पहिला प्रश्न होता. ह्यापूर्वीं ज्या दोन राष्ट्रांनीं व्यापारांत आघाडी मारिली होती, त्यांच्या पद्धति वेगळ्या होत्या. पोर्तुगीझ लोकांचा व्यापार सर्वस्वी सरकारच्या ताब्यांत होता; त्यामुळें आरभीं राज्यस्थापनेच्या वगैरे कामांत जरी त्यांचें पाऊल झपाट्यानें पुढें पडलें, तरी त्यांतील अनेक दोषांमुळें त्या राष्ट्राचें नुकसान कसें झालें हें मागें सांगण्यांत आलेंच आहे. दुसरी पद्धति डच लोकांची. तींत सर्व सत्ता लोकांच्या हातांत असून कंपनीवर डच सरकारची संपूर्ण देखरेख असून तीस सर्व प्रकारचें पाठबळ मिळत होतें. वाटेल त्या राष्ट्राशीं युद्ध किंवा तह करण्याचा, वाटेल तेथें वसाहती करण्याचा, किल्ले वगैरे बांधण्याचा व नाणें

पाडण्याचा अधिकार डच कंपनीस होता. उलट पक्षीं कंपनीचे हिशेब तपासून तिजपासून जकात घेण्याचा अधिकार डच सरकारास होता. सारांश, सरकारची सत्ता व खासगी व्यवस्था ह्या दोनही तत्त्वांचा मिलाफ डच कंपनींत उत्कृष्ट झाला होता. डच कंपनी जरी दोन वर्षांनीं इंग्रजांच्या मागून स्थापन झाली तरी दोहोंच्या घटनेंत पुष्कळ साम्य आहे. डच लोकांची पद्धत स्वीकारण्याजोगी त्या वेळीं इंग्लंडची परिस्थिति नव्हती. लिव्हँट कंपनीचे व्यापारी विशेष अनुभवलेले होते; व स्पेनपोर्तुगालशीं भरसमुद्रावर दोन हात करून दक्षिणेकडील जलमार्गानेंच आपणही व्यापार करण्याचा उद्योग हातीं घेण्यास त्यांनींच प्रथम पुढाकार घेतला. रिचर्ड स्टेपर व टॉमस स्मिथ, हे दोन व्यापारी लिव्हँट कपनीचे आरंभींचे पुढारी होते. त्यांनीं त्या कंपनींत पैशाचें व इतर नुकसान पुष्कळच सोसलें होतें. टॉमस स्मिथ हाच पुढें ई. इ. कंपनीचा पहिला गव्हर्नर झाला.

स० १५९९च्या एप्रिल महिन्यांत खऱ्या कामास सुरुवात झाली. वर्गणीनें पैसा गोळा करून मिल्डनहॉल नांवाच्या एका साहसी गृहस्थास त्यांनीं राणीच्या मार्फत अकबर बादशहाशीं व्यापाराचें बोलणें करण्याकरितां हिंदुस्थानास रवाना केलें. त्याजबरोबर एलिझाबेथ राणीनें बादशहास पत्रें दिलीं होतीं. हा गृहस्थ बादशहास भेटून तीन वर्षांनीं परत इंग्लंडास गेला. बादशहाचें वैभव व हरएक बाबतींत हिंदुस्थानची सुधारलेली परिस्थिति ह्यांविषयीं भरंवशालायक हकीगत ह्यानें प्रथम इंग्लंडांत आणिली. पण हा कारण नसतां अनेक भानगडींत पडल्यामुळें त्याचा उपयोग व्हावा तसा झाला नाहीं.

ता. २२ व २४ सेप्टेंबर स. १५९९ रोजीं फाउंडर्स हॉलमध्यें लंडनच्या व्यापाऱ्यांची पहिली सभा भरली. त्यांनीं एकदम तीस हजार पाउंड वर्गणी जमविली व काम चालू केलें. लंडनास जहाजें खरेदी

करण्यास डच व्यापारी आले होते, त्यांस ह्या इंग्रज व्यापाऱ्यांनीं जबाब दिला कीं, 'आमचीं जहाजें आम्हांसच पाहिजेत, तुम्हांस तीं मिळणार नाहींत.' नंतर हिंदुस्थानाशीं व्यापार करण्याचा संपूर्ण मक्ता ह्या मंडळीस द्यावा, इतरांस तो व्यापार करूं देऊं नये, असें फर्मान सरकारांतून मिळविण्याचा त्यांनीं सर्वानुमतें ठराव केला, व पंधरा डायरेक्टरांची मंडळी नेमून तिजकडे सर्वकाम सोंपिलें.

डच व्यापारी लंडनास जहाजें खरीद करण्याकरितां आले होते, त्यांस लंडनच्या व्यापाऱ्यांनीं जहाजें मिळूं दिलीं नाहींत. तेव्हां त्या व्यापाऱ्यांस लंडनच्या ह्या लोकांचा रोंख कांहीं निराळाच दिसला. हे आतां आपल्या आड येणार खास, अशी त्यांची खात्री झाली. अलीकडे लंडनची भरभराट विशेष झाली होती. पन्नास वर्षांपूर्वीं लंडनांत एक लाख रुपये वर्गणीनें जमविण्यास मोठी मारामार पडे. पण नुकतेंच त्यांनीं राणीस सहा लाख रुपये कर्ज दिलें होतें. फ्राउड आपल्या ग्रंथांत लिहितो, "सन १५७२त इंग्लंडच्या सर्व राज्यांतील व्यापारांत गुंतलेल्या जहाजांचें माप ५० हजार टन होतें व मोठ्यांत मोठीं जहाजें अडीचशें टनांचीं होतीं. सन १५८८त चारशें टनांचीं जहाजें दोन तीनच असतील. पण १५९९त सहाशेंपासून आठशें टनांचीं जहाजें पुष्कळ झालीं होतीं; व अकराशें टनांचें एक जहाज पुढें लौकरच तयार झालें.' जर्मनींतील हंस व्यापारी इंग्लंडांत होते, (पृ० ५१ पहा), त्यांस राणीनें देशांतून बाहेर घालवून दिलें. तसेंच हंस शहरांत जे इंग्रज होते ते व्यापाराचें उत्तम कसब तेथें शिकून लंडनास परत आले.

लंडनच्या व्यापाऱ्यांस राणीपासून व्यापाराच्या इजाऱ्याचें जें फर्मान पाहिजे होतें, तें इंग्रजांच्या इतर व्यवहारांस योग्य असेंच होतें. अमुक एक कसब किंवा व्यापार अमुक एका ठरीव मंडळीस सोंपलेला असे. त्यांत दुसऱ्या कोणास हात घालण्याची परवानगी नसे. म्हणजे हवा शिवाय-

करून बाकी प्रत्येक पदार्थ अशा रीतीनें ठरीव इसमांस ठरवून दिलेला असे. अशा प्रकारचे ट्रेडगिल्डस् व ट्रस्टस् म्हणजे धंद्यांचे संप पाश्चात्य देशांत अद्यापि जिकडे तिकडे आहेत. नवीन यंत्रांचें पेटंट घेण्याची आवश्यकता यावरूनच निघाली. हजारों अडचणी सोसून जे व्यापारी हिंदुस्थानाशीं व्यापार सुरू करणार, त्यांचा फायदा पुढें थोड्या वर्षांनीं अचानक दुसऱ्या कोणीं उपटावा हें अर्थात् न्याय्य नव्हतें. म्हणून आपण सुरू केलेल्या व्यापारांत दुसऱ्या कोणींही हात घालूं नये अशी ह्या व्यापाऱ्यांची राणीकडे मागणी होती. ही मागणी राणीनें कबूल केली. तेणेंकरून कंपनीस व्यापाराचा जो परवाना मिळाला, तो वाढतां वाढतां १८९८ सालापर्यंत टिकला. ह्या तत्त्वावर रचिलेल्या कंपनीस 'रेग्युलेटेड कंपनी' म्हणत. निरनिराळ्या शहरांत जे ट्रेडगिल्ड्स म्हणजे धंदेवाल्या लोकांचे संप म्हणून असत, तेच संप जरा विस्तृत केले म्हणजे रेग्युलेटेड कंपनी होत असे. अशा कंपनींतील प्रत्येक इसमास कंपनीच्या नियमांबरहुकूम काम करण्याची मोकळीक असे, व त्यास कंपनीच्या संरक्षक छत्राचा फायदाही मिळे. ज्या कोणास ह्या कंपनीच्या नियमांप्रमाणें व्यापार करण्याची इच्छा असे, त्यास कंपनीनें ठरविलेली फी भरून कंपनीचा सभासद ( मेंबर ) व्हावें लागे. तसेंच धंदेवाल्या संपामध्यें उमेदवार म्हणून घेण्याची वहिवाट आहे, म्हणजे एखाद्यानें त्या धंद्यांत कांहीं दिवस फुकट काम केल्यावर त्यास त्या धंद्याचा उमेदवार होतां येतें. तशा प्रकारें ह्या कंपनींतील व्यापाऱ्यांजवळ उमेदवार म्हणून लोक येत व त्यांची लायकी ठरल्यावर त्यांस मेंबर करण्यांत येई. एकदां असा परवाना राजाकडून मिळाला म्हणजे त्याजविरुद्ध आचरण करणें मोठें धाडसाचें काम असे. परवाना मोडणारास भयंकर शिक्षा असत. अशा प्रकारचे मक्ते किंवा इजारे देण्याची वहिवाट आपल्या मराठशाहींतही सर्वत्र होती. मराठशाहींत

तालुक्याच्या किंवा प्रांताच्या वसुलाचा इजारा लिलांवानें विकण्यांत येत असे. व्यापार सर्वांस सारखा खुला असावा हें तत्त्व इंग्लंडांत त्या वेळीं उदयास आलें नव्हतें. राजाकडून इजारा मिळण्यास मोठ्याच अडचणी असत; व म्हणूनच इजारा मिळणें ही मोठ्या महत्त्वाची गोष्ट असे. ईस्ट इंडिया कंपनीनें मागितलेल्या इजाऱ्यास नेहमींच्यापेक्षां विशेष अडचणी होत्या. लोकांनीं अनेक वशिले लाविले; राणीच्या व मंत्र्यांच्या अनेक वेळां खासगी मुलाकती घेतल्या; व अनेक वेळां त्यांची संपूर्ण निराशा झाली. कारण हे सर्व लोक सामान्य प्रतीचे होते. सभ्य गृहस्थ (gentlemen) म्हणविले जाणारे त्यांत थोडेच होते. ते सामान्य लोकांप्रमाणें साधे भोळे व रांठ होते. तेव्हां त्यांची दाद लौकर लागणारी नव्हती.

ता. २४ सेप्टेंबर १९९९ रोजीं लंडनांत फाउन्डर्स हॉलमध्यें जी सभा भरली तींत लंडनचा लॉर्ड मेयर सर स्टीफन् सोम् ( Sir Stephen Soame ) हा अध्यक्ष होता. रिचर्ड स्टेपर व टॉमस स्मिथ् हे त्यांचे पुढारी होते. यांशिवाय दुसरीही कित्येक नामांकित मंडळी हजर होती. पण त्यांजबरोबरच खलाशी, शिपाई, प्रवासी वगैरे प्रकारचे अनेक लोक होते. लँकॅस्टर, डेव्हिस, प्रेटि, फिच्, बॅफिन्, मिडल्टन् वगैरे पूर्वेकडील प्रदेश पाहिलेली बहुतेक मंडळी हजर होती. मौल्यवान मालानें आकंठ भरलेलीं मोठमोठीं स्पॅनिश व पोर्तुगीज जहाजें त्यांनीं अनेक वेळां भरसमुद्रांत पाहिलीं होतीं व कित्येकांवर त्यांनीं तावही मारिला होता. हिंदुस्थानांत जाऊन आपण कशी चंगळ उडवूं ह्याचें सुरेख वर्णन त्यांनीं त्या सभेंत केलें. नानाप्रकारच्या वेड्याविद्या हावभावांनीं व वेड्यावांकड्या शब्दांनीं त्यांनीं आपल्या मनांतील भाव व्यक्त करून दाखविले. इतर सर्व राष्ट्रांचे लोक आपणांस केवळ लुटारू ( *Pirates* ) समजतात हें आपणांला लांछन आहे, असें त्यांनीं मोठ्या

करुण वाणीनें व्यक्त करून दाखविलें. त्यांनीं हेंही सांगितलें, कीं पोर्तुगीज, स्पॅनिश् व डच् ह्यांनीं इतक्या वर्षें कितीही प्रदेश काबीज केले असले, तरी पूर्वेकडील देशांच्या विस्ताराच्या मानानें ह्या राष्ट्रांचे हातास कांहींच लागलें नाहीं असें म्हटलें तरी चालेल, इतकी तिकडे संपत्ति आहे. अशा प्रकारचीं भाषणें झाल्यावर, प्राच्य व्यापाराचा इजारा राणीपाशीं मागून आपल्या देशाची अब्रू राखावी व व्यापाराच्या योगानें संपत्ति वाढवावी, अशी विनंती राणीस करण्याचा ठराव सर्वानुमतें पास झाला. वर्गणीनें एकदम मोठें भांडवल जमविण्यांत आलें. भागीदारांपासून नुसतें आश्वासन किंवा दुसरा कांहीं ऐवज न घेतां रोख पैसा घेण्याचा ठराव झाला. लिव्हँट कंपनीच्या कामांत आलेला अनुभव उपयोगांत आणून तसल्या चुका पुनः करावयाच्या नाहींत असा सर्वांचा संकल्प होता. कंपनीचें नेहमींचें काम चालविण्याकरितां पंधरा डायरेक्टरांची एक व्यवस्थापक मंडळी नेमण्यांत आली. एवढें काम करून सभा बरखास्त झाली. आपण रोवलेल्या बीजाचा पुढें केवढा वृक्ष होणार याची यत्किंचित् कल्पना घरीं जातांना त्यांचे मनांत आली असेल काय ! लंडनांत तराजू धरणाऱ्या मंडळीचे हातांत वीस कोटी लोकांचें स्वामित्व, हिरेजडित सिंहासनाचें आधिपत्य, व रोमन बादशाहीनंतर आजपावेतों कधीं कोणास न मिळालेलें बादशाहीपद जाईल, असें त्यांच्या स्वप्नीं तरी आलें असेल काय ! !

७. **सनद मिळविण्याची खटपटः**—दुसऱ्याच दिवशीं डायरेक्टरांची सभा भरली. त्यांनीं आपल्या दोन शाखा केल्या. प्रिव्हिकौन्सिल व राणी यांजकडून कंपनीचा अर्ज मंजूर करून घेण्याकरितां एक, व दुसरी जहाजें वगैरे घेऊन पहिल्या सफरीची व्यवस्था करण्याकरितां. पोपाचा हुकूम मोडून दक्षिण आफ्रिकेच्या रस्त्यानें पोर्तुगीझांच्या प्रथम आड येणारे लोक इंग्रज होत. डच इंग्रजांचे पश्चात् गेले. तरी पण पोपाचा

हुकूम डच लोकांनीं मोडला आहे, त्याअर्थीं आपणास व्यापाराची परवानगी देण्यास हरकत नाहीं, असें कंपनीनें आपल्या अर्जांत दर्शविलें होतें. एलिझाबेथ राणीच्या मनांत कंपनीचें म्हणणें एकदम कबूल करावें असें होतें. पण प्रिव्हिकौन्सिल कंपनीच्या विरुद्ध होतें. कंपनीचा प्रयत्न हाणून पाडण्याचा कौन्सिलचा इरादा होता. स्पेनशीं तह करण्याचा विचार घाटत होता. स्पेनशीं पुष्कळ दिवस युद्ध करून दरबारच्या नाकीं नव आले होते. राणीची प्रकृति क्षीण होत चालला असून स्पेनशीं एकदांची गोडी व्हावी असें तिलाही वाटत होतें. तथापि त्याकरितां आपल्या व्यापाऱ्यांचें नुकसान करण्यास मात्र ती तयार नव्हती. ता. १६ ऑक्टोबर रोजीं कमिटीनें राणीची मुलाकात घेतली. तिला हा उद्योग मोठा स्तुत्य वाटला; व त्यांची मागणी कबूल करण्याचें तिनें अभिवचन दिलें. 'मात्र प्रिव्हिकौन्सिलकडून सफर करण्याची व सफरीच्या खर्चास लागणारा पैसा बाहेरदेशीं नेण्याची परवानगी घ्या. तसेंच तुम्हांला जे कांहीं हक्क पाहिजे असतील, त्यांचा मसुदा त्यांजपासून पसंत करून घ्या, म्हणजे मग मी आपला रुकार देईन.' अशा गोड शब्दांनीं राणीनें वेळ मारून नेली. राणीच्या सुस्वभावाची तारीफ करीत मंडळी घरीं गेली. तिची ह्या प्रसंगीं कशी त्रेधा उडाली होती, ती त्यांस काय माहीत ?

कांहीं दिवसांनीं ते प्रिव्हिकौन्सिलपुढें गेले. तेथें त्यांस चक्क जबाब मिळाला कीं, 'राज्याच्या कार्यापुढें तुमच्या खासगी कामाचें महत्त्व कांहींच नाहीं. स्पेनच्या दरबाराशीं तह घाटत आहे. त्यास तुमच्या उद्योगानें व्यत्यय मात्र येईल.' ह्या उत्तरानें त्यांचा अगदींच पाणउतारा होऊन गेला. शेवटीं त्यांनीं इतकेंच विचारिलें कीं, 'तर मग आम्हीं डच लोकांचे गुलाम व्हावें कीं काय? स्पेनशीं तह जोडल्यानें आम्हांस सालिना दहा लाखांची प्राप्ती होणार आहे काय?'

तरी कौन्सिलची समजूत पडली नाहीं व ' आपणांस पाहिजे तें आपण राणीपासून मिळवूं,' असें म्हणत ते परत गेले. आणखी एक वर्षपावेतों पहिली सफर रवाना होत नाहीं हें उघड झालें.

कंपनीचा उद्योग स्पेनच्या विरुद्ध आहे, हें प्रिव्हिकौन्सिलचें म्हणणें खोडून काढण्याकरितां डायरेक्टरांनीं पुष्कळ श्रम करून नानातऱ्हेचीं भूगोलिक माहिती कौन्सिलपुढें ठेवून सांगितलें, कीं ' ह्या अफाट भूपृष्ठावर स्पेन किंवा पोर्तुगाल यांचा मुळींच रिघाव झालेला नाहीं असे शेंकडों विस्तीर्ण प्रदेश असतां, त्या ठिकाणीं जाण्याची आम्हांस स्पेन मनाई करणार कोण ? ' ह्या मंडळीच्या अर्जावर राणीनें त्यांजशीं स्वतः पुष्कळ वाटाघाट केली, व सेक्रेटरी वॉलसिंगहॅम ( Walsingham ) याजपाशीं तो अर्ज देऊन ' त्यांतील हकीकत खरी आहे किंवा नाहीं ह्याचा तपास करून आम्हांस कळवा, ' असें सांगितलें. त्याप्रमाणें तपास करून वॉल्सिंगहॅमनें कळविलें कीं, कंपनीचें मागणें बरोबर आहे. लिव्हँट कंपनी तुर्कस्थानांत व्यापार करीत असतां तिला जर स्पेनकडून हरकत येत नाहीं, तर तुर्कस्थानाप्रमाणें इतर देशांशीं व्यापार करण्यास स्पेननें हरकत काय म्हणून घ्यावी ?

कंपनीच्या इतिहासांत एक गोष्ट अगदीं स्पष्टपणें दिसून येते ती ही, कीं कोणत्याही कामांत यश आलें असतां जसा उद्योग पुढें चालतो, तसाच अपयश आलें तरी तिचा उद्योग पुढें चालू असे. तिचे चालक कधीं म्हणून हताश होऊन स्वस्थ बसले नाहींत. प्रिव्हिकौन्सिलनें कंपनीचा अर्ज नामंजूर केल्याबरोबर त्यांनीं अशी विनंती केली, कीं 'केप आफ् गुड्होपच्या पूर्वेस स्पेनचीं स्थळें कोणकोणतीं आहेत त्यांचा स्पष्ट निर्देश स्पेनच्या कमिशनरांकडून करून घ्यावा.' परंतु स्पेनकडून असा खुलासा मिळणार नाहींसें पाहून त्यांनींच सर्व प्रकारची माहिती मिळवून सादर केली. स. १६०० मध्यें स्पेन व इंग्लंडचा

तह पुरा झाला नाहीं, व होण्याची आशाही राहिली नाहीं. तेव्हां अशा प्रकारें वर्षभर वादविवाद झाल्यावर ता. २३ सेपटेंबर स. १६०० ह्या वर्षीं कंपनीची सभा पुनः भरली. तींत १७ असामी डायरेक्टर्स नेमून व्यापार करण्याचा बेत ठरला. पुढें डायरेक्टरांची सभा रोज भरत असे. त्यांनीं साठ हजार रुपयांस चार जहाजें विकत घेऊन सफर पाठविण्याची सिद्धता केली. वाटेच्या भोजनखर्चाकरितां साठ हजार रुपये बरोबर दिले; व लोखंड, कथील व कापड बाहेर विक्रीसाठीं जहाजांवर भरून घेतलें.

आतां पुढें दोन कामें व्हावयाचीं होतीं : कंपनीचा गव्हर्नर नेमणें, व पहिल्या सफरीचा कमांडर नेमणें. ह्यासाठीं ता० ३० आक्टोबर रोजीं कंपनीची सभा भरली. त्या वेळीं चोवीस डायरेक्टरांची व्यवस्थापक सभा नेमण्यांत येऊन ऑल्डरमन टॉमस स्मिथ ह्यास कंपनीचा पहिला गव्हर्नर नेमिलें; व कॅप्टिन लँकेस्टर ह्यास सफरीचा कमांडर नेमिलें; त्याच्या हाताखालीं डेव्हिस, मिडल्टन वगैरे कित्येक इसम दिले. एकंदर ह्या सफरींत ४८० मनुष्यें सर्वानुमतें नेमण्यांत आलीं. ह्यांपैकीं ३६ फॅक्टर्स म्हणजे हिशेबी कारकून असून त्या प्रत्येकास पांच हजार रुपयेंपावेतों जामीन द्यावा लागत असे. त्यांच्या पगाराचें मान समजण्याकरितां इतकें सांगणें बस आहे कीं कॅप्टिन डेव्हिस ह्यास सफरीच्या दिवसांबद्दल १०० पाउंड पगार व स्वतःचा व्यापार करण्याकरितां २०० पाउंड कर्ज द्यावयाचे; तसेंच परत आल्यावर, सफरीचा नफा शेंकडा दोनशें झाल्यास, ५०० पाउंड बक्षीस, शेंकडा ३०० झाल्यास १००० पाउंड बक्षीस व शेंकडा ५०० शें नफा झाल्यास २००० पाउंड बक्षीस द्यावयाचे, असा ठराव होता.

ता० ३१ डिसेंबर सन १६०० रोजीं कंपनीच्या सनदेवर राणीची सही झाली. त्या वेळीं ह्या कंपनीत २१५ सभासद होते. अर्ल आफ्

कंबर्लंड हा त्यांचा मुख्य होता. ह्या सनदेंत खालीं लिहिलेल्या मुद्याच्या गोष्टी होत्या.

आमच्या राष्ट्राची अब्रू राहवी, लोकांस संपत्ति मिळावी, जहाजांची शक्ति वृद्धिंगत व्हावी, म्हणजे एकंदरींत कायदेशीर व्यापार वाढून आमच्या देशाची भरभराट व्हावी, ह्या उद्देशानें एक राष्ट्रीय संस्था स्थापन करण्यांत येत आहे. ह्या संस्थेला 'पूर्वेकडील प्रदेशांशीं व्यापार करणारी लंडनच्या व्यापाऱ्यांची कंपनी व गव्हर्नर' असें नांव देण्यांत येत आहे. ह्या नांवाप्रमाणेंच तिचें काम चालावयाचें आहे.

कंपनीस दिलेल्या अधिकारांचा सारांश.—

( १ ) कंपनीचे मेंबर्स, त्यांचीं वयांत आलेलीं मुलें, त्यांचे नोकर व उमेदवार ह्यांस पंधरा वर्षेपर्यंत पूर्वेकडील व्यापाराचा इजारा देण्यांत येत आहे.

( २ ) मॅगेलनची सामुद्रधुनी व केप ऑफ् गुड् होप यांचे दरम्यान आशिया, आफ्रिका व अमेरिका ह्या ठिकाणचे पाहिजेत ते देश, बंदरें व बेटें ह्यांशीं मालाची नेआण करून कंपनीनें व्यापार चालवावा.

( ३ ) वरील देशांत पाहिजे तितकी जमीन विकत घेण्याचा कंपनीस अधिकार आहे.

( ४ ) कंपनीस फिर्याद मांडण्याचा व आपणांवर फिर्याद मांडून घेण्याचा व मोर्तब करण्याचा अधिकार आहे.

( ५ ) कंपनीनें आपल्या व्यवस्थेसाठीं पाहिजे ते नियम करण्याचा तीस अधिकार आहे.

( ६ ) इंग्रजी कायद्याअन्वयें गुन्हेगारांस दंडाची किंवा कैदबंदीची शिक्षा करण्याचा तीस अधिकार आहे.

( ७ ) ह्या सनदेंत दाखविलेल्या कंपनीशिवाय दुसऱ्या कोणीं इंग्रजान ह्या देशांशीं व्यापार केल्यास त्यास शिक्षा करण्यांत येईल.

ह्या शिवाय राणीनें कंपनीस स्वतः कांहीं विशेष सवलती दिल्या होत्या. पहिल्या चार सफरींत कंपनीकडून जो माल बाहेर विक्रीसाठीं नेण्यांत येईल, त्यावर निर्यात जकात माफ केली; व आयात जकातीचा भरणा करण्यास ६ पासून १२ महिन्यांची मुदत दिली. एकदां पहिल्या सफरींत तीन लाख रुपये पावेतों चांदी किंवा रोख नाणें बाहेर देशीं नेण्यास हरकत नाहीं; पण पुढील सफरींत बाहेर नेलेलें नाणें सहा महिन्यांच्या आंत परत आणिलें पाहिजे. म्हणजे आपल्या देशांतून पैसा बाहेर न जाऊं देण्याबद्दल त्या वेळीं विशेष कटाक्ष होता. मोगल बादशाहींतही नाण्याबद्दल असाच निर्बंध होता. शिवाय पांचशें इंग्रज खलाशी व सहा जहाजें पाहिजे तेव्हां दरसाल कंपनीस मिळत जावीं असा राणीनें हुकूम दिला. ह्या कंपनीचा उद्योग नीट चालतो असें दिसून आल्यास, पंधरा वर्षांची इजाऱ्याची मुदत वाढविण्यांत येईल, नाहींतर ती कमी करण्यांत येईल असेंही ठरलें.

इतकें झालें तरी थोड्याशा अडचणी राहिल्या होत्या. पहिल्या सफरीस एकंदर खर्च सात लाख रुपये लागला, तो वेळेवर वसूल होईना. तेव्हां कित्येकांनीं पदरचे कांहीं पैसे भरले, म्हणूनच काम चालू झालें. फेब्रुवारी पावेतों सर्व तयारी होऊन ता. १३ फे० रोजीं टेम्स् नदी सोडून जहाजें सफरीवर निघालीं.

८. **ह्या उद्योगाविषयीं स्फट चर्चा.**—एवंच एलिझाबेथ राणीच्या कारकिर्दीत इंग्रज राष्ट्राची नौकानयनांत प्रगति होऊन तिचा कळस ह्या कंपनीच्या स्थापनेनें झाला. अन्योन्यसाह्यकारित्व म्हणजे पुष्कळांनीं मिळून एका निश्चयानें एक काम तडीस नेण्याची पद्धत ही ह्या प्रसंगीं उत्तम तऱ्हेनें सिद्ध झाली. हिंदुस्थानसारख्या दूरच्या ठिकाणचा व्यापार अलग अलग रीतीनें थोडथोडा खर्च करून एखाद दुसरें जहाज गेल्यानें हातास येणार नाहीं. त्यास सर्वांनीं एकत्र होऊन सर्व राष्ट्राचें पाठबळ घेतलें

पाहिजे, स्पेन, डच वगैरे राष्ट्रांशीं वेळेस दोन हात केले पाहिजेत, हें काम एकट्याच्यानें होणारें नव्हे, अशी ओरड कंपनीचे व्यापारी आपल्या अर्जांत प्रथमपासूनच करीत असत. तसेंच प्रत्येक बाबतींत कोणाचीही भीड किंवा मुर्वत न धरितां काम करण्याचा ह्या व्यापाऱ्यांचा इरादा होता. रोख पैसे न भरतां कोणी कांहीं माल देईल किंवा जहाज देईल तर घ्यावयाचें नाहीं असा त्यांचा संकल्प होता. अलीकडे जॉइंट स्टॉक कंपन्या निघतात तशा प्रकारची ही कंपनी होती. तथापि पुढें जें त्या कंपनीचें काम वाढलें व रूपांतर झालें त्याची त्या वेळीं कोणासच कल्पना नव्हती. त्याचा पाया इजाऱ्याच्या पद्धतीवर होता. म्हणजे दुसऱ्या कोणासही त्या व्यापाराचें काम करण्याची परवानगी नव्हती. सर्वांच्या मदतीची ज्या कामांत जरूर त्या कामांत व्यक्तीची स्वतंत्रता कमी होणें साहजिक आहे. असें असूनही ही कंपनी राष्ट्रीय नव्हती. म्हणजे डच कंपनीप्रमाणें तींत सर्व इंग्रज राष्ट्राचा समावेश नव्हता. तिचें सर्व सामर्थ्य राजानें दिलेल्या हक्कांवर अवलंबून होतें. दर खेपेला सफर पाठवितांना राजाची परवानगी घ्यावी लागे. एका बंदरांतील माल दुसऱ्या बंदरीं नेण्यासही राजाची परवानगी लागे. तसेंच राजाचें मिरीं विकिल्याशिवाय कंपनीनें आपलें मिरीं विकूं नये असा निर्बंध असे. कंपनीच्या अंतर्व्यवस्थेंत कांहीं बखेडा झाला, कोणीं आपली वर्गणी वेळेवर दिली नाहीं, एखाद्या सफरींत जाण्यास खलाशी, जहाजें किंवा सुतार मिळाले नाहींत, किंवा एखाद्या अपयशी कप्तानानें कांहीं कसूर केली असली, तर प्रिव्हिकौन्सिलकडे जाऊन त्या गोष्टींचा निकाल करून घ्यावा लागे. अर्थात् अनेक गोष्टींत ही कंपनी राजाचे हुकुमानें बांधिलेली होती. काम करण्याचा सर्व अधिकार फक्त २४ इसमांच्याच हातीं होता. अलीकडील कंपनीच्या कायद्यानें कोणत्याही कंपनीस पूर्ण स्वातंत्र्य देतां येतें तसें त्या कंपनीस नव्हतें. कंपनीचा मेंबर होण्याचे

जे अनेक मार्ग होते त्यांपैकीं पहिला मुख्य म्हणजे तिचा भाग विकत घेणें हा होय. त्या भागाची किंमत आरंभीं २०० पौंड होती. दुसऱ्या सफरींत ती १०० पाउंड झाली, त्या योगानें अनेक लहान लहान भागीदारांचे हातांत कंपनीची सत्ता जाऊं लागली. सन १६०७त तिसरी सफर गेली, तींत २०९ भागीदारांपैकीं १०८ असामी २०० पाउंडाखालचे होते. हा प्रकार न व्हावा म्हणून सन १६०८त भागाची किंमत ५०० पौंड करण्यांत आली. तथापि लहान लहान मंडळीस व्यापारांत सामील होतां यावें याकरितां पुष्कळांनीं आपल्या रकमा एकाच्या नांवानें भराव्या अशी योजना करण्यांत आली. ह्याप्रमाणें भागाची किंमत वारंवार बदलत असे. एक भाग घेणारास सभेंत एक मत देण्याची परवानगी होती.

पहिल्या सफरीस ६८,३७३ पौंड भांडवल लागलें. हें सर्व पहिल्या मंडळीनें जमा केले. पण प्रत्येक सफरीचा जमाखर्च वेगळा व नफानुकसान त्या सफरीपुरतेंच असा आरंभीं ठराव होता. पण दुसरी सफर जाण्यापूर्वी पहिलीचा हिशेब पुरा होत नसे. आलेला माल विकण्यास किंवा दुसऱ्या भानगडींचा निकाल करण्यास पुष्कळ कालावधि लागे. म्हणून दुसऱ्या सफरीस लागणारें भांडवल पुनः पहिली मंडळी आपण देत, किंवा तें देणारी दुसरीच मंडळी आणीत; व त्या दुसऱ्या सफरींचें नफानुकसान त्या सफरींत ज्यांनीं भांडवल घातलें असेल त्यांसच सोसावें लागे. अशा रीतीनें जितकी नवी मंडळी वर्गणी देई, तितकी सर्व कंपनीचे सभासदांत दाखल होई. सारांश, पहिली ई० इं० कंपनी पहिल्याच एका भांडवलावर चालली होती असें नाहीं. मात्र नफानुकसानीच्या वेळेला ज्या त्या सफरीपुरता हिशेब ठेवींत असत. पण तिसऱ्या, चौथ्या किंवा पुढील सफरींत नवीनच मंडळींनीं पैसे भरले, म्हणजे मग पहिल्या सफरींतल्या लोकांस काम काय, असा

प्रश्न राहतो. तर त्यांस काम पुष्कळ होतें. नवीन सफरी कोठें पाठवावयाच्या, त्यांस खर्च किती लागेल त्याचा अंदाज करून रकम वर्गणीनें गोळा करावयाची, त्या सफरींस राजाची परवानगी मिळवावयाची, सफरीसाठीं जहाजें माल वगैरे विकत घ्यावयाचा, व नफानुकसान विभागून द्यावयाचें, इत्यादि कामें त्या मंडळीस करावीं लागत. कित्येक वेळां नवीन वर्गणीदार न मिळाले तर पहिल्याच लोकांस पैसे भरणें भाग पडे. सारांश अलीकडील कंपनीप्रमाणें ह्या कंपनीचें काम सरळ नव्हतें. त्यांत अनेक नवीन लोक व नवीन पैसा सामील होऊन, दर सफरीचा हिशेब निराळा ठेवावयाचा असल्यामुळें, अनेक भानगडी उत्पन्न होत. शेवटीं अशा भानगडींतच कंपनीचा अंत झाला. एक सफर चालू झाली म्हणजे कंपनीच्या सभासदांस थोडी विश्रांति मिळे; पण लगेच दुसरा एखादा गृहस्थ नवीन सफरीची योजना करी. तिचा विचार करण्याकरितां सभा भरे व काम चालूं लागे. त्या सफरीचें जाहीरपत्रक तयार करून तिचे उद्देश व खर्चाचा व नफानुकसानीचा अंदाज आरंभीं लिहून, हजर असलेले लोक मर्जीप्रमाणें त्यांत आपली वर्गणी भरीत व नंतर तें बूक वर्गणी जमविण्याकरितां लोकांत फिरविण्यांत येई. अशा रीतीनें पैसा जमा झाला तर बरें, नाहीं तर पुनः भवतिनभवति होऊन वर्गणी गोळा करण्यासाठीं मुद्दाम निराळी कमिटी नेमण्यांत येई. कित्येक प्रसंगीं एका सफरीच्या वर्गणीदारांसच पुढच्या सफरीची वर्गणी देणें भाग पडे. अशा रीतीनें वर्गणी गोळा झाल्यावर त्या सफरीचे नियम करून राजाची परवानगी वगैरे मिळविण्याचें काम सुरू होई. बहुतेक काम डायरेक्टरांची सभा करी व सर्व सिद्धता झाल्यावर सर्व वर्गणीदारांची सभा भरवून त्यांजपुढें काम ठेवण्यांत येई.

वर्गणीदारांस ' ब्रदर आफ धि कंपनी ' किंवा ' प्रोप्रायटर आफ धि कंपनीझ स्टॉक ' असें म्हणत. त्यांच्या वर्तणुकीबद्दल अगदीं किरकोळ गोष्टींतही नियम केलेले होते. सभेस मुळींच न येणारास, किंवा सभा बरखास्त होण्यापूर्वी निघून जाणारास, आठ आणे, व उशीरां येणारास चार आणे दंड होता. कित्येक वेळां प्रिव्हिकौन्सिलकडून तुरुंगांत पाठविण्याचें वॉरंटही घेण्यांत येई. सभेंत कोणासही तीनपेक्षां ज्यास्त वेळ बोलण्याची परवानगी नसे; ज्यास्त वेळ बोलल्यास पावणेदोन रुपये दंड होता. दुसरा बोलत असतां मध्येंच कोणी बोलल्यास किंवा बडबड केल्यास सव्वा रुपया दंड; व अयोग्य वर्तनाबद्दल पांच रुपये दंड होता. सारांश, अध्यक्षाचा हुकूम पाळावाच लागे. दंड न दिल्यास सर्वानुमतें कैदेंत जाण्याची शिक्षा होई.

कोणत्याही नवीन सफरीची सिद्धता करावयाची म्हणजे चार मुख्य गोष्टी कराव्या लागतात. प्रथम राजाची लेखी परवानगी मिळविणें, ह्यांत सफरीचा जो कमांडर नेमलेला असेल त्यास सर्वप्रकारचे अधिकारही दिलेले असत. दुसरी, सफरीच्या मुख्य कामगारानें काय काय कामें करावयाचीं त्यांची यादी नक्की करणें. तिसरी, लेटर्स पेटंट म्हणजे राजाच्या शिक्क्याचा परवाना मिळविणें. हा बाहेरच्या राष्ट्रांस दाखवावा लागे. चवथी गोष्ट म्हणजे बाहेरच्या राजांस इंग्लंडच्या राजाचें स्वदस्तुरचें दत्र घेणें. एलिझाबेथ राणीनें अशा प्रकारचें एक सरपत्र इकडील राजांस देण्यासाठीं पहिल्या सफरीच्या मुख्याशीं दिलें होतें तें अनेक गोष्टींच्या संबंधानें विशेष पाहण्यासारखें असल्यामुळ, जसेंच्या तस तर्जुमा करून येथें देतों:—

फेब्रुवारी, स. १६००

परमेश्वरकृपेंकरून इंग्लंड, फ्रान्स व ऐर्लंडची राणी एलिझाबेथ यांजकडून,..............चे थोर व पराक्रमी राज्यकर्ते...............यांस.

सर्वशक्तिमान प्रभूनें आपल्या अपरिमित व अगाध शहाणपणानें व कृपादृष्टीनें ह्या जगांत मनुष्याच्या उपभोगाकरितां अनेक उत्तम वस्तु उत्पन्न करून त्यांची सर्वत्र सुव्यवस्था करून ठेविली आहे. ते जिन्नस कोठेंही व कसेही मूळ पैदा झाले असले, व कांहीं ह्या देशांत व कांहीं त्या देशांत तयार झाले असले, तरी ते ह्या प्रभूच्या हुकुमानें पृथ्वीवरील सर्व राष्ट्रांस पोंचले जावे व त्याचें अपरिमित औदार्य सर्व जनांस सारखें प्राप्त व्हावें, असा त्या प्रभूचा उद्देश दिसतो; ज्या प्रदेशांत तो जिन्नस पिकेल, तेथच्या लोकांनीं मात्र तो वापरावा, इतर देशांतील लोकांस तो मिळूं नये, असा त्याचा हेतु दिसत नाहीं. एका देशानें दुसऱ्या देशाच्या उपयोगीं पडावें, व एका देशांत जो जिन्नस विपुल पिकतो, त्यानें दुसऱ्या देशाची गरज भागावी, असा ईश्वरी उद्देश असल्यामुळेंच दूरदूरच्या अनेक देशांमध्यें व्यापाराची घडामोड चालते, व मालाची देवघेव चालल्यानें, त्यांजमध्यें स्नेहभाव व प्रेम वाढत जातें.

महाराज ! ह्या वर सांगितलेल्या हेतूशिवाय आणखी आम्हांस असें समजलें आहे, कीं कोणीही परराष्ट्राचे लोक व्यापाराचा उद्देश मनांत धरून स्नेहभावानें व सौम्यवृत्तीनें आपल्या देशांत गेले असतां, आपण त्यांचा उत्तम प्रकारें आदर करितां. ह्यावरून आमच्या कित्येक व्यापाऱ्यांस आपल्या देशांत जाण्याची परवानगी देण्यास आम्हांस उमेद आली आहे. आपल्या देशांत व्यापारी मालाचा सौदा फार उत्तम होतो असें इकडे खात्रीलायक कळल्यावरून, जलमार्गाचीं अनेक दुर्धर संकटें सहन करूनही हे व्यापारी तिकडे जात आहेत. तेथें आपल्या लोकांशीं व्यापारी धोरणानें सौदा करावा, म्हणजे इकडचे जिन्नस त्यांस विकून तिकडचे इकडे विकत आणावे, असा ह्यांचा उद्देश आहे. एवढीं संकटें सोसून आपल्या देशांत प्रवेश करण्याची ज्या अर्थीं त्यांस

स्फूर्ति झाली आहे, त्या अर्थीं आपणही त्यांचा योग्य परामर्श घेतला असतां, बोलण्याचालण्यांत व व्यवहारांत ते चोख व सभ्य आहेत असें आपणांस दिसून येईल; व ते आपल्या देशांत आल्याबद्दल आपणांस वाईट वाटण्याचें कारण राहणार नाहीं. तसेंच, त्यांनीं आपल्या गलबतांतून नेलेला इकडचा माल आपणास देण्यांत व आपणांकडचा माल इकडे आणण्यांत एकमेकांचा निकट सहवास व व्यवहार घडल्यावर, त्यांनीं पुनरपि असाच माल घेऊन आपल्या देशांत यावें असें आपणांस वाटेल. आजपर्यंत फक्त स्पॅनिश व पोर्तुगीझ व्यापारीच कायते इकडचा माल आपल्या देशांत नेत आहेत; पण ते लोक व्यापाराच्या कामांत आमच्या व्यापाऱ्यांस व इतर लोकांस नाहक जाच करितात. वास्तविक पाहिलें तर, ते आपल्या देशांत व्यापाराच्या उद्देशानें गेले आहेत असें नाहीं. तिकडच्या सर्व देशांचे मालक व बादशहा आपणच आहों असें ते लोक समजतात; व तिकडचे सर्व लोक आपल्या केवळ प्रजा आहेत असें इकडे लोकांस ते सांगत सुटले आहेत; व लिहिण्यांतही ते तसा व्यवहार उघडपणें करीत आहेत.

आमचे जे लोक केवळ व्यापाराच्या सौम्य उद्देशानें आपल्याकडे आज जात आहेत, त्यांस आपण मेहेरबानी करून आपल्या देशांत येऊं द्याल, व आजच्या ह्या पहिल्या प्रसंगाची ओळख पुढें चालू ठेवून आपल्या व आमच्या प्रजेमध्यें हें व्यापाराचें व स्नेहाचें दळणवळण वृद्धिंगत कराल, अशी आम्हांस आशा आहे. आपली आज्ञा असेल तर आमचे कांहीं व्यापारी इकडे परत येऊन पुनः इकडचा माल भरून तिकडे नेत तोंपर्यंत, बाकीची मंडळी आपल्या कृपाछत्राखालीं तेथेंच राहून तेथची भाषा वगैरे शिकतील; कीं जेणेंकरून एकमेकांचे विचार व रीतरिवाज एकमेकांस कळल्यानें स्नेह वृद्धिंगत होऊन उभयतांचा उद्देश पार पडेल.

आपला आमचा स्नेह वृद्धिंगत होऊन दळणवळण वाढावें ह्यासाठीं उभयतांमध्यें कांहीं करार किंवा ठराव होण्याची जरूर आहे. त्यासाठीं, हें पत्र आपणाकडे घेऊन जाणारे इसमांस आमच्या तर्फे बोलणें व ठराव करण्यास आम्हीं संपूर्ण अधिकार दिला आहे. ते गृहस्थ आपल्याशीं जे ठराव करतील, तो आम्ही इमानानें पाळूं; व आपण आमच्या ह्या लोकांवर जी मेहेरबानी किंवा उपकार कराल त्यांची फेड आम्ही मोठ्या आनंदानें करूं. अखेरीस एवढेंच मागणें आहे, कीं आमचा हा उद्देश आपणांस पसंत पडल्याचें निदर्शन म्हणून आपण या पत्राचा जबाब गेलेल्या मंडळीजवळ द्यावा. आपण जबाब पाठविल्यानें आमच्यावर आपली मोठी मेहेरबानी होईल व आम्हांस अतिशय संतोष वाटेल. "

ह्या पत्रांतील मजकुरावर टीका करण्याची जरूर नाहीं. मात्र या गोड-गोड शब्दांनीं आम्ही फसून पाश्चात्यांच्या पाशांत सांपडलों, इतकें खरें.

अशा प्रकारचे चार मुख्य कागद प्रत्येक सफरीच्या वेळीं तयार करावे लागत. ही एका सफरीसंबंधानें गोष्ट झाली. मध्यंतरीं दुसरीं कामें उपस्थित होत त्यांचा एक मासला येथें देतों. पहिली सफर निघून गेल्यावर जॉर्ज वेमथ नांवाच्या एका दर्यावर्दी पुरुषानें कंपनीकडे अर्ज करून विचारिलें, कीं 'उत्तरेकडून हिंदुस्थानास जाण्याचा मार्ग मी शोधून काढण्यास तयार आहें, तर हा उद्योग कंपनी आपल्या खर्चानें हातीं घेण्यास तयार आहे कीं नाहीं; नसेल तर आम्ही स्वतंत्र रीतीनें तो मार्ग शोधून काढल्यास कांहीं वर्षेपर्यंत हिंदुस्थानच्या व्यापाराचा मक्ता आम्हांस देण्यास कंपनी तयार होईल कीं नाहीं?' ह्या अर्जावर कंपनीनें सभा भरून, आपल्या खर्चानें तें काम करण्याचा ठराव केला; व त्यास तीस हजार रुपये खर्च लागत होता, त्याची तजवीज केली. कॅप्टिन वेमथ यास एक हजार रुपये हत्यारांकरितां द्यावे, व नवीन मार्ग सांप-

डल्यास पांच हजार रुपये बक्षीस द्यावे, न सांपडल्यास कांहीं देऊं नये असा त्याजबरोबर ठराव झाला. नंतर ह्या उपक्रमानें आपल्या उद्योगांत व्यत्यय येतो अशी मस्कोव्ही कंपनीनें तक्रार केली, तिचा निकाल लावण्यांत आला. सर्व सिद्धता व ठराव करण्यांत आले. राणीनें पत्रें लिहून दिलीं. परंतु ह्या सफरीचा कांहीं एक उपयोग झाला नाहीं. त्यांत घातलेला सर्व पैसा फुकट गेला. इतःपर उत्तरेकडील सफरीच्या भानगडींत कंपनी फारशी पडली नाहीं. तरी मधून मधून थोडीबहुत उचल होत असे. स० १६०६त जॉन नाइट व स० १६०७, ८ व ९ ह्या सालीं हेन्री हड्सन ह्यांनीं ध्रुवाकडील प्रदेशांत सफरी केल्या. तसेंच १६१२पासून वुल्यम बॅफिन ह्यानें तिकडे सफरी करून बराच शोध लाविला, व शेवटीं १७४१त रशियन कॅप्टिन बेहरिंग ह्यानें बेहरिंगची सामुद्रधुनी शोधून काढिली.

कंपनीच्या व्यवस्थापक मंडळींत एक गव्हर्नर, एक डेप्युटी गव्हर्नर, एक ट्रेझरर, व २४ असामींचें एक बोर्ड, ही मंडळी दरसाल जुलै महिन्यांत बहुमतानें निवडण्यांत येत असे. तीच तीच मंडळी फिरून निवडण्यास हरकत नसे. त्यांच्या मदतीस एक सेक्रेटरी, एक अकाउंटंट व कांहीं कारकून असत. आरंभीं निरनिराळ्या सफरींचें काम चालू होतें तोंपर्यंत ही व्यवस्थापक सभाच काय ती सर्व गोष्टींत मुखत्यार होती. वर्गणीदारांच्या हातांत फारशी सत्ता नव्हती. पण सुमारें पंन्नास वर्षांनीं ह्या व्यवस्थापक बोर्डाचा अधिकार पुष्कळ कमी झाला. प्रत्येक सफरीचा हिशेब जरी निराळा असे, तरी एका सफरींत काम केलेलीं माणसेंच बहुतेक दुसऱ्या सफरींत घेण्यांत येत असत. तसेंच एका सफरीचा माल किंवा उत्पन्न दुसऱ्या सफरीस देऊन तें पुढील हिशेबांत धरण्यांत येत असे. हिंदुस्थानांत जी मंडळी असत ती बहुतकरून बदलत नसे. तिचा खर्च ज्या त्या सफरीवर धरून घेण्यांत

येत असे. हिंदुस्थानांतले लोक खासगी व्यापार करीत, तो बंद करण्यासाठीं मात्र अतोनात त्रास पडला. हिंदुस्थानांत आलेले लोक एका कुटुंबाप्रमाणें राहत व त्यांजवर कंपनीची देखरेख कुटुंबासारखीच असे. म्हणजे हल्लीं ज्याप्रमाणें सरकारी नोकराच्या खासगी राहणीकडे पाहण्याची सरकारास जरूर वाटत नाहीं, तसा प्रकार तेव्हां नव्हता. प्रत्येक वखारीच्या ठिकाणीं सर्व लोक एकत्र राहत, एका ठिकाणीं जेवीत, सकाळ संध्याकाळ एकत्र जमून प्रार्थना करीत; व त्यांस ठरलेल्या वेळेपुढें रात्रीं बाहेर जाण्याची मनाई असे. ईस्ट इं० कंपनीकडून बाहेर गेलेलीं आरंभींचीं पुष्कळ पत्रें ह्या लोकांच्या वर्तनासंबंधाचींच आहेत. भांडूं नये, शरीर स्वच्छ ठेवावें, वरीष्टांस मान द्यावा, उपाध्यायाचें ऐकावें, प्रकृतीची काळजी घ्यावी, चहाडी किंवा अनीतीचें वर्तन केल्यास शिक्षा होईल, जुगार बिलकुल खेळतां नये, अमर्यादित मद्यपान व मेजवान्या करूं नयेत, अशा प्रकारचा उपदेश सर्वत्र आढळतो. व्यापाराच्या हकीगतींत अशा खासगी वर्तनाचा उल्लेख दरएक ठिकाणीं आलेला पाहून कंपनी आपल्या नोकरांशीं कशा प्रकारचा संबंध ठेवीत असे हें दिसून येतें. ‘ ईश्वरावर भक्ति ठेवून व त्याची भीति बाळगून वागा, ’ हा उपदेश तर पदोपदीं आहे. तुम्ही आपला पेहराव व खासगी वर्तणूक अशी ठेवा, कीं त्यास खर्च फार येऊं नये व व्यापाराच्या हेतूस कोणतीही अडचण येऊं नये; कॅप्टिन वगैरे लोकांस सन्मान देण्यासाठीं बंदुकांची किंवा तोफांची सरबत्ती देऊन दारूगोळा संपविणें ठीक नाहीं; पोर्तुगीझ लोक आपला दारूगोळा अशा कामींच उडवून देत, हें ध्यानांत ठेवा. एकंदरींत पोर्तुगीझ लोकांचा कित्ता न गिरवितां डच लोकांचें अनुकरण करा, डच लोक हे उद्योगी व सावध असतात, तसे तुम्ही वागा.’ अशा प्रकारचा उपदेश नेहमीं करण्यांत येत असे.

ह्या नोकर मंडळीकरितां चांगलीं चांगलीं पुस्तकेंही पाठविण्यांत येत असत. सारांश ह्या उद्योगावरून कंपनीच्या पुढील यशःप्राप्तीची कल्पना करितां येईल.

---

## प्रकरण नववें.

### पृथक् सफरी व सर टॉमस रो.

(स० १६००–१६२०.)

१. युरोपियन कंपन्या. २. पहिल्या पृथक् सफरी.
३. पोर्तुगीझांशीं पहिला झगडा. ४. चीनजपानकडील प्रयत्न.
५. सर टॉमस रोची नेमणूक व प्रयाण. ६. मोगल दरबारची स्थिति.
७. तहाचा मसुदा व वाटाघाट. ८. ह्या उद्योगाची कमाई.
९. इराणांतील खटपट.

**१ युरोपियन कंपन्या.**—युरोपांतून हिंदुस्थानांत प्रथम पोर्तुगीझ लोक आले. त्यांच्या कंपन्या नव्हत्या. त्यांचा सर्व व्यापार राजाच्या हातांत होता. स० १७५२त पोर्तुगीझ सरकारानें हिंदुस्थानचा व्यापार पाहिजे त्यानें करण्यास मोकळीक दिली. तेथपावेतों सरकारच्या हुकुमाशिवाय कोणासही इकडे व्यापार करण्याची परवानगी नव्हती.

डच कंपनी स० १६०२त कायमची स्थापन झाली.

फ्रेंच लोकांच्या अनेक कंपन्या स्थापन झाल्या. पहिली स० १६०४त स्थापन झाली. दुसरी स० १६११त, तिसरी स. १६१५त, चवथी

स. १६४२त व पांचवी स. १६४४त निघाली. त्यांची सहावी व मोठी कंपनी पूर्व व पश्चिम दोहोंकडील व्यापाराकरितां स. १७१९त निघाली. तिचें नांव कंपनी आफ् धि इंडीझ असें होतें. ह्या कंपनीचा इजारा स. १७३९ पर्यंत चालला. स. १७९०त हा इजारा फ्रेंच सरकारानें कायमचा बुडवून सर्वांस व्यापाराची मोकळीक दिली.

डेनमार्कची पहिली कंपनी स. १६१२ त व दुसरी स. १६७०त स्थापन झाली.

स्कॉटलंडांत स. १६१७ स्कॉटिश ईस्ट इंडिया कंपनी म्हणून सर जेम्स कनिंग्हॅम ह्यानें स्थापन केली. स. १६९५त राजा तिसरा वुल्यम ह्यानें आफ्रिका व इंडीझ येथें व्यापार करणाऱ्या दुसऱ्या एका स्कॉट कंपनीस बावीस वर्षांची सनद दिली. पण ती कंपनी बुडाली.

ऑस्ट्रियाच्या बादशहानें ' ऑस्टेंड कंपनी ' नांवाची एक कंपनी स्थापणारांस १७२३ त परवानगी दिली. ही कंपनी स. १७८४त बुडाली.

स्पेनच्या लोकांनीं स. १७३३त एक कंपनी स्थापिली. ती स. १८०८ त बुडाली.

प्रश्यन लोकांनीं स. १७५०त आशियाटिक कंपनी स्थापिली; ती स. १८०३त बुडाली. बंगाल कंपनी म्हणून दुसरी एक कंपनी त्यांनीं स्थापिली होती, तीही लगेच बुडाली ( स. १७५५–५६ ).

अशा प्रकारें इकडच्या व्यापाराकरितां अनेक कंपन्या युरोपांत स्थापन होऊन मोडल्या. एक इंग्रजांची ई० इं० कंपनी स० १६००त स्थापन झाली, ती मात्र अखेरपर्यंत टिकाव धरून राहिली, व तिनेंच हिंदुस्थानचें राज्य कमावलें.

२. **पहिल्या पृथक् सफरी.—**( स. १६००–१६१२ ). कंपनीच्या व्यवहारांची पद्धत ध्यानांत घेतली, म्हणजे तिच्या हकीगतीचे

कित्येक तुटक भाग पडतात. पहिला भाग स. १६०० पासून १६१२ पावेतोंचा. ह्या काळांत निरनिराळ्या सफरी करण्यांत येत असत. प्रत्येक सफरीचा हिशेब निराळा ठेवावयाचा असा निर्बंध ह्या काळांत होता. पण जेव्हांच्या तेव्हां हिशेब पुरा होणें अशक्य पडूं लागलें. दोन भिन्न सफरींतले लोक एकाच वेळीं हिंदुस्थान वगैरे ठिकाणीं येऊन चढाओढीनें व्यापार करूं लागल्यामुळें चुरस वाढून एकमेकांचें नुकसान होऊं लागलें; तेव्हां ही पद्धत बंद करणें भाग पडलें. दुसरा भाग समाइक व्यापाराचा, म्हणजे जॉइंट स्टॉक पद्धतीचा, स. १६१२ पासून १६६१ पर्यंत. ह्याचा अर्थ असा, कीं प्रत्येक सफरीचा किंवा अनेक सफरींचा काल पुष्कळ वर्षेंपावेतों चालू ठेवून, त्यांचा हिशेब एकत्र ठेवावयाचा व पहिल्या निरनिराळ्या सफरींतले दोष नाहींसे करावयाचे. असा प्रयत्न ह्या पन्नास वर्षांत चालू होता. पण तो प्रयत्न सफल झाला नाहीं. कितीही वर्षें काळ वाढविला, तरी कोणतीही सफर पुरी झाली असें न होतां घोटाळा राहेच. म्हणून एक जॉइंट स्टॉक पुरा करून दुसरा सुरू करावयाचा, ही कल्पना पुढें टाकून द्यावी लागली; व सरते शेवटीं कंपनीच्या भांडवलाचे शेअर्स किंवा भाग करून त्यांची खरेदीविक्री करावयाची, अशी पद्धत चालू झाली, तीच अखेरपर्यंत कायम होती.

पहिल्या सफरींतील जहाजांस इंग्लंडचा किनारा सोडण्यास दोन महिने लागले. ह्या सफरींत चार जहाजें असून त्या सर्वांवर मिळून ४८० लोक होते. एक जहाज ६०० टनांचें व बाकीचीं २९०पासून ३०० टनांचीं होतीं. त्यांजवर विक्रीचा माल सात लाख रुपयांचा असून शिवाय तीन लाख पावेतों चांदी होती. कापड, कथील, शिसें, कांच, सुऱ्या, शस्त्रें वगैरे पदार्थ विक्रीच्या मालांत होते. वाटेंत आफ्रिकेच्या किनाऱ्यावर ह्या सफरींतले १०५ लोक आजारानें मरण पावले.

जून ता. ९ स. १६०२ रोजीं कॅप्टिन लँकॅस्टर सुमात्राची राजधानी अचीन येथें आला. तेथील राजाला राणीचें पत्र व नजराणे वगैरे देऊन, त्यानें त्याजशीं व्यापाराचा तह केला. तरी पण त्याला माल मिळेना. पोर्तुगीझ, डच वगैरे लोकांचे व्यापारी सर्व माल दडपून बसले होते. शिवाय त्या वर्षी मिरीं पिकलें नव्हतें, म्हणून पोर्तुगीझ लोकांचें एक ९०० टनांचें भरलेलें जहाज त्यांनीं लुटलें. पुढें जावा बेटांत बँटमच्या राजाशीं स्नेह करून तेथें आपले कांहीं व्यापारी ठेवून दिले, व लँकॅस्टर सेप्टेंबर स. १६०३ त परत इंग्लंडास येऊन पोंचला. तेव्हां एलिझाबेथ राणी मृत्यु पावल्याची खबर त्यास कळली, व राष्ट्राचा मोठा पाठिंबा गेला असें सर्वांस वाटलें. लँकॅस्टर ह्यास नाइटचा किताब मिळाला; व तो कंपनीचा एक डायरेक्टर झाला. पुढें स. १६१८त तो मरण पावला तोंपर्यंत त्यानें कंपनीची नोकरी उत्तम बजाविली.

मिरीं, लवंगा, दालचिनी व गोंद मिळून एकंदर दहा लाख पौंड माल लँकॅस्टरनें आणिलेला पाहून कंपनीच्या लोकांस फार आनंद झाला. त्यांनीं सहा मजूर लावून सगळीं गलबतें खालीं केलीं. त्यांनीं खिशांतून माल चोरूं नये म्हणून त्या सहा मजुरांस खिसे नसलेले खादीचे कपडे करून दिलेले होते. इतकी कडक व्यवस्था ह्या मसाल्यांबद्दल ठेवलेली होती. बँटम येथें मिऱ्याचा भाव शेरीं चार आणे होता; व इंग्लंडांत त्याचा भाव नेहमीं सुमारें सवा रुपया शेर असे, परंतु स. १५९९त तो ३।४ रुपयेपर्यंत चढला होता. अशा प्रकारें ह्या मसाल्याच्या व्यापारांत अतोनात फायदा होता. स. १६०६त आंबोयना बेटांत ३० हजार रुपयांस घेतलेल्या लवंगाचें उत्पन्न इंग्लंडांत स. १६०८त तीन लक्ष साठ हजार रुपये झालें. पण असा फायदा नेहमींच होत असे असें नाहीं. स. १६०३त इंग्लंडांत प्लेग होता. एका वर्षांत लंडन शहरांत

३८१३८ लोक प्लेगनें मेले असें कंपनीच्या हकीगतींत लिहिलेलें आहे. प्लेग गेल्यावर माल विकण्यास अडचण पडूं लागली; तेव्हां वर्गणीदारांनीं पैशाबद्दल मालच घेतला. येणेंप्रमाणें स. १६०९ पर्यंत पहिल्या सफरींचे हिशेब संपले नाहींत. हिशेब पुरा झाला तेव्हां दोन सफरींत मिळून शेंकडा ९५ फायदा झाला असें कळून आलें. तथापि हा फायदा नऊ वर्षांवर विभागला गेल्यामुळें विशेष नाहीं असें दिसून येईल. सारांश पहिली सफर करून आल्यावर कंपनीचे बारा वाजण्याचा प्रसंग आला. लोकांचे पगार वगैरे देण्यास एकदम साडेतीन लाख रुपये पाहिजे होते. प्लेगमध्यें माल विकेना. नेहमीं सहा मोठीं जहाजें व सहा लहान जहाजें व्यापारावर फिरतीं असावीं अशी सनदेंत अट होती, व दरसाल एक सफर होईल असें राणीस वाटत होतें. तेव्हां कंपनीची ढिलाई राणीस आवडली नाहीं. प्रिव्हि कौन्सिलास दम निघेना. म्हणून स. १६०३त कसेंबसें करून दुसरी सफर पाठविणें भाग पडलें. पण त्यासाठीं वर्गणी जमेना. शेवटीं पहिल्या सफरींतील लोकांस तारण देऊन पहिल्याच वर्गणीदारांकडून पुनः भांडवल जमा केलें. पहिलींच जहाजें दुसऱ्या सफरींत गेलीं. ही सफर १६०६च्या मार्चांत निघाली. हींत फक्त अकरा हजार रुपये किंमतीचा माल बाहेर आला. रोख शिल्लकही बरोबर थोडीच होती. पहिल्या व दुसऱ्या सफरींचे हिशेब एक करण्याचा ठराव झाला. कॅप्टिन मिडल्टन हा ह्या सफरीचा मुख्य कामदार होता. त्यानें बँटम येथें दोन जहाजांत मिरीं भरलें व दुसऱ्या दोन जहाजांनीं आंबोयनांत लवंगा भरल्या. यांचे लोकांनीं टर्नेटच्या राजाचा समुद्रांत पाठलाग चालविला असतां, मिडल्टननें येऊन त्यास सोडविलें. त्याबद्दल त्या कृतज्ञ राजानें मिडल्टन यास व्यापाराची सवलत लेखी तहानें करून दिली. ह्याप्रमाणें एतद्देशीय राजांशीं संधान जुळवून लेखी तह करून घेण्याचा उद्योग कंप-

नीनें आरंभापासूनच चालविला होता. त्यांच्या जहाजांवर अशा तहांचे अनेक मसुदे नेहमीं तयार असत. कागदांवर तह करून देण्यास एतद्देशीयांसही त्या वेळीं दिक्कत वाटत नसे. कारण त्या कागदांतील ठरावाची बजावणी मनगटाच्या जोरानेंच व्हावयाची होती. अशा तहांचा उपयोग आरंभीं जरी कंपनीस विशेष झाला नाहीं, तरी ह्याच सबबीवर पुढें इकडील राजांचे प्रदेश काबीज करण्याचा कंपनीनें उद्योग केला हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. पूर्वेकडील लोकांस तोंडच्या शब्दापेक्षां लेखाचें महत्त्व जास्त असे असें नाहीं. मिडल्टन १६०६त इंग्लंडांत परत आला. रस्त्यांत एक जहाज जायां झालें.

इंग्रजलोक हा धंदा भीत भीत चालवीत असतां तिकडे डचलोकांचा सपाटा चालू होता. त्यांचें भांडवल ५४ लाखांवर असून शिवाय मोठमोठीं आरमारें सारखीं राबत होतीं. आपल्या राज्यांतून सोनें, चांदी बाहेर जाणें हें इंग्लंडांत व स्पेन वगैरे पुष्कळ देशांत मोठें नुकसान म्हणून समजलें जात असे. ह्याच संधीस एलिझाबेथ राणी मरण पावली ( १६०३ ), व पहिला जेम्स गादीवर आला. त्यामुळें कंपनीच्या अडचणी ज्यास्तच वाढल्या. मायकेल्बोर्न ( Michelbourne ) म्हणून एक गृहस्थ लॉर्ड ट्रेझरर बर्ले ह्याचा दोस्त असून तो पूर्वीपासूनच हिंदुस्थानच्या व्यापाराचा इजारा मागत होता. पण लंडनच्या व्यापाऱ्यांची मागणी पाहून राणी ह्या एकट्याची गोष्ट ऐकेना. तेव्हां 'मायकेलबोर्न ह्यासच तुम्ही आपल्या सफरीचा प्रमुख करून द्या,' अशा प्रकारचें बोलणें बर्लेनें मंडळीकडे चालविलें. निदान असा मनुष्य सफरीबरोबर गेला तर दरबारास सगळी खबर कळेल; कंपनीच्या हातास विशेष कांहीं किफायत लागल्यास त्यांत दरबारचें हित साधणारा कोणी तरी पाहिजे असा बर्लेनें घाट घातला. ह्याचा परिणाम आपणास हितावह होणार नाहीं हें जाणूनच मंडळीनें बर्लेचें म्हणणें साफ नाकारिलें. ते म्हणाले,

'लोकांचे पैसे आमच्या हातांत आहेत, तर त्यांची व्यवस्था आमच्या मर्जीप्रमाणेंच चालली पाहिजे. ही व्यापाराची गोष्ट आहे. जेणेंकरून फायदा वाढेल तें काम केलें पाहिजे; उगाच यःकश्चित् गोष्टींत तंटा उपस्थित करून तलवार उपसल्यानें काम होत नसतें.' पुढें हा मायकेलबोर्न कंपनीचा एक वर्गणीदारच झाला; पण पहिल्या सफरींत कबूल केलेली वर्गणी त्यानें भरली नाहीं म्हणून कंपनीनें त्याचें नांव पटांतून काढून टाकिलें. एलिझाबेथच्या मृत्यूनंतर त्यानें कंपनीवर सूड उगविण्याची संधि साधिली. सन १६०४त जेम्स राजानें त्याला खंबायतेपासून चीनपर्यंतच्या किनाऱ्यावर, कंपनीचा व्यापार ज्या ठिकाणीं चालत असेल तीं ठिकाणें शिवाय करून, व्यापार करण्याची परवानगी दिली. अशा रीतीनें कंपनीच्या इजाऱ्यास अडथळा आला. याप्रमाणें तो तिकडे गेला. बँटम येथें डच लोकांशीं तो लढला; त्यानें चिनी जहाजें लुटलीं; व अनेक प्रकारें पूर्वेकडील देशांत इंग्रजांच्या नांवास काळिमा आणून तो सन १६०६त परत आला. ह्यामुळें तिकडे कंपनीची कांहींच पत राहिली नाहीं, व स्पेन पोर्तुगालशीं इंग्लंडचा तह झाल्यामुळें त्यांजवर हात मारण्याचीही सोय नव्हती. शिवाय डच लोकांशीं कंपनीची चुरस वाढत चालली होती. तशांत माय्केल्बोर्नच्या हल्लयाबद्दल आंबोयना येथें अखेरीस डच लोकांनीं जबरदस्त सूड घेतला. मायकेलब्रोर्न स. १६११त मरण पावला.

सन १६०७त तिसरी सफर गेली. तिचा मुख्य कॅप्टिन् कीलिंग ( Keeling ) हा होता. ह्या सफरींत आणलेल्या मसाल्याचें उत्पन्न इतकें झालें, कीं शेंकडा २३४ नफा झाला. ह्यामुळेंच कंपनीची थोडी निभावणी लागली. स. १६०८त चवथी सफर गेली. माराकुटीनें दोन जहाजांच्या भरतीची वर्गणी जमली; व तीं दोनही जहाजें दुर्दैवानें समुद्रानें गडप करून टाकिलीं. तेव्हां स. १६०९त पांचव्या सफरींत

एकच जहाज गेलें. कंपनीची स्थिति अशा प्रकारें बरीच खालावली होती, तरी दरबारांत व बड्या मंडळींत व्यापारांतील ह्या किफायती-विषयीं मोठी इच्छा उत्पन्न झाली व राजानेंही त्यांत मन घातलें. त्यानें स. १६०९त ई. इं. कंपनीची सनद फिरून वाढवून दिली. तींत पंधरा वर्षांची मुदत काढून ती कायमची वाढविण्यांत आली; मात्र ह्या व्यापारांत राज्यास फायदा नाहीं असें राजास वाटल्यास, तीन वर्षांची आगाऊ सूचना देऊन कंपनी बंद करण्यांत येईल असें ठरविलें. ह्या नवीन सनदेंत राजानें सर्व मोठमोठ्या लोकांचा समावेश केला होता. अशा रीतीनें स. १६१०त सहावी सफर गेली. तिचा मुख्य सर हेन्री मिडल्टन हा होता. कंपनीनें एक मोठें जहाज स्वतः बांधिलें, त्याचा नामकरणविधि करण्यास राजा स्वतः गेला होता. त्याचें नांव व्यापारवर्धन ( Trades Increase ) असें होतें. दुर्दैवानें हें जहाज बँटम येथें दुष्ट लोकांनीं जाळलें व सर हेन्री मिडल्टनही तेथेंच पुढें स. १६१३त मरण पावला.

ह्या सुमारास डच्च व पोर्तुगीझ हे इंग्रजांचा हेवा करूं लागले. त्यांजशीं टिकाव धरण्याकरितां निरनिराळ्या सफरींची व्यवस्था मोडून जॉइंट्स्टॉक कंपनीची म्हणजे समाइक भांडवलाची व्यवस्था करणें जरूर पडलें. स. १६११त व १२त गेलेल्या सफरी मोटया तयारीच्या असून, पुढें सर्व सफरींची एक व्यवस्था कायम झाली. वर सांगितल्या-प्रमाणें आरंभीं एकंदर नऊ पृथक् सफरी झाल्या. त्यांत एकंदर भांडवल शेचाळीस लक्ष रुपये होतें; व एकंदर गलबतें २६ होतीं. सर्व मिळून फायदा शेंकडा दीडशें पासून अडीचशें पावेतों पडला; म्हणजे मुद्दलावर इतका नफा झाला. ४६ लक्षांपैकीं २१ लक्ष गलबतांच्या व खाण्याच्या खर्चास लागले, बाकीचे व्यापारांत गेले. एवढ्या अवधींत राज्यांतून रोख रक्कम तेरा लक्षांची बाहेर गेली; व सहा लक्षांचा माल गेला. नफ्याचे

आंकडे पाहिले म्हणजे प्रथम आश्चर्य वाटतें; पण त्या वेळच्या अडचणी मनांत आणतां तो विशेष नाहीं. माल खपेनासा झाला म्हणजे एक इंच मेणबत्ती बाजारच्या चौकांत जळत ठेवून लिलांव करण्याचा प्रघात पडला. मेणबत्ती जळायची संपली कीं लिलांव पुरा होत असे. त्या वेळीं लोकांच्या हातांपायां पडून भांडवल जमा करावें लागे. आरंभींच्या सफरी पूर्वेकडील द्वीपसमूहांत झाल्या. त्यांत पोर्तुगालशीं व स्पेनशीं तह झाल्यामुळें, पुष्कळ ठिकाणें वर्ज्य करावीं लागलीं; व डच लोकांशीं इंग्रजांच्यानें टिकाव धरवेना.

वास्तविक त्यांनीं हिंदुस्थानाशींच व्यापार केला पाहिजे होता; पण त्या वेळीं हिंदुस्थानचा व्यापार पूर्वेकडील बेटांसारखा किफायतशीर समजला जात नसे. शिवाय त्याबद्दल मोगल बादशहाची परवानगी पाहिजे होती. पूर्वी मिल्डेन हॉल नांवाचा गृहस्थ बादशहास भेटून परत गेला होता. पुढें स. १६०९त कॅप्टिन हॉकिन्स नांवाचा गृहस्थ बादशहाकडे आला. बादशहानें त्याचा सन्मान उत्तम प्रकारचा करून, कंपनीस सुरत येथें व्यापार करण्याची परवानगी दिली; व हॉकिन्स ह्याचें लग्न करून त्यास कांहीं तनखा करून दिला. ही त्याची बायको क्रिस्ती होती. तिच्याशीं नीटपणें संसार करून राहण्याचा त्याचा विचार होता. पण कंपनीची कामगिरी अजून झाली नव्हती. दरबारांत पोर्तुगीझ लोकांचें वजन भारी होतें. शेवटीं त्याचे सर्व प्रयत्न निष्फळ होऊन तो आपल्या बायकोसह कसाबसा स. १६१२च्या आरंभीं खंबायतेहून विलायतेस गेला. बादशहाच्या एकंदर संपत्तीची आग्रा येथें लेखी यादी तयार करून त्यानें विलायतेस नेली. हॉकिन्स पुढें मरण पावल्यावर त्याच्या बायकोनें आंबोयनाचा गव्हर्नर टॉवरसन ह्याजशीं लग्न केलें. पूर्वेकडील बेटांत व्यापाराचा जम बसेना म्हणून सुरतेस वखारी घालण्याचा प्रयत्न कंपनीनें केला, तोही पोर्तुगीझ लोकांनीं तडीस जाऊं

दिला नाहीं. तसेंच सहाव्या सफरींत सर हेन्री मिडल्टन ह्यानें तांबड्या समुद्रांत शिरून व्यापार करण्याचा प्रयत्न केला तो सुद्धां सफल झाला नाहीं. पुढें तो सुरत येथें येत असतां, पोर्तुगीझांनीं बंदरांत येण्याचा त्याचा रस्ताच अडवून धरिला.

पश्चिमकिनाऱ्यावर सुरत व खंबायत येथें आपल्या व्यापाराचा जम चांगला बसेल असें कंपनीच्या व्यापाऱ्यांस वाटलें. स. १६०९त अँटनी मार्लोचें सुरतेहून कंपनीस पत्र गेलें, त्यांतील उताराः—'आमचें कापड व शिसें येथें बरें खपेल, लोखंड एडन येथें बरें जाईल; नीळ, कस्तुरी, कालिको कपडा, मिरीं वगैरे जिन्नस आपणांस मुबलक मिळूं शकतील.' तरी स. १६११त कारोमंडल किनाऱ्यावर कॅप्टिन हिपोन ह्यानें मच्छलिपट्टणनजीक पेट्टपुळि येथें एक वखार घातली. इकडे एतद्देशीय लोकांशीं गुप्त बेत करून पोर्तुगीझ लोक इंग्रजांचे खून करण्याचाही प्रयत्न करीत, व कोणत्याही देशांत, मग तेथें त्यांचा व्यापार असो वा नसो, ते इंग्रजांचा शिरकाव होऊं देत नसत. राजा जेम्स त्यांजशीं तह करून बसला होता, इतकेंच नव्हे, तर स्पेनच्या राजाची मुलगी आपल्या मुलास करावी, अशी त्याची खटपट चालू होती. तथापि इंग्रज कंपनीचा पोर्तुगीझांशीं हिंदुस्थानांत झगडा सुरू होऊन त्यांत अखेरीस कंपनीचीच सरशी झाली.

**३. पोर्तुगीझांशीं पहिला झगडा (स. १६१२).**—स.१६११त इंग्रज जहाजांस पोर्तुगीझ आरमारानें सुरतेस येऊं दिलें नाहीं, तेव्हां समुद्रांतच उभे राहून झाला तेवढा सौदा त्यांनीं केला. स. १६१२त रेड-ड्रगून नांवाचें व दुसरें एक जहाज घेऊन इंग्रज कॅप्टिन बेस्ट हा सुरतचें बंदर सुवाळी येथें आला. तेथें त्यांस पकडण्याकरितां नोव्हेंबर ता. २९ रोजीं पोर्तुगीझांचीं चार जहाजें व १२० तोफांचें आरमार आलें. तें थोडें अव्यवस्थित होतें. त्याचा फायदा घेऊन कॅप्टिन बेस्टनें त्यांजवर

हल्ला केला. दोन तीन दिवस लढाई होऊन १००।१२९ पोर्तुगीझ लोक पडले. पुढें ही लढाई सुमारें महिनाभर चालू होती. इंग्रज कॅप्टिन मोठा हिकमती होता. त्यानें पोर्तुगीझांच्या मोठ्या आरमाराचा विध्वंस करून टाकिला. कॅप्टिन बेस्ट हा पुढें मोठ्या योग्यतेस चढला व स. १६३८पर्यंत त्यानें कंपनीची नोकरी उत्कृष्ट बजावली. ही पोर्तुगीझांशीं इंग्रजांची पहिली लढाई होय. ही ई. इं. कं. च्या फारच उपयोगीं पडली. महिनाभर चाललेला हा संग्राम मोगल अधिकारी व इतर लोक मोठया कौतुकानें पाहत होते. पोर्तुगीझांची जमिनीवर नाचक्की पूर्वीच झाली होती, व समुद्रावर त्यांची अशी पिछेहाट झालेली पाहून त्यांचा नकशा उतरला, व शंभर वर्षांची त्यांची कमाई क्षणार्धांत लयास गेली. कॅप्टिन केरिज बादशहाचें फर्मान मिळविण्याकरितां आग्र्यास गेला होता, त्यास, सुरतेच्या लढाईची बातमी ऐकून जहांगीर बादशहानें इंग्रजांशीं व्यापारी तह करण्याचें फर्मान एकदम दिलें. तसेंच कॅप्टिन बेस्ट याजबरोबर सुरतेच्या मोगल अधिकाऱ्यांनींही व्यापाराचा ठराव केला; व सुरत, खंबायत वगैरे ठिकाणीं शेंकडा साडेतीन टक्के जकातीनें वखारी घालून व्यापार करण्याची परवानगी दिली. येणेंप्रमाणें इंग्रजांच्या व्यापारास कायद्याचें साह्य मिळालें; व इंग्रजांच्या पहिल्या पावलास हिंदुस्थानच्या पवित्र भूमीवर थारा मिळाला. कोणताही व्यवहार सरशेवटीं मनगटाचे जोरावर अवलंबून राहतो, नुसत्या तोंड वेंगाडण्यानें कोणी भीक घालीत नाहीं, हा जगाचा अबाधित न्याय इकडे इंग्रजांच्याही प्रथमच प्रत्ययास आला. सुरतेस वखार घालून व पृथक् सफरी मोडून समाइक भांडवलाची पद्धत स्वीकारण्यांत आली, ह्या दोन कारणांनीं कंपनीच्या पहिल्या उद्देशांत रूपांतर झालें; व तिच्या इतिहासांतील दुसऱ्या कालखंडास सुरुवात झाली. हॉकिन्सच्या नंतर अनेक इंग्रज व्यापारी मोगल दरबारीं

गेले होते. बरोबर बादशहास कांहीं तरी नजराणा मात्र त्यांस घेऊन जावें लागे. हातमोजे, पाकिटें, चित्रें, सुऱ्या, वाजणारीं घड्याळें, रेशमी मोजे ( बायकांचे ) अशा कोणत्याही चिजा नजर केल्या तरी चालत.

इकडे पोर्तुगीझ लोकांशीं उघड उघड युद्ध सुरू होतें. कॅप्टिन् डॉउनटन (Downton) हा एक धाडशी गृहस्थ सन १६१४त कंपनीच्या एका सफरीचा मुख्य होऊन त्याच वर्षीं इकडे आला. त्या वेळीं इंग्रजांची खोड मोडण्याकरितां गोवा येथून एक मोठें पोर्तुगीझ आरमार तयार होऊन आलें. गोव्याचा व्हाइसरॉय त्या आरमाराचा मुख्य होता. त्याजकडे २६०० युरोपियन लढाऊ लोक व २३४ तोफा होत्या. डॉउनूटन्‌जवळ ४०० लोक व ८० तोफा होत्या. सुरत येथें तापीच्या मुखांत आंत इंग्रज व बाहेर पोर्तुगीझ असे सज्ज होऊन आले. ह्या लढाईवर इंग्रजांचा भावी अभ्युदय सर्वस्वी अवलंबून होता. डॉउ- नूटन एकसारखा परमेश्वराचा धांवा करीत होता. दोघां शत्रूंची एक महिनाभर जंगी झटापट होऊन पोर्तुगीझ आरमार पुष्कळ नुकसान पावून निघून गेलें. कॅप्टिन् डॉउनूटनूचा सुरतच्या मोगल सुभेदारानें मोठा गौरव केला. पुढें डॉउनूटन् बॅन्टम येथें गेला असतां तिकडेच मरण पावला. वरील लढाईनें मलबार किनाऱ्यावर इंग्रजांची सरशी झाली. १६१६त कॅप्टिन् कीलिंग यानें उघडपणें कालिकोट येथें जाऊन सामुरीशीं तह केला. सन १६२२त इंग्रजांनीं पोर्तुगीझ लोकांचें इराणी अखातांतील मोठें बेट ऑर्मझ काबीज केलें. ह्या योगानें इराणी अखा- तांतून पोर्तुगालचा पाय निघाला. पोर्तुगीझ लोकांनीं इंग्रजांचें पश्चिम किनाऱ्यावरील वर्चस्व सन १६४२त थोडेंसें कबूल केलें; पुढें १६५४त क्रामूवेल व पोर्तुगालचा राजा चवथा जॉन यांजमध्यें तह होऊन त्यांत तें पूर्णपणें स्थापित झालें.

स. १६१२त पृथक् भांडवलाची पद्धत मोडून समाइक भांडवलाची पद्धत सुरू झाली. सुरत येथें कॅप्टिन बेस्ट ह्यास यश आल्याबरोबर इंग्लंडांत कंपनीच्या चालकांस मोठा धीर आला. त्यांनीं एकदम बेचाळीस लक्ष रुपये भांडवल जमविलें. तेवढ्यांत स. १६१३पासून १६१६पावेतों चार सफरी झाल्या. दरसाल सुमारें सात जहाजें बाहेर गेलीं; व सरासरीन शेंकडा ८७½ फायदा झाला. पोर्तुगीझ व डच यांनीं त्रास दिला नसता तर फायदा ज्यास्त झाला असता. एकदां नव्वद हजार रुपयांस घेतलेल्या मालाची इंग्लंडांत आठ लाख रुपये किंमत आली. ह्याप्रमाणें पहिलें समाइक भांडवल चार वर्षांचें होतें. पुढ दुसरें समाइक भांडवल उभारलें त्यास १,६२,००,४०० रुपये एकदम गोळा झाले. हें भांडवल ९६४ गृहस्थांनीं उभारलें होतें. त्यांत राष्ट्रांतील सर्व मोठमोठ्या लोकांचा समावेश होता. म्हणजे ह्या वेळेपासून ई० इं० कंपनीच्या ह्या व्यापारांत एकंदर इंग्रज राष्ट सामील झालें असें म्हणण्यास हरकत नाहीं स. १६२१त कंपनीनें आपल्या वास वर्षांच्या कारकिर्दीची करामत पार्लमेंटपुढें मांडिली त्यांत त्यांनीं खालील हकाकत दिली आहे.

| पाठविलेलीं गलबतें. | पैकीं सुरक्षित परत. | बुडालीं. | खराब झालीं. | शत्रूच्या हातीं गेलीं. | हिंदुस्थानांत माल भरात आहेत. | एकूण. |
|---|---|---|---|---|---|---|
| ८६ | ३६ | ९ | ५ | ११ | २५ | ८६ |

| रोख रकम पाठविती आली असती. | रोख रकम पाठविली. | किंमतीचा माल पाठविला. | एकूण पाठविलें. | पैकीं ३६ गलबतांतीं आणलेल्या मालाच्या खरेदीची किंमत. | ह्या मालाच्या विक्रीचें इंग्लंडांत उत्पन्न. |
|---|---|---|---|---|---|
| ९१ लक्ष रु. | ६१,३६,८१० | ३१,९२,११० | ९३,२८,९२० | ३७,५२,८८० | २,००,४६,००० |

स. १६७०त सर जोशिया चाइल्ड ह्यानें पार्लमेंटास असें जाहीर केलें, कीं प्रत्येकावर १० पासून १०० लढाऊ लोक, व सुमारें ३० तोफा, अशा मासल्याचीं तीन मजल्याचीं २५।३० लढाऊ जहाजें एकट्या कंपनीनेंच ठेविलेलीं असल्यामुळें, राष्ट्राच्या आरमारास मोठीच बळकटी आली आहे.

**४. चीन जपानकडील प्रयत्न.**——आरंभीं कंपनीच्या व्यापाराचे प्रयत्न चीन व जपान इत्यादि देशांतही बरेच झाले. वुल्यम अॅडम्स नांवाचा केंटकाउंटींत राहणारा एक इंग्रज गृहस्थ सरकारी आरमारांत नोकर होता (जन्म स. १५६२). स. १५९८त डच लोकांच्या सफरींत पायलट म्हणून नोकरी पतकरून तो इकडे आला. इकडे येत असतां सफरींत त्याचें जहाज इतरांपासून अलग होऊन, त्याजवरील बहुतेक लोक आजारानें वगैरे मेले, व तो फिरांडो येथें जपानच्या किनाऱ्यास लागला. जपानांत त्या वेळीं पोर्तुगीझ व जेझुइट लोक होते; त्यांनीं त्यास मारण्याचा बेत केला. पण नशिबानें तो वांचला. जपानच्या बादशहापुढें त्याची चौकशी झाली. पुढें जहाजें बांधण्याच्या कामांत बादशहानें त्याची हुशारी पाहून त्यास नोकरीस ठेविलें. तेथें तो वाढत वाढत महत्त्वास चढला. त्यास बादशहानें इनाम जमीन देऊन हाताखालीं ८०।९० कामकरी मजूर दिले. स. १६०९ त काहीं डच जहाजें फिरांडोच्या बंदरांत आलीं; त्यांस अॅडम्सच्या शिफारसीनें जपानांत व्यापार करण्याची परवानगी मिळाली. तेव्हां डच लोकांपासूनच त्यास कळलें, कीं इंग्रजमंडळीसुद्धां व्यापाराकरितां इकडे अनेक ठिकाणीं आली आहेत. हें ऐकून त्यानें बँटम येथील आपल्या जातभाईस मोठ्या काकुळतीचें पत्र पाठविलें. त्यांत जपानांत व्यापार कसा चालेल, काय काय माल खपेल वगैरेची माहिती देऊन, शिवाय जपानच्या इतकी उत्कृष्ट राज्यव्यवस्था पृथ्वीवर दुसरे कोठें नाहीं, येथें व्यापार

सुरू करा, अशी विनंति केली. हें पत्र येण्यापूर्वीच अडॅम्सची हकीगत डच लोकांमार्फत इंग्लंडांत कळली होती. त्यावरून कंपनीचे व्यापारी जपानशीं संबंध जोडण्यास उत्सुक झाले होते. तदनुरूप सातव्या सफरींतील एक इसम कॅप्टिन सारीस स. १६१३त एक जहाज घेऊन फिरांडो येथें आला. त्याची व अडॅम्सची भेट झाली; व दोघांनीं मिळून बादशहाचें मन वळवून फिरांडो येथें कंपनीनें व्यापार करण्याची परवानगी मिळविली. पुढें दरसाल हजार रुपये वेतन घेण्याच्या करारानें अडॅम्सनें कंपनीची नोकरी पत्करिली. त्यानें जपान सोडून जाऊं नये म्हणून बादशहानें पुष्कळ खटपट केली. ' बायकामुलांस भेटून येतों,' असें त्यानें सांगितलें, तेव्हां बादशहानें त्याचें जपानांतच लग्न करून दिलें. तेथें त्यास मुलेंही झालीं. पुढें दोन तीन वर्षें जपानांत राहूनच तो कंपनीची नोकरी करीत होता. तेथेंच तो स. १६२०त मरण पावला. यद्दो शहरांतील एका रस्त्यास ह्या अडॅम्सच्या नांवावरून 'पायलट स्ट्रीट' असें नांव पडलें आहे. पण जपानांत कंपनीचा व्यापार नीट चालला नाहीं. पोर्तुगीझ व डच ह्यांनीं इंग्रजांस पुष्कळ त्रास दिला. शिवाय किनाऱ्यापासून आंतल्या प्रदेशांत जाऊन व्यापारवृद्धि करीत असतां, जपानी लोकांनीं सर्व युरोपियन लोक कापून काढिले. कोचीन चायनाच्या राज्यांत डच लोकांनीं खोटीं नाणीं चालवून माल खरेदी करून लोकांस फसविलें, त्यावरून तेथच्या राजानें जपानी लोकांमार्फत सर्वांचीच वरप्रमाणें कत्तल करविली असें म्हणतात. स. १६१६त जपानचा बादशहा मरण पावला, व नवीन गादीवर आलेल्या बादशहानें इंग्रजांस व्यापाराच्या सवलती दिल्या नाहींत. तेव्हां कंपनीचे सुमारें चार लक्ष रुपये फुकट जाऊन, जपानचा व्यापार बंद करावा लागला ( स. १६२३ ).

स. १६१६त चीनशीं व्यापार करण्याची कंपनीनें खटपट केली. एलिझाबेथनें स. १५९६त सर रॉबर्ट डड्ले याजबरोबर चीनच्या बादशहास पत्रें पाठविलीं होतीं, पण त्यांपैकीं कोणीच इसम परत आला नाहीं. पुढें स. १६१४ त कॉक्स नांवाच्या इसमाबरोबर पुनः जेम्स राजानें चीनच्या बादशहास पत्रें पाठविलीं. तेव्हां चिनांत थोडें-बहुत दळणवळण सुरू झालें.

डच लोक जपानांत अडीचशें वर्षे व्यापाराची खटपट करीत होते. त्यांनीं ह्या कामीं नाना तऱ्हा करून पाहिल्या. पण त्यांस कांहींच यश आलें नाहीं. आपल्या देशांतील सोनेंचांदी बाहेर जाऊं नये म्हणून जपानी बादशहानें सक्त हुकूम सोडिले, तेव्हां परदेशचा माल देशांत येण्याची बंदी झाली. सन १६३५पासून ३८पर्यंतच्या चार वर्षांत पोर्तुगीझ लोकांनीं दोन कोटि तीस लक्ष रुपयांची सोनें-चांदी जपानांतून बाहेर नेली. तसेंच स. १६११पासून १६४० पावेतों डच लोकांनीं जपानांतून दोन अब्ज शहायशीं कोटि रुपये बाहेर नेले, असा लेखी उल्लेख सांपडतो. ( Rundall's Memories of Japan.) अशा प्रकारें पैसा बाहेर जाऊं नये म्हणूनच त्याबद्दल जपानच्या बादशहानें सक्तीचे उपाय योजिले.

**८. सर टॉमस रोची नेमणूक व प्रयाण.**—समाइक भांडवलाची पद्धत स. १६१३त कंपनीनें सुरू केली. पहिल्या सफरीचा मुख्य कॅप्टिन डाउंटन ( Downton ) म्हणून होता हें वर सांगितलेंच आहे. त्यास इंग्लंडच्या राजाची अशी ताकीद होती, कीं विनाकारण को-णाशीं कलह उकरून काढूं नये, पण आपल्या वाटेस कोणी गेल्यास, सूड घेण्यासही कमी करूं नये, व लूट मिळेल ती सरकारांत जमा करावी. स. १६१४ च्या ऑक्टोबरांत डाउंटन सुरतेस आला, तेव्हां तेथें ऑल्ड्वर्थ हा कंपनीचा मुख्य व्यापारी होता. ऑल्ड्वर्थनें बडोदें,

अहंमदाबाद वगैरे आजूबाजूच्या ठिकाणीं प्रवास करून इकडील व्यापाराची माहिती पुष्कळ मिळविली होती. त्यावरून त्याचें असें मत झालें होतें, कीं कापसाचीं हरतऱ्हेचीं वस्त्रें ह्या प्रांतांत तयार होतात तीं फार स्वस्थ असून त्यांचा खप युरोपांत चांगला होईल; अहंमदाबादेस नीळ फार स्वस्थ मिळे, तिचाही व्यापार चांगला चालेल. पण अशा व्यापारास लाख दीडलाख रुपयांचें भांडवल हातांत खेळतें पाहिजे; व आपल्या व्यापाराच्या संरक्षणार्थ मोगल दरबारीं आपला एक कायमचा वकील असला पाहिजे. ऑल्ड्वर्थच्या ह्या उद्योगाचा विलायतेंत चांगलाच परिणाम झाला.

आग्रा येथील मोगल दरबारीं पोर्तुगीझ लोकांचें वजन विशेष असल्यामुळें ईस्ट इंडिया कंपनीचा व्यापार नीट चालेना. म्हणून प्रत्यक्ष इंग्लंडच्या राजाकडून एखादा विद्वान व वजनदार वकील मोगल बादशहाकडे गेल्याशिवाय व्यापाराचा जम बसणार नाहीं; म्हणून अशा प्रकारचा वकील इकडे पाठविण्याची वाटाघाट बरेच दिवस चालू होती. ऑल्ड्वर्थच्या वरील पत्राप्रमाणेंच दुसऱ्या कित्येक हुशार इंग्रज व्यापाऱ्यांचींही तशींच पत्रें विलायतेस गेलीं होतीं. त्याप्रमाणें सन १६१४ च्या सेप्टेंबर महिन्यांत गव्हर्नर सर टॉमस् स्मिथ ह्यानें असा वकील हिंदुस्थानास पाठविण्याची सूचना कंपनीपुढें आणिली; त्याचीं पुष्कळ वाटाघाट होऊन शेवटीं एक वजनदार गृहस्थ वकील म्हणून पाठविण्याचें ठरलें. पुढें कोण गृहस्थ पाठवावा ह्याची वाटाघाट चालू होऊन, अखेरीस सर टॉमस रो ह्यास ह्या कामगिरीसाठीं विनंति करण्यांत आली.

सर टॉमस रो ह्या कामास अगदीं योग्य होता. तो तरुण, विद्वान, तरतरीत, उद्योगी, देखणा व भव्य असून, त्याची शहाणपणाची व रुआबदार वागणूक लोकांच्या परिचयाची होती. त्याचा जन्म चांगल्या कुळांत झाला होता. त्याचे वाडवडील संभावित व सधन होते. त्याचा

आजा लंडनचा लॉर्ड मेयर होता. टॉमस रोचा जन्म स. १५८०।८१ च्या सुमारास झाला. त्यास लहानपणीं चांगलें शिक्षण दिलेलें होतें. पुढें त्यास एलिझाबेथच्या मानकरी मंडळींत नोकरी मिळाली. जेम्स राजानें त्यास नाइटची पदवी दिल्यावरून त्यास सर म्हणूं लागले. जेम्सचा मुलगा राजपुत्र हेन्री, व मुलगी एलिझाबेथ यांशीं त्याचा चांगला स्नेह होता. ह्या राजपुत्राच्या साह्यानें त्यानें दक्षिण अमेरिकेची सफर करून तत्कालीन साहसाचा अनुभव संपादन केला. ह्या सफरींत त्यानें आमेझोन नदींतून पुष्कळ वरपर्यंत प्रवास केला. हा राजपुत्र हेन्री स. १६१२त मरण पावल्यामुळें रोचा मोठा आश्रय तुटला. स. १६१४त त्याचा पार्लमेंटांत प्रवेश झाला. जेम्स राजाच्या हेकडपणामुळें त्यानें आपल्या सल्लागारांत रोचा उपयोग करून घेतला नाहीं; व राजास खूष ठेवून राष्ट्राच्या उपयोगी पडणें अशक्य असल्यामुळें, परराष्ट्राच्या वकिलीशिवाय दुसरी नोकरी त्यास मिळणें शक्य नव्हतें.

अशा प्रकारची नोकरी केल्याशिवाय त्यास गत्यंतर नव्हतें. सन १६१४च्या सुमारास तो पैशाकडून बराच अडचणींत आला होता. त्यानें नुकतेंच गुप्तपणें लग्न केलें होतें, म्हणून पैशाची अडचण ज्यास्त वाढली होती. अर्थात् ईस्ट इंडिया कंपनीची वरील नोकरी येतांच, पडत्या फळाची आज्ञा म्हणून तें काम त्यानें एकदम स्वीकारिलें. वर्षाचा पगार ६०० शें पौंड ठरून, त्यापैकीं निम्मे रक्कम त्यानें कंपनीच्या व्यापारांत भांडवल म्हणून घालावी; पांचशें मार्क (म्ह० ३३३ पौंड) त्यास कपड्यालत्याकरितां द्यावे; भोजनपात्राकरितां शंभर पौंड कर्जाऊ द्यावे; त्याच्याबरोबर एक पाद्री व एक डॉक्टर कंपनीच्या खर्चानें दरसाल ५० व २४ पौंड पगाराचे असावे; शिवाय नोकरचाकर व त्यांचा कपडालत्ता ह्यांबद्दल दरसाल १३० पौंड ज्यास्त द्यावे; तसेंच भोजनाचा व इतर खर्च मोगल दरबारांतून न मिळाल्यास तो

कंपनीनें द्यावा. असा ठराव झाला. रोनें खासगी व्यापार करूं नये असें मात्र ठरलें होत ह्या ठरावास राजाची संमति सहज मिळाली. राजानें एक मोगल बादशहाच्या नांवचें पत्र लिहून त्याजपाशीं दिलें; व त्यास कामाची सर्व व्यवस्था सांगितली. 'जेम्स राजा मोठा भाग्यशाली आहे; त्याची दर्यावरील सत्ता प्रबल आहे; त्यामुळें सर्व राष्ट्रांस त्याचा धाक वाटतो; त्याची रयत त्याची आज्ञा मोठ्या तत्परतेनें पाळते, इतकेंच नाहीं, तर तो त्यांस फार आवडतो.' इत्यादि गोष्टी मोगल बादशहाच्या मनावर बिंबविण्याचा रोन प्रयत्न करावा, अशी त्यास राजाची विशेष सांगी होती.

ह्याप्रमाणें सर्व सिद्धता झाल्यावर, ता. २ फेब्रुवारी, स. १६१५ रोजीं सर टॉमस रो पंधरा नोकर बरोबर घेऊन लायन नांवाच्या गलबतांत बसून इंग्लंडाहून निघाला. वारा प्रतिकूळ असल्यामुळें इंग्लंडचा किनारा दिसेनासा होण्यास एक महिना लागला; व सुरतेस पोंचण्यास सहा महिने लागले. हा काळ त्यास फारच त्रासदायक वाटला. गलबतावरील अधिकाऱ्याचें व त्याचें चांगलें पटलें नाहीं. रस्त्यांत केप ऑफ गुड होप, कोमोरो बेटें व सोकोत्रा बेटें येथें जहाजांनीं वरवा केला. केप येथें त्यास कंपनीचें परत येणारें एक जहाज भेटलें व हिंदुस्थानांतील बरीच हकीगत कळली. ता० १८ सप्टेंबर, स. १६१५ रोजीं रो सुरतेस सुवाळीच्या धक्क्यावर उतरला. त्या वेळेस एड्वर्ड्स् नांवाचा कंपनीचा एक एजंट आग्रा येथें मोगल दरबारीं होता. गुजराथचा सुभा शहाजादा खुर्रम् (पुढें शहाजहान) ह्याजकडे असून, त्याच्या तर्फेनें झुल्फिकारखान हा तेथचा कारभार पाहत होता. मुकर्रबखान नांवाचा पूर्वीचा सुभेदार दिल्लीस प्रमुख असून, त्याच्या मार्फतच ह्या परराष्ट्रांशीं मोगलांच्या घडामोडी चालू होत्या. बादशहाची पोर्तुगीझ लोकांशीं नुकतीच समुद्रा-

वर एक लहानशी चकमक झडून उभयतांचा तह ठरत होता; व शहाजादा व इतर सरदार हे सर्व पोर्तुगीझांच्याच पक्षांत होते.

अशा स्थितींत रो यास मुत्सद्दीपणाचें कांहीं थोडें काम करावयाचें नव्हतें. हिंदुस्थानच्या जमिनीवर पाय ठेवतांच त्यास नाना प्रकारच्या अडचणी येऊं लागल्या. प्रथमपासूनच आपला बोज चांगला राखून घेण्याचा त्यानें निश्चय केला. कारण पूर्वींचे कंपनीचे अधिकारी मोगलांच्या ताब्यांतील हलक्या नोकरांची व शिपाई हमाल वगैरेंची मनधरणी करून आपलें काम साधीत होते. हा प्रकार रो यास पसंत वाटला नाहीं. त्यानें लांच किंवा नजराणा देऊन सुरतच्या अधिकाऱ्यांची मर्जी संपादण्याची खटपट केली नाहीं. तेव्हां त्या लालचावलेल्या अधिकाऱ्यांची मर्जी खपा होऊन ते रो यास त्रास देऊं लागले. पण तो धूर्त मुत्सद्दी डगमगला नाहीं, व कोणताही अपमान सहन न करितां त्यानें आपला उद्देश सिद्धीस नेला. ह्यांत सुरतेच्या अधिकाऱ्यापेक्षां इंग्रज वकिलाचाच शहाणपणा दिसून येतो. त्याची परवा न करितां रो जेव्हां थेट आग्र्यास जाण्यास निघाला, तेव्हां त्या अधिकाऱ्यानें रोची उलट खुशामतच सुरू केली.

एवढा वकील इंग्लंडाहून आल्याबरोबर कंपनीच्या परिस्थितींत बरेंच अंतर पडलें. मोगल दरबार व पोर्तुगीझ यांजमध्यें जो तह ठरत होता, त्यांत मोगल हद्दींत इंग्रजांचें वास्तव्य होऊं देऊं नये असें एक कलम होतें; व तशा प्रकारचे हुकूम सुरतेस आलेच होते. म्हणून सुरतेस वेळ न घालवितां रो त्वरेनें आग्र्यास निघाला. आग्र्यास ही बातमी कळतांच, त्याजकरितां रस्त्याचे परवाने आले, व सुरतेच्या अधिकाऱ्यास ठपका मिळाला. डिसेंबर ता. २३, स. १६१५ ला रो अजमीर येथें पोंचला. सुरतेहून अजमिरास येण्यास दोन महिने लागले. रस्त्यांत बऱ्हाणपूर येथें शहाजादा पर्वीझ याला भेटून तेथें वखार घाल-

ण्याची परवानगी त्यानें मिळविली. बऱ्हाणपूर येथें त्यास भयंकर ताप येऊन त्याचा केवळ पुनर्जन्म झाला. आग्र्यास पोंचल्यावरही कांहीं दिवस तो आजारीच होता. शेवटीं ता. १० जानेवारी, स. १६१६ रोजीं तो प्रथम जहांगीरच्या दरबारास गेला.

**६. मोगल दरबारची स्थिति.**—जहांगीर बादशहाविषयीं रोचें मत पुष्कळ चांगलें आहे. मद्यपानामुळें बादशहा अशक्त व आळशी झाला होता, तरी स्वभावतः अकबराचे बरेच गुण त्याच्या अंगीं होते. विशेषतः दुसऱ्यांस योग्य सन्मान देऊन त्यांच्याशीं अदबीनें वागण्याचा मोठा गुण जहांगीरच्या अंगीं होता. रोचा तर त्यानें एवढा सन्मान केला, कीं त्या पूर्वीं इराणी किंवा तुर्की वकिलासही इतका सन्मान मिळाला नव्हता. रोच्या सभ्य व प्रतिष्ठित वागणुकीचा बादशहाच्या मनावर चांगलाच परिणाम झाला; व जरी रोच्या वकिलातीचे उद्देश विशेष सफल झाले नाहींत, तरी त्याजबद्दल बादशहाला विशेष पूज्यबुद्धि वाटत असे, ह्यांत संशय नाहीं. उद्देश सिद्धीस न जाण्याचें कारण बादशहाच्या हातांत विशेष सत्ता नव्हती. दरबारांत दुसरी मंडळी पुष्कळ असून त्यांची मर्जी संपादन करणें सुलभ नव्हतें. राणी नूरजहान, तिचा बाप इतिमादुद्दौला व भाऊ आसफ़खान, व आसफ़खानाची मुलगी मुम्मताजमहल ( खुर्रम्‌ची बायको ) ही सर्व मंडळी राज्यकारभारांत प्रमुख होती. त्यांचा उद्देश खुर्रम्‌ची सत्ता वाढवून वडील मुलगा सुलतान खुस्रू व शहाजादा पर्वीझ ह्यांचा पाडाव करावा असा होता. जहांगीरवर रोची छाप चांगली बसल्यामुळें ह्या इतर मंडळीची त्यानें परवा केली नाहीं; म्हणून त्याचा बेत फसला. निदान ह्या मंडळीच्या वजनाची त्यास कल्पना झाली नाहीं. शिवाय ह्या सर्वांस नजराणा देण्याजोगे पदार्थ रोपाशीं नव्हते. विशेषतः नूरजहान व तिचा भाऊ यांस त्यांच्या योग्य त्यानें कांहींच दिलें नाहीं. शहाजादा

खुर्रम् ह्याची रोनें भेट घेतली; आणि पहिल्याच भेटींत त्यानें सुरतच्या अधिकाऱ्याच्या दुर्वर्तनाबद्दल बादशहाकडे फिर्याद करण्याची गोष्ट काढिली, ती खुर्रम् ह्यास आवडली नाहीं. खुर्रम्चा ताठा विशेष होता, असें रोचें म्हणणें आहे. कदाचित् सुरतच्या झुल्फिकारखानानें इंग्रजांच्या विरुद्ध खुर्रम्कडे तक्रारी केल्या असाव्या. तथापि आरंभीं खुर्रम ह्यानें रोच्या संबंधानें वैषम्य दाखविलें नाहीं; व आपलें काम फत्ते होणार अशी रोस बरीच आशा वाटली. पोर्तुगीझ लोकांस तंबी देण्याचें काम पहिलें होतें. इंग्रजांची व त्यांची स. १६१२त व १६१५त दोनदां समुद्रावर लढाई झाल्यापासून एक गलबत भरावयाचें असलें, तरी बंदोबस्तासाठीं कंपनीला आपलें सर्व आरमार सुरतेला ठेवावें लागे. वास्तविक गोव्यावर एकदम हल्ला केला असता तर परभारेंच बंदोबस्त झाला असता; पण वकील म्हणून शांततेच्या कामासाठीं आलेल्या रोला युद्ध हातीं घेणें शक्य नव्हतें. शिवाय पोर्तुगीझ लोकांचा बंदोबस्त आपोआपच होत आला होता. मोगलांशीं इंग्रजांचा तह कायम झाला, व इंग्रजांस होणारा उपद्रवही बंद पडला. झालेल्या नुकसानाबद्दल इंग्रज व्यापारी प्रसंगोपात पोर्तुगीझ जहाजांवर हल्ले करून तीं लुटीत. शिवाय ह्या दोघांमधील लढा मोगलांनीं तोडला नाहीं ही गोष्ट दोघांच्याही पथ्यावरच पडली.

तथापि ह्या लढ्याची तडजोड चाललीच होती. तींत खुर्रम व आसफ्खान हे दोघेही नीट तड लावीनात, तेव्हां रोनें बादशहाची गांठ घेऊन त्याजकडे तक्रार केली. त्यांत शहाजादा खुर्रम्चें नांव आल्यामुळें बादशहा एकदम चवताळला, व 'तुम्हांस कोणीं त्रास दिला तें एकदम सांगा,' म्हणून आग्रह करूं लागला. दुभाष्याच्या मार्फत रोनें बादशहाचा राग शांत करण्याचा प्रयत्न केला; पण तो सिद्धीस न जातां, बादशहानें खुर्रम् व आसफ्खान ह्यांस तेथेंच बोलाविलें; व भरदरबारांत खुर्रम्ची

खूप कानउघाडणी केली. पुढें पोर्तुगीझ वकील व रो ह्यांचाही बराच तंटा दरबारांत झाला. शेवटीं आसफ्खानानें मध्यें पडून रो ह्यास आपली तक्रार लेखी देण्यास सांगितलें व तंटा मिटविला.

ही तडजोड रोला बरीच समाधानकारक वाटली; कारण एकदां प्रकरण लेखावर आलें म्हणजे आपणास पाहिजे तसा तह करून घेतां येईल अशी रोस आशा वाटत होती. विशेषतः पाहिजे तेथें व्यापार करण्याची सामान्य परवानगी बादशहापासून मिळवावी, व शहाजाद्याशीं वगैरे विनाकारण तोंडीं तंटा करण्याचा प्रसंग आणूं नये; एकदां बादशहाचें फर्मान मिळालें कीं तें सुरतेप्रमाणें इतर सर्व ठिकाणींही लागू पडेल असें रोस वाटत होतें. वास्तविक अशा फर्मानाचाही कांहीं उपयोग होणारा नव्हता. कारण तीं एका विशिष्ट व्यक्तीस हुकूम म्हणून लिहिलेलीं असल्यामुळें, त्यांचा अंमल सर्व अधिकाऱ्यांवर चालत नसे; व पुष्कळदां विरुद्ध हुकूम सुटल्यामुळें त्यांचा कांहीं उपयोग होणारा नसे. वास्तविक उभय राष्ट्रांमध्यें पद्धतशीर तह ठरविणें एवढाच उपाय रो यास होता.

**७. तहाचा मसुदा व वाटाघाट.**—अशा प्रकारचा व्यापारी तह त्या वेळीं युरोपांतील तुर्कस्थानाशीं इतर युरोपियन राष्ट्रांनीं केलेला होता. त्याच तहाचा एक मसुदा करून तो रोनें बादशहाकडे रुजू केला. त्यांत खालील कलमें होतीं. इंग्रज व्यापाऱ्यांस सिंध बंगाल सुद्धां हिंदुस्थानच्या किनाऱ्यावरील पाहिजे त्या बंदरांत व्यापार करण्याची मोकळीक असावी. राज्यांत इतरत्र चालू असलेल्या जकातीपेक्षां इंग्रजांच्या मालावर ज्यास्त जकात घेऊं नये. मालाची खरेदीविक्री करणें, वखारी भाड्यानें ठेवणें, बोटी व गाडे भाड्यानें ठेवणें, व पोटगीस लागणारें सामान चालू भावानें खरेदी करणें ह्या गोष्टी इंग्रजांनीं आपल्या मर्जीमाफक कराव्या, त्यांत सरकारी अधिकाऱ्यांनीं ढवळाढवळ करूं नये; तसेंच,

मयत इंग्रज व्यापाऱ्यांची मिळकत सरकारांत जमा करूं नये, व्यापारी किनाऱ्यावर उतरले असतां त्यांचा झाडा घेऊं नये, बादशहाला नजर देण्याकरितां आणिलेले जिन्नस किनाऱ्यावर उघडून तपासूं नयेत; जकातीच्या नाक्यावर माल पडूं देऊं नये, वगैरे बाबतींबद्दलही कित्येक कलमें होतीं. बादशहानें ह्या गोष्टी कबूल केल्यास, इंग्रजांनीं पाळण्याच्या शर्ती अशा होत्या, कीं इंग्लंडचे शत्रु किंवा इंग्रज जहाजांस त्रास देणारे दुसरे लोक ह्यांखेरीज इतर राष्ट्रांच्या जहाजांस इंग्रजांनीं त्रास देऊं नये; हिंदुस्थानांत राहणाऱ्या इंग्रज व्यापाऱ्यांनीं सभ्यपणानें व शांतवृत्तीनें राहवें; बादशहाकरितां कांहीं अप्रतिम चिजा पैदा करून देण्याची त्यांनीं खटपट करावी; बादशहानें योग्य मागणी केली असतां त्यास लागेल तो माल अथवा युद्धसामुग्री विकत द्यावी; व सर्वांच्याच शांततेचा भंग करणारा असा कोणी शत्रु बादशहावर उठल्यास त्याचा बंदोबस्त करण्यास इंग्रजांनीं बादशहास मदत करावी; अशा प्रकारच्या शर्ती पोर्तुगीझ लोक पाळण्यास कबूल असतील तर त्यांजबरोबरही तसा तह करण्यास इंग्रजांची हरकत नसावी; परंतु सहा महिन्याचे आंत पोर्तुगीझ लोक असा तह न करितील, तर त्यांस शत्रु समजून त्यांजशीं युद्ध करण्यास इंग्रजांस मोकळीक असावी, त्याबद्दल बादशहानें वैषम्य वाटून घेऊं नये.

अशा प्रकारच्या कलमांचा मसुदा रोनें बादशहाकडे रुजू केला; व बादशहानें तो वजीर आसफ्खान याच्या विचाराकरितां दिला. ह्या कलमांवर टीका करण्याची जरूर नाहीं. दोहों बाजूचीं कलमें पाहिलीं म्हणजे खोंच कोठें व कशी आहे, ह्याचा उलगडा वाचकांस सहज होईल. आसफ्खानानें नाहीं होय करितां, कांहीं थोडा शाब्दिक फेरफार करून मसुदा पसंत केला, व आतां बादशहाचा शिक्का होणें मात्र बाकी आहे, असें त्यानें दरबारांत रो ह्यास कळविलें. इतक्यांत सुरतचा

अधिकारी झुल्फिकारखान ह्याजविरुद्ध रोनें पूर्वी गान्हाणीं केलीं असल्यामुळें, त्यास आग्रयास येण्याविषयीं हुकूम जाऊन तो परत आला. ह्या परकीय लोकांपासून आपल्या राज्यास उपयोग अगर अपाय काय आहे हें हा गृहस्थ पक्केपणीं जाणत होता; व त्याजविरुद्ध रोची फिर्याद असल्यामुळें त्यानें आपल्या तर्फेची बाजू दरबारास स्पष्ट कळविली. तिचें वर्णन रोनें आपल्या पुस्तकांत विशेष दिलें नाहीं. म्हणून ह्या तहाच्या भानगडींची उलट बाजू कळण्यास आज मार्ग नाहीं. तथापि हा तह सिद्धीस जाऊं दिल्यास बादशाहीचें नुकसान होईल, असा अंतस्थ समज होता व तोच शेवटीं रो यास बाधक झाला असावा. बादशहाकडून कामाचा निकाल लवकर लागेना, तेव्हां थोडीशी चांगली मादक दारू शहाजाद्यास नजर करून तिच्या कैफांत त्याजवळ रोनें निकाल मागितला. तेव्हां झुल्फिकारखान यास देहदंड न करितां, इतर सर्व बाबतींचा तुम्हांस संपूर्णपणें समाधानकारक असा निकाल लावितों, असें शहाजाद्यानें स्पष्ट वचन दिलें. ह्याउपर रो परत घरीं गेला. थोड्याच दिवसांत बादशहानें दोन फर्मानें सोडिलीं: एकांत इंग्रजांस सुरतेस राहण्याची व तेथून पुढें आंत प्रवास करण्याची परवानगी दिलेली होती; व दुसऱ्यांत त्यांचें सुरतेस झालेलें नुकसान भरून देण्याचा तेथील अधिकाऱ्यास हुकूम होता. हीं फर्मानें रोनें घेऊन लगेच सुरतेस पाठविलीं.

पुढें झुल्फिकारखानापासून नुकसान काय भरून घ्यावें ह्याजबद्दलच्या वादांत महिना गेला. नाहीं होय करतां, झुल्फिकारखान सतरा हजार मामुदी देण्यास तयार झाला; परंतु ही रक्कम थोडी म्हणून रोनें स्वीकारिली नाहीं. पुढें असें आढळून आलें, कीं सुरतेच्या इंग्रज व्यापाऱ्यांनीं नुकसानीचा जो हिशेब पाठविला तोच चुकीचा होता; ती चूक पदरांत आल्यामुळें रोची बरीच मानखंडना झाली; व सतरा हजार हातांत येते तर वाईट नाहीं असेंही त्यास वाटलें. आसफ्खान बाहेरून

गोडगोड भाषणें करून वेळ मारून नेई, पण कोणतीही गोष्ट निकालास आणीना. रोचा तह म्हणजे स्वराष्ट्राच्या पायांत अडकविण्याची शृंखला होय असें वरील मसुदा वाचून ज्या वाचकांस वाटेल, ते रोच्या अपमानापेक्षां आसफ्खानाच्या धूर्ततेचेंच कौतुक करतील यांत संशय नाहीं.

रोची उत्तरोत्तर निराशा होत चालली. त्याजकडून आपणास ज्यास्त कांहीं नजरनजराणा मिळत नाहीं असें दिसल्याबरोबर, बादशहाचीही त्याजवरील मर्जी उतरत चालली. झुल्फिकारखानास त्रास दिल्यामुळें शहाजादा खुर्रम् तर रोचा द्वेषच करीत होता. इतक्यांत कांहीं पोर्तुगीझ लोक गोव्याहून अनेक उत्कृष्ट चिजा घेऊन दरबारीं आले, त्यांनीं त्यायोगें आसफ्खान वगैरे वजनदार अधिकाऱ्यांस आपलेंसें करून घेतलें. तेव्हां इंग्रजांचा नक्षा बराच कमी होऊन रो चिंतेंत पडला. ता. १ जून रोजीं आसफ्खानाचा त्याला निरोप आला, कीं शहाजाद्यानें तक्रार केल्यावरून, रोनें दरबारास येऊं नये अशी बादशहानें ताकीद केली आहे. हा हुकूम तोडून दरबारास जावें तर शहाजाद्याचे अनुयायी सूड घेण्यास चुकणार नाहींत अशाही सूचना आल्या. पण रो डगमगला नाहीं. 'झुल्फिकारखानाच्या शिक्षेचा नाद सोडून दिल्यास आपण मदत करण्यास तयार आहा,' असें आसफ्खानानें त्यास सांगून पाठविलें, त्यास त्यानें जबाब पाठविला, कीं 'कंपनीचा पैसा वाटेवर आलेला नाहीं. आम्हांस सगळें जग मोकळें आहे. तुम्हांस पैसे चारून व्यापार करण्याइतकी त्यांत आम्हांस किफायत नाहीं. आणखी थोडे दिवस आम्ही बादशहाच्या उत्तराची वाट पाहूं; व पुढें येथें राहवें कीं सर्व व्यापाऱ्यांसह हिंदुस्थानास शेवटचा रामराम ठोकून परत आपल्या देशास जावें ह्याचा विचार करूं.' म्हणणें सोपें आहे. दुसरीकडे जाण्यास जागाच नव्हती.

अशा प्रकारें एका घावांत दोन तुकडे करण्याचा विचार रोच्या मनांत घोळत असतां, एक अकल्पित गोष्ट घडून आली. मुकर्रबखान म्हणून एक सरदार पूर्वीं इंग्रजांचा द्वेष्टा होता. त्यानें वरील प्रसंगीं इंग्रजांकडून कांहीं चिजा नजर मिळविण्याच्या आशेनें रो दरबारास न येण्याचें खरें कारण बादशहास जाऊन कळविलें. बादशहानें लगेच त्याजबरोबर रो ह्यास कळविलें, कीं 'आम्ही तुम्हांस दरबारची बंदी केलेली नाहीं.' परंतु आसफखानाची पाठ सोडून मुकर्रबखानावर भरंवसा ठेवणें रो यास पसंत पडलें नाहीं. मुकर्रबखानाची खटपट पाहून आसफ्खानही रोची समजूत करण्याच्या खटपटीस लागला. पुढें त्याच्या मार्फत जून ता. २५ रोजीं रो पुनः दरबारास गेला. तेथें बादशहानें त्याचा पूर्ववत् सत्कार केला. इतके दिवस दरबारास न येण्याचें कारणही त्यानें विचारिलें नाहीं. पुढें झुल्फिकारखान व शहाजादा खुर्रम हे दक्षिणेंत लढाईवर जावयाचे असल्यामुळें, झुल्फिकारखानावरील फिर्यादीची पुनः त्वरेनें उजळणी होऊं लागली. जुलई ता. ९ रोजीं तडजोड कायम झाली, तथापि पुनः होय नाहीं होऊन ता. ९ आगष्ट रोजीं एकदांचा कामाचा निकाल लागला, असें रोनें डायरींत लिहिलें आहे. रोनें मागणी केलेली सर्वच रक्कम आली असें नाहीं; थोडेंबहुत नुकसान झालें, तथापि सर्वसत्ताकर्षी राजपुत्राच्या दोस्तास एवढा भूर्दंड द्यावा लागला हें इंग्रज वकिलानें कांहीं थोडें काम केलें नाहीं. इतर अधिकाऱ्यांवरही त्याचा परिणाम चांगलाच झाला. शहाजाद्याचा व रोचा बाह्यतः स्नेह जुळला. बादशहानेंही त्याचा उत्तम प्रकारें सन्मान केला; व आसफ्खान त्याजबरोबर दोस्तीनें वागूं लागला.

मध्यंतरीं विलायतेहून आलेली एक सुंदर तसबीर रोनें बादशहास नजर करून पैज मारिली, कीं आपल्या देशांत कोणींही हिची नक्कल करून दोनही एक ठिकाणीं ठेवील, तर मी ही तसबीर हटकून ओळ-

